प्रिय वसंत सबनीस याला—

वसंता,

गेल्या पन्नास-पंचावन्न वर्षांच्या आपल्या
मैत्रीनंतर अघळपघळ म्हणजे काय हे मी तुला
किंवा तू मला वेगळ्या शब्दांत सांगण्याची गरजच काय?

—भाई

## पूर्वप्रसिद्धी

**मी आणि माझे पत्रकार** : ललित, दिवाळी १९६८ ☐ **काही साहित्यिक भोग** : आवाज, दिवाळी १९७७ ☐ **ललित आत्मपरिचय कसे लिहावे ?** : ललित, दिवाळी १९६५ ☐ **प्रा० विश्व० अश्व० शब्दे** : हंस, दिवाळी १९५५ ☐ **आमचे भाषाविषयक धोरण** : हंस, दिवाळी १९६५ ☐ **एकेकाचं मराठी** : दीपावली, दिवाळी १९६७ ☐ **मी : एक मराठी माणूस** : हंस, दिवाळी १९६७ ☐ **माझा एक अकारण वैरी** : रहस्यरंजन, दिवाळी १९६१ ☐ **काही (बे)ताल चित्रे** : श्रीदीपलक्ष्मी, दिवाळी १९६१ ☐ **माझ्या भावी चरित्राची ऐतिहासिक साधने** : दीपावली, दिवाळी १९७१ ☐ **विनोदी लेखन हे साहित्य?** : विनोद, दिवाळी १९६५ ☐ **मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास : खंड दुसरा** : अप्रकाशित

# मी आणि माझे पत्रकार

लेखकाचा लेखकराव झाला की, अध्यक्षस्थाने स्वीकारणे, संदेश देणे, जगातल्या कुठल्याही विषयावर मते देणे, (कुटुंबनियोजन, केशवसुतांची साकल्यविषयक कल्पना, कृष्णा-गोदावरी पाणीतंटा, 'युगान्त'मधील महाभारतकालीन व्यक्तिरेखा इ० इ०) मार्गदर्शन करणे, सरकारी पदव्या मिळवणे, मिळाल्याबद्दल सत्कार स्वीकारणे, स्वीकारल्याबद्दल धिक्कार, धिक्काराला उत्तर दिल्याबद्दल निषेध, निषेधाला उत्तर न दिल्याबद्दल टोपणनावांनी मारलेले दगड, टोचलेल्या सुया–अशी नाना तऱ्हेची लष्टके सुरू होतात. सकाळ-दुपारची डाक फुगते. त्या डाकेत पाण्याची, विजेची बिले, टेलिफोनची बिले (लेखकरावांना टेलिफोन हवाच!), सभा–समारंभांची आमंत्रणे, भेटीदाखल कधीही न मागता येणारी नियतकालिके...(वर पुन्हा आपल्या नियतकालिकाचा फुकट्या वाचक म्हणून केलेला धिक्कार!) ह्याच्याबरोबरच वाचकांची पत्रेही असतात. इंग्रजीत असल्या पत्रांना 'फॅन मेल' म्हणतात. ह्या पत्रांतून स्तुतीची सुगंधी झुळूक येत असल्यामुळे त्याचा 'फॅन'शी संबंध जोडला असावा. एरवी ही सगळीच पत्रे काही आपला दिवस सुखात घालवणारी नसतात. 'लेखकाचा लेखकराव कसा होतो?' ह्या विषयावर मराठीतले सुप्रसिद्ध कादंबरीकार प्राध्यापक भालचंद्र नेमाडे यांनी एक अत्यंत बोधप्रद लेख लिहिला होता. त्यात एकदा माणसाचा लेखकराव झाला की, तो कसा अप्रामाणिक होतो, हे वर्णिले होते. हा मुद्दा मला पटला होता. (उदाहरणार्थ : संदेशवाचन ही कंटाळवाणी गोष्ट आहे, हे मला ठाऊक असूनही मी संदेश पाठवतो.)

लेखकाची लोकप्रियता आणि दर्जा ह्यांचे प्रमाण व्यस्त असते, असा एक सिद्धान्त साहित्यात पूर्वापार रूढ आहे. ते काहीही असले तरी अध्यक्षपदाची आमंत्रणे, मार्गदर्शन वगैरे सुरू झाले की, शहाण्यांनी आपण लेखकराव होऊ लागलो, हे ओळखावे. एकच प्याल्यात पहिला प्याला धोक्याचा, तसेच अध्यक्षपदाचे पहिले आमंत्रण धोक्याचे. तशात सरकारी बक्षीस अगर पदवी मिळाली तर स्वत:ला गुणांमुळे मिळाली आणि इतरांना वशिल्यामुळे, असे मानण्याची सवय ठेवावी. म्हणजे आपणही लेखकराव झालो आहोत, हे आपले आपल्याला भासत नाही. ते एक बरे असते.

दुर्दैवाने माझ्यावर लेखकराव होण्यासाठी किमान आवश्यक असे सगळे सोपस्कार झाले आहेत. पदव्या, बक्षिसे, प्रमुख पाहुणे, अध्यक्ष इ० इ०. मला नुकतेच 'भारतीय विमा-व्यवसायाला काही मार्गदर्शक विचार सुचवा' असे पत्र आल्यापासून आपण 'लेखक' म्हणून मेलो आणि 'लेखकराव' म्हणून भुईला भार आणि हाराला गळा म्हणून उरलो, याची खेदपूर्वक जाणीव झाली. जे जिवंत असून लेखक म्हणून मृतप्राय आहेत, त्यांच्या विम्याची काही सोय करा, असे सुचवणार होतो. असल्या ह्या खेदपूर्वक जाणिवेत रोज भर टाकणारी पत्रे मला नेहमी येतात. त्यातून मला लेखनाव्यतिरिक्त नाटके करणे असल्याही खोडी असल्यामुळे मला वाचकांची पत्रे येतात, तशी श्रोत्यांची आणि प्रेक्षकांचीही पत्रे येतात. अनेक तऱ्हेची. 'तुम्ही योगभ्रष्ट सत्पुरुष आहात!' इथपासून ते 'तुला जोड्याने मारले पाहिजे!' इथपर्यंत विविध विचार प्रगट करणारी. प्रेमळ, उद्धट, वारेमाप स्तुती आणि यथेच्छ निंदा करणारी. विनोदी लेखकाची एक अदृश्य विदूषकी टोपी माझ्या डोक्यावर असल्यामुळे 'आम्हांलाही विनोद करता येतो म्हटलं' ह्या चालीचीही पत्रे असतात. काही लडिवाळही असतात. 'तुमचा धडा आम्हांला आहे, तरी स्वाक्षरी पाठवावी आणि फोटो.' (बापरे!) अशी बालबोध असतात. आणि काही निनावी. ह्यांतल्या बहुतेक पत्रांना मी उत्तरे पाठवतो. निदान पोच तरी धाडतो; पण खरी हौस असते ती निनावी पत्रांना उत्तर पाठवायची. कारण त्यांतला नाव छपवण्याचा भाग सोडला, तर ती पत्रे फार प्रामाणिक असतात. त्यांतली स्तुती तर निश्चितच प्रामाणिक असते. आणि बहुतांशी टीकाही. संतापून लिहिलेल्या पत्रातला संताप खरा असतो. पत्रावर तो भडभडभड लिहिलेला असतो. असली पत्रे फार येत नाहीत. म्हणजे माझ्यावर कुणी संतापत नसेल असे नाही; पण आलेल्या संतापाचे शब्दांकन करून तो कागदावर उतरवण्याच्या क्रियेपूर्वीच उतरत उतरत जात असावा आणि चार तोंडी शिव्या देऊन 'जाऊ दे लेकाच्याला खड्ड्यात' किंवा 'लिहून तरी काय उपयोग? कोडगे आहेत लेकाचे!' वगैरे सुज्ञ विचार सुचत असावेत. त्यातून पोटासाठी लिहिणारे किंवा लेखकराव झाल्यामुळे ज्यांना लिहावेच लागते, त्यांच्याखेरीज इतरांना लिहिणे ही क्रिया कंटाळवाणीच वाटत असणार. 'संताप' हा मलेरियासारखा झटकन चढून उतरणारा ताप आहे. विषमज्वरासारखा ज्याचा संताप एकवीस, बेचाळीस वगैरे दीर्घ मुदतीपर्यंत टिकू शकतो, तो एक तर वेडा होतो किंवा मजूर-अगर-मालक-पुढारी होतो. तिथे संतापाची मशाल पेटतीच ठेवावी लागते. पण निनावी पत्रे ही बहुधा कार्डसाइझची असतात. हे लोक आपला राग कार्डावर ओकून टाकतात. असल्या ओकारीखाली आपले संपूर्ण नाव लिहिणे त्यांचे त्यांनाच रुचत नसावे. मला वाटते, संतापाची निनावी कार्डे लिहिणारे लोक आधी दातओठ खाऊन माझा पत्ता लिहीत असावेत. मग पत्र. असल्या पत्रांत बहुधा मायन्यातच सगळा जोर संपतो. 'भडव्या' अशा प्रेमळ मायन्यापासून सुरू होणारी काही निनावी पत्रे माझ्या नावावर आली आहेत. ही बहुधा वाचकांपेक्षा प्रेक्षकांची अधिक ('...इतका पैसा कोणाच्या मढ्यावर ओतणार आहात?...' इ० इ०) शिव्यांचे थोडेसे सोडावॉटरच्या बाटलीसारखे आहे.

पहिल्यांदा बूच उघडल्यावर जो फासकन आवाज होतो तो खरा! पहिली शिवी ही खरी. बाकीच्या शिव्यांत तो जोर ओसरत जातो. मग उरते खारटसारखे पाणी. भांडणातदेखील पहिली शिवी ज्या जोसात जाते, तितकी इंटेन्सिटी पुढल्या शिव्यांत राहत नाही. मग मुख्यार्थाच्या दृष्टीने नंतरच्या शिव्या कितीही प्रतिभासंपन्न असोत. असल्या शिव्या घाव नाही करत; थोडीफार करमणूकच करतात. म्हणून नुसते शिव्यांचे भांडण पाहताना लोक विनोदी नाटक पाहिल्यासारखे हसतात. (विनोदी नाटकांना शिव्याही देतात.) एक शिवी परिणाम साधून जाते; अनेक शिव्या हसवून जातात. भांडण पेटवणारी पहिली शिवी कचकावून जायला हवी. निनावी पत्रातला मायना आणि पहिली तीनचार वाक्ये ह्यांच्यातच खरा उन्मेष असतो. दुर्दैवाने मी तसा संस्कृतिसंरक्षक मंडळाच्या शिक्षेस पात्र लेखक नसल्यामुळे नीतिमत्ता दुखावणारे वगैरे काही लिहीत नाही. लोकांची नीतिमत्ता दुखली तर नीतिमान लेखक आपल्याला जाहीर शिव्या देतील, न जाणो, हातपाय वगैरे तोडतील, अशी मला भीती वाटते. नीती म्हणजे काय साधी गोष्ट आहे? प्रत्यक्षात बिघडली म्हणून बिघडत नाही; पण साहित्यात बिघडली तर मुळातल्या लिखाणाहूनही अभद्र शब्दांत निषेध करून ती जोपासली पाहिजे. (सॉरी, जोपासलीच पाहिजे!)

एकदा फक्त मी 'विठ्ठल तो आला आला' नावाची एकांकिका लिहिली. त्यानंतर काही जणांच्या धार्मिक भावना दुखावल्यामुळे मला एका डॉक्टरांनी 'विठ्ठल तुम्हांला सद्बुद्धी देवो!' असे चिडून लिहिले होते. मी त्यांना 'तोच विठूराया तुम्हांला थोडीशी विनोदबुद्धी देवो!' अशी पोच धाडली होती. पण तसा एकूण मी दुबळा, मध्यमवर्गीय लेखक आहे. अजूनही कथा-कवितेतून एखादा कढत शब्द आला की चपापतो. हातून लिहून होणे तर फारच दूर. मघाशी 'भडव्या' हा दुसऱ्याने लिहिलेला शब्द उदाहरणादाखल लिहितानादेखील जरा भ्यालोच होतो. फुल्या टाकाव्या असा विचार होता; पण आताशा त्या शब्दातला कढतपणा जाऊन तो वापरून वापरून निवला आहे म्हणून धीर धरून लिहिला. इतके जपूनही, विनोदी म्हणतात तसले लिखाण करत असल्यामुळे नकळत कुणाला तरी वार करून जातो. आणि मग एखादे सणसणीत पत्र येते.

मागे एकदा मी मराठी लोकांविषयी माझ्या समजुतीने गमतीचा म्हणून एक लेख लिहिला होता. त्यात मराठी दुकानदार आणि त्याचे गिऱ्हाइकाशी वागणे ह्यावर थोडासा मजकूर होता. मराठी दुकानदार हा मुख्यत: महाराष्ट्राचा औद्योगिक आणि व्यापारी विकास व्हावा ह्या ध्येयाने प्रेरित होऊन दुकान काढतो. पैसे मिळवणे हा त्याचा कधीही हेतू नसतो. त्यामुळे मराठी माणसाच्या दुकानात जाताना आपण 'माधुकरी मागायला जात आहोत' आणि 'थांबा, उद्याचे शेटजी, तीर्थ पायाचे घेऊ द्या,' अशा भावनेने तिथे जावे लागते, हा माझा अनुभव असल्यामुळे विनोद आणि मराठी दुकानदार ह्यांचे सावत्र नाते आहे, अशी माझी प्रामाणिक धारणा मी त्यात व्यक्त केली होती. आठव्या दिवशी एका कार्डावर प्रतिक्रिया आली :

अरे देशपांड्या,

तुझा मराठी दुकानदारावरचा लेख वाचला. साल्या, आमच्या दुकानी येऊन बघ. बेरडा, (ती जातीयवाचक शिवी देणे गैर आहे, असे मला वाटले.) आम्हांला विनोद करता येत नाही काय? कोंबडीच्या, (ही ठीक आहे.) आमच्या दुकानी सदैव हाश्यकल्लोळ चालू असतो. येऊन बघ. तुझे तंगडे मोडून तुला परत पाठवू. कळावे.

आपला नम्र (हे आणि वर!)

एक मराठी दुकानदार.

(खरोखर असे पत्र आले होते. ही केवळ माझी कल्पना नव्हे.)

खरे तर त्या मराठी दुकानदाराने मला आपला पत्ता द्यायला हवा होता. मी निदान वेष पालटून तरी त्याच्या दुकानातला हास्य नव्हे, हाश्यकल्लोळ ऐकून आलो असतो आणि शनवारवाड्यासमोर मराठी व्यापारी जगताची माफी मागितली असती. बाकी तंगडीबिगडी तोडण्यात पटाईत असणाऱ्या ह्या दुकानदाराच्या दुकानी विनोदसुद्धा जरासा भारी दर्जाचा चालत असणार. हा दुकानदार बहुधा किराणा-भुसार असावा. कारण पत्र हिशोबाच्या वह्यांच्या शाईत होते, एवढेच नव्हे तर त्याला हिंगाचा वास येत होता. (लोकांना हलकासा सेंटचा शिडकावा केलेली, जाईच्या पाकळ्या घातलेली पत्रे—आम्हांला हिंगाच्या वासाची! विनोदी लेख लिहा, विनोदी लेख लिहा—!) 'लेका, तुला हिंग लावून कोणी विचारणार नाही' ह्या वाक्प्रचाराची सदरहू दुकानदाराला माहिती नसावी. मी डोळ्यांपुढे 'कोणीतरी आणि मंडळी—किराणा व भुसार मालाचे व्यापारी. आमचे दुकानी अस्सल केशर, भूतछाप हिंग, शिंगाडे व जानवी जोड मिळतील...' वगैरे सचित्र मजकूर उभा करू लागलो. किराणा-भुसार दुकानात येणारा तो साबणबार, हिंग, अगरबत्ती, तूप, रॉकेल, गोडेतेल, केरसुण्या, गोणपाटे आणि पापड असल्या सुगंधी द्रव्यांतून निर्माण होणारा संयुक्त वास दरवळू लागला आणि मला तो हाश्यकल्लोळही ऐकू येऊ लागला. तंगडी मोडायची भीती होती म्हणून मी माझ्या आत्म्यालाच तिथे पाठवले.

''एक नारळ द्या हो—'' गिऱ्हाईक.

''सोम्या, गिऱ्हायकाला नारळ दे—'' तंगडमोड मराठी दुकानदार.

''चांगला द्या हं—''

''आमच्या नारळाचं खोबरंच नव्हे, तर करवंटीदेखील टिकाऊ असते—ठेवून द्या—उपयोगाला येईल.'' (स्मित हास्य.)

''फोडून द्या हं—''

''सोम्या, नारळ फोड त्यांच्या पायांशी आणि पावलांवर पाणी टाकून तीर्थ घे—हा: हा: हा:! (सोम्या आणि मालकांचा हाश्यकल्लोळ.) काय हवांय?''

''वीस ग्राम जिरं—''

"सोम्या, साहेबांना काडी लाव."



"सोम्या, ह्यांना जिरं देऊन जिरव रे ह्यांची."
(खो: खो: खो: खो!)
"मालक, काड्याची पेटी–"
"सोम्या, साहेबांना काडी लाव."
(हशा, हाश्यकल्लोळ, खो: खो:, सर्व काही.)

सगळीच भडकून लिहिलेली पत्रे काही निनावी नसतात. सरळ नाव घालून, स्वत:चा पत्ता लिहूनदेखील लोक हाणतात. गेल्या वर्षी मी रेडिओवरून गांधींची *आत्मकथा* वाचत होतो. त्या काळात मला अधूनमधून दणका मिळायचा. काही लोकांचा प्रथम अपेक्षाभंग झाला. त्यांनी भोजनोत्तर जरा हसायला मिळेल म्हणून गुंडी फिरवली आणि त्यांना माझ्या मुखातून गांधींचे आत्मचरित्र ऐकू यायला लागले. उद्या नित्याचा भेळवाला त्रिफळाचूर्ण विकायला लागल्याचे पाहून जसे वाटावे, तसे वाटले असणार. असल्या बहुतेकांच्या पत्रांचा सूर 'तुम्हांला हा धंदा कोणी सांगितलाय?' असा होता. 'तुम्ही निमूटपणे आम्हांला काय हसवायचं ते हसवा आणि मोकळे व्हा' अशा थाटाच्या सूचना वाचल्यावर केवळ साहित्यिक समाजाला घडवतो, हे अर्धसत्य असून समाजही साहित्यिकाची एक मूर्ती मनाशी घडवून बसलेला असतो, हे हळूहळू कळायला लागले. ह्या काळात काहींच्या मते त्यांच्या मनातल्या माझ्या प्रतिमेला तडा गेला म्हणून संताप. एरवी तेवढे सोडले तर मी बरा! ह्या गांधींच्या चरित्रवाचनाने काही वेळा माझी भलतीच आफत केली. त्यातच मी उरुळी कांचनच्या निसर्गोपचार-केंद्रात उपचारासाठी जाऊन राहिल्याची बातमी फुटली. आणि एकादोघांनी मला 'जय जगत्, पू० पु० ल०' असले मथळे घालूनही पत्रे लिहिली. मी थोडा हादरलोच. एका पूज्य गृहस्थांनी तर चक्क असे लिहिले : 'तुम्हांला उशिरा का होईना, पण उपरती झाली, याचे समाधान वाटते. आता हसवण्याचा धंदा बंद करून विधायक कार्याला वाहून घ्यावे. उरुळीला गोपालनाचे शास्त्र शिकून घ्यावे आणि उर्वरित आयुष्य गोसेवेत घालवावे.' माझ्या आयुष्याच्या संदर्भात तो 'उर्वरित' नावाचा भयंकर शब्द वाचून

मी हादरलोच. दचकून "चायभले*!" असेही मी उद्गारलेले मला आठवतेय. मी 'गोसेवा' करतोय आणि कुठली तरी अश्राप 'गो' माझ्याकडून सेवा करून घेते आहे, हे माझ्या स्वप्नातदेखील कधी येऊ शकणार नाही. 'गों'ना स्वप्ने पडतात की नाही, मला कल्पना नाही; पण त्यांच्याही स्वप्नात माझ्याकडून त्यांची सेवा होण्याचे स्वप्न पडणे केवळ असंभवनीय आहे. त्या पत्राने माझी झोप उडाली. 'उर्वरित' काय? गोसेवा काय? उपरती काय? ह्या गांधीचरित्रवाचनाच्या काळातच एका गृहस्थाचे मला भलतेच भडक पत्र आले होते. त्या पत्राच्या शेवटी त्यांनी म्हटले होते: 'पण...पण...पीएल्साहेब, ('पण, टिंबे टिंबे पण' हे त्या पत्रातलेच आहे.) तुम्ही पोट जाळण्यासाठी गांधींच्या आयुष्यात नसलेले रोमहर्षक भाग सांगत आहांत. त्यापेक्षा खरोखरच जर आपल्याला पैशाची गरज असेल तर तसे सांगा, आम्ही आपल्यासाठी वर्गणी जमा करून आपली पैशाची गरज भागवू.' हे पत्र मात्र निनावी नव्हते. सहीशिक्क्यानिशी आले होते. त्यातले 'गांधींच्या आयुष्यात नसलेले रोमहर्षक भाग' मी कुठले वाचले, ते मला अद्यापही उमगले नाही. मी गांधींनीच लिहिलेली आत्मकथा वाचत होतो. मला एकच समाधान झाले की, आपल्यावर कधीमधी अवघड आर्थिक प्रसंग आलाच तर ह्या माझ्या अज्ञात चाहत्याला पत्र पाठवून 'आता वर्गणी गोळा करायला सुरुवात होऊ द्या–' असे सांगायला हरकत नाही. पोट जाळण्याइतके जमले तर ठीक, नाहीतर 'जाळण्या'इतके तरी जमतील. नाहीतर कलावंत दोन पैसे मागे ठेवून मेला, ह्यापेक्षा तो दारिद्र्यात खितपत कसा मेला आणि मग त्याला आम्ही वर्गणी काढून कसा जाळला, ही कथा अधिक चवीने सांगण्यासारखी असते.



'उरळीला गोपालनाचे शास्त्र शिकून घ्यावे आणि उर्वरित आयुष्य गोसेवेत घालवावे.'

साहित्यिकाला जीवनाची कोडी उलगडलेली असतात, असा एक लोकभ्रम आम्ही लोकांनीच निर्माण करून ठेवला आहे. त्यामुळे अनेक विषयांवर 'सल्ला' मागणारी पत्रे येतात. अशा पत्रांना मात्र मी उत्तरे पाठवत नाही. कारण मग मला मी उगीचच उषावहिनी, सुशीलावहिनी किंवा चंपूवन्सं वगैरे झाल्यासारखा वाटतो. सल्ले कसले द्यायचे? ह्या पत्रांत होतकरू लेखकाला मार्गदर्शन हा भाग अतितापदायक. 'सोबत माझी कथा पाठवली आहे. साहित्याच्या क्षेत्रात लुडबूड करण्याचा माझा अधिकार नाही, हे मला कळते, तरीही केली आहे. आपले स्पष्ट मत कळवावे.' या सर्व होतकरू लेखक, कवी, कथाकार वगैरेंना जर आपण लुडबूड करतो आहोत, असे प्रामाणिकपणे वाटले असते तर त्यांनी

* 'चायभले' आले, कारण मी पेंडशांची 'लव्हाळी' वाचत होतो. शंकर पाटील वाचत असतो तर 'आर हिच्या बायलीला' आले असते आणि भाऊ पाध्ये हाती असते तर नुसतेच 'आयला' उमटते.

कथाबिथा लिहिल्याच नसत्या. उगीचच लुडबूडबिडबूड लिहितात. मनात कुठेतरी गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर किंवा करंदीकरबिरंदीकर हे लोक वशिल्याने पुढे आले आहेत, असे असते. त्यापेक्षा कधीमधी 'माझी ही कविता छापवून आणण्याची खटपट करावी,' असे स्पष्ट पत्र येते, ते मला आवडते. ओळखीशिवाय हल्ली कामे होत नाहीत, हा अनुभव सर्वत्र आहे. तेव्हा साहित्यातही तसे असले पाहिजे, असे वाटण्यात चूक नाही. ह्या सल्ल्याच्या पत्रांत 'आपण लेखनाची पूर्वतयारी कशी करता?' हा एक प्रश्न अनेक इच्छुकांनी विचारला आहे. एकाने तर मला 'लेखनापूर्वी आपणांस काही विशिष्ट आहार करावा लागतो की काय?' ते विचारले होते. कोणी दिनचर्या विचारतात. कोणी टेबलावर फुले असली तर तुम्हांला अधिक उत्साह वाटतो का?–असेही विचारतात, आणि एकदोन पत्रांत मी लिहिण्यापूर्वी काही उत्तेजक पेय वगैरे घेतो की काय, हे विचारले होते. त्या बिचाऱ्याचे सारे लिखाण योग्य उत्तेजनापेक्षा योग्य उत्तेजक पेयाशिवाय अडून राहिले होते. मला ते करुण पत्र अजून आठवते. त्यातले शेवटले वाक्य तर 'टाहो' म्हणतात तसे होते : 'स्फूर्तीसाठी मी काय घेऊ?' (आणि मी हे पदरचे लिहीत नाही.)–'मी हॉर्लिक्स घेऊन पाहिले; पण काही उपयोग नाही.' हेही शेवटी होते. मी त्याला उत्तर लिहिले :

'प्रिय...तुमचे पत्र मिळाले. तुम्हांला कशा प्रकारचे लिखाण करायचे आहे त्यावर उत्तेजक पेय अवलंबून आहे. मात्र उत्तेजक पेय आणि त्या स्फूर्तीतून निघणारे साहित्य ह्यांचे प्रमाण व्यस्त असते. पावित्र्य, मांगल्य वगैरेंबद्दल ऊर बडवून बोलायला अगर लिहायला चोरून व्हिस्की प्यावी. सभासंमेलनांत मात्र दुधाची व्यवस्था ठेवण्यास सांगावे. स्वतःच्या घरी मांसभक्षण करू नये. अन्यत्र अवश्य करावे. ते अंगी लागते...' इ० इ०.


'मी हॉर्लिक्स घेऊन पाहिले; पण काही उपयोग नाही.'

हे उत्तर त्याला पाठवले नाही; कारण त्याने आपले वडील भलते रागीट असल्याचे कळवले होते. ते त्याला साधे उत्तेजनही देत नव्हते, तिथे उत्तेजक काय देणार कर्म!

मी काय लिहावे, ह्याच्या सूचना करणारीही पत्रे येतात. 'तुमच्यापासून आमच्या फार मोठ्या अपेक्षा आहेत...' वगैरे वगैरे. त्यांत मला दत्ताजी शिंद्यांवर स्फूर्तिदायक चरित्र लिहा, अशी ऑर्डर आली होती. एका उपवर मुलीच्या पित्याने तर माझे लेखन वाचून मला वाटणाऱ्या उपेक्षितांच्या कळवळ्याने गहिवरून पत्र पाठवले होते. हा कळवळा त्याला माझ्या पुस्तकात कुठे आढळला कोण जाणे! 'तुमच्या पुस्तकांत माणुसकीचा गहिवर



‘जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती’

आहे,’ हे वाचून मीच गहिवरलो. ‘तुमच्या कादंबऱ्यांतला (माझ्या कादंबऱ्या?) मानसकन्यांच्या दु:खाने तुम्ही विव्हळ होता...’ वगैरे वाचल्यावर गो० नी० दांडेकरांचे पत्र माझ्या नावावर आले, हे मी ओळखले; पण आप्पांना ‘तुमचे लेख वाचून हसता हसता आमची मुरकुंडी वळली!’ वगैरे मजकूर गेला असला तर त्यांचे काय हाल झाले असतील, ह्याची कल्पना करवेना. पण ह्या पत्रातला शेवटला परिच्छेद जरा अवघडच होता : ‘आपण दहा ठिकाणी हिंडत असता. माझ्या दोन कन्या लग्नाच्या आहेत. सोबत त्यांचे वर्णन व कुंडल्या पाठवीत आहे. त्यांना आपल्या मानसकन्या मानून, योग्य स्थळ पाहून द्यावे. ‘जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती’ हे, आपण जाणताच.’

माणसे लेख आवडल्याची पत्रे पाठवतात, नावडल्याचीही पाठवतात. न भिता पाठवतात. वाचकांना एखादा लेख आवडल्याची किती तऱ्हेतऱ्हेची कारणे असतात. इतकेच नव्हे, तर त्यांना आवडलेला लेख दुसऱ्याला आवडला नाही तर त्यांना चीडही येते. नुकतेच मला एक पत्र आले :

‘...परवा मी नाशिकहून सकाळच्या बसने मुंबईस येत होतो. समोर एक १०-११ वर्षांचा तरुण मुलगा बसला होता. सकाळी-सकाळी तो वाचत होता. ‘अपूर्वाई’! आणि त्याच्या तोंडावरची एकसुद्धा सुरकुती हलत नव्हती. जवळजवळ तासभर तो वाचत होता. जणू अर्थशास्त्रावरचे पुस्तकच. मला इतके आश्चर्य वाटले की, मी ताबडतोब आपणांस हे नवल कळवून टाकण्याचे ठरवले. आपण ह्या बाबतीत काही तरी कराल या आशेने. ज्यांना कळत नाही वा आपल्याला कळतेय, असा भाससुद्धा होत नाही, त्यांनी आपली पुस्तके वाचू नयेत. का ‘अपूर्वाई’ परीक्षेला लावलेय कुठल्या तरी? परीक्षेला असलेल्या पुस्तकांच्याबद्दल मनात नावड उत्पन्न होते. कृपया काढून टाका...’

मला त्या पत्रलेखकाचे मत पटले. लेखक एकदा परीक्षेला लागला की संपला. शेक्सपिअरबद्दलची चीड घालवायला मला कितीतरी वर्षे लागली. ‘अपूर्वाई’ परीक्षेला लागली होती की नाही, मला स्मरत नाही. कारण ती लागलीच तर एम० ए०ला वगैरे लागली असेल. म्हणजे खपाच्या दृष्टीने–‘इल्ले’! त्याला म्हणजे ‘मुलांचे बापूजी’ किंवा ‘मुलींच्या कस्तुरबा’च लिहिल्या पाहिजेत. असो. हे दु:ख निराळेच आहे. पण मला एकदा एका कॉलेजातल्या दहाबारा विद्यार्थिनींच्या (हो, विद्यार्थिनींच्या) सहीचे पत्र आले होते :



'पु० ल० देशपांडे ह्या खऱ्या नावाने लेख लिहावे.'

'...आपण विनोदी लेखक आहांत, अशी आमची समजूत होती. सिलेक्शनमध्ये आपला एक विनोदी निबंध आहे. शेवटल्या लेखकांच्या परिचयातही संपादकांनी आपला उल्लेख आघाडीचे व विनोदी लेखक, असा केला आहे. ही आघाडी आपण कोणाविरुद्ध उघडली आहे? (कारट्या काय वाह्यात होत चालल्या आहेत!–मी.) आमच्या प्राध्यापकांनी आपला विनोदी लेख आम्हांला शिकवला. आमची हसून हसून मुरकुंडी वळली. आपल्या लेखामुळे नव्हे, तर 'विनोदाचे सहा प्रकार' हा विषय घेऊन प्राध्यापकांनी केलेल्या वक्तव्यामुळे. कळवण्यास अत्यंत खेद होतो की, आमच्या प्राध्यापकांनी त्या सहा प्रकारांपैकी एकाही प्रकारात आपला विनोदी लेख बसत नसल्याचे आम्हांस टिपून दिले आहे. कारण आपल्या विनोदात कोल्हटकरांची सुधारणाप्रियता व भाषाप्राचुर्य नाही, (इथे आम्ही प्रथम हसलो.) गडकऱ्यांचा कोटीबाजपणा नाही, (दुसऱ्यांदा) चिं० वि० जोशांची सहजता नाही, (खो: खो:) आचार्य अत्र्यांची झेप नाही, (हशा व टाळ्या झाल्या.) आणि पु० ल० देशपांड्यांची अवलोकनशक्ती नाही.' शेवटी माझेही नाव वाचून मी आडवा झालो. त्या इब्लिस कारट्यांनी ता० क० मध्ये खुलासा केला होता : 'धड्यावर तुमच्या पु० ल० देशपांडे ह्या नावाऐवजी पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे असे कुठल्या तरी लेखकाचे सबंध नाव छापले गेले आहे. तरी यापुढे आमच्या गुरुजनांच्या सोयीसाठी पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे ह्या टोपणनावाने न लिहिता पु० ल० देशपांडे ह्या खऱ्या नावाने लेख लिहावे. म्हणजे सर्वांना हसायला सोयीचे होईल.'

आणि पत्राखाली चक्क बारा कुमारिकांच्या सह्या होत्या!

एखाद्या कौतुकाच्या पत्रातही नकळत वार झालेला असतो. एक पत्र होते. त्यात त्या माणसाने लिहिले होते : 'आपल्या विनोदी लिखाणापेक्षा आपले गंभीर लिखाणच मला अधिक आवडते. तरी यापुढे आपण गंभीरच लिहावे. अधिक प्रयत्न केल्यास ते आपणांस जमेल, असे माझे मत आहे. आज भारतमातेचे अश्रू पुसणारे लेखक हवे, असे मानणाऱ्यांपैकी मी एक आहे.'

ह्या भारतमातेने तर भलताच वैताग आणलाय. आमच्या ह्या मातेच्या पायांतल्या परदास्याच्या शृंखला काढल्या तरी तिचे अश्रू काही थांबायला तयार नाहीत. सुपुत्रांना हाक देणे आणि अश्रू ढाळणे हे एवढे दोनच कार्यक्रम करणारी ही माता जी एकदा 'तळहातीं ठेवुनीऽऽ या स्वशिरातें बैसली' ती काही उठून देवळात कुठे प्रवचनाला जाईल किंवा नातवंडांना खेळवील, नाव नको! त्या पत्रातल्या 'मानणाऱ्यांपैकी मी एक आहे' ह्या

वाक्यरचनेवरून पत्रलेखक ग्रामपंचायत–जिल्हा परिषद ते विधानसभा–ते सचिवालय टॉप फ्लोअर ह्या वाटेवरचा यात्रेकरू आहे, हे मात्र मी ओळखले.

सेनापती बापटांच्या निधनानंतर मी एक लेख लिहिला होता. या लेखानंतर मला खूप पत्रे आली. अनेकांना तो लेख आवडला. ह्याचे कारण सेनापतींबद्दलची अतोनात आपुलकी, हेच होते. एका गृहस्थाने मला तो लेख वाचून आपल्या मनाची काय अवस्था झाली ह्याचे वर्णन करणारे पत्र पाठवले होते :

'...मी आत्तापर्यंत मनापासून असा दु:खी कधीच झालेला नाही. नाही म्हणायला मी ज्या वेळी प्रथमच मॅट्रिकच्या परीक्षेला नापास झालो होतो, तेव्हा मात्र मला अगदी मनापासून हुंदका आला होता...आपला वरील लेख वाचून खरोखरीच मनापासून हुंदका आला आणि तो आवरता आला नाही...'

हे पत्र अतिशय मनापासून लिहिले होते. त्या अज्ञात वाचकाच्या साध्याभोळ्या अंत:करणाने लिहिलेले ते पत्र माझ्या मनाला चटका लावून गेले.

मनाला सुखवणारी पत्रेही येतात. एकट्याएकट्याने वाचतानासुद्धा संकोच वाटावा इतकी स्तुती असते. मनापासून दिलेले आशीर्वाद असतात. मागे मी आजारी झाल्याची बातमी वाचून एका गावातल्या अनोळखी गृहस्थाने शंकरावर अभिषेक करून मला प्रसाद पाठवला होता. कधी वडीलधाऱ्या लेखकाची शाबासकी असते. कधी समवयस्क साहित्यिक कार्डातून पाठीवर थाप देतो. कधी वृद्धांचा आशीर्वाद असतो; कधी त्यांचा संताप असतो; पण त्यामागे 'बाळ, तू असे काही लिहू नकोस. संत जेणें व्हावें, जग बोलणें सोसावें.' इ० इ०. लोकच आपल्याला फारशी चौकशी न करता संत वगैरे करून टाकतात. लोक तसे आपले निरनिराळे पुतळे करीत असतात. 'मी भयंकर माजलेला माणूस आहे', 'शिष्ट आहे', 'स्वत:ला शहाणा समजतो', अशी तऱ्हेतऱ्हेची आपली शब्दचित्रे बाजारात असावीत, हे ह्या पत्रांतून कळते.

मागे एका समारंभाला मी अध्यक्ष होतो. सकाळी नऊ वाजता स्टेजवर अध्यक्षीय खुर्चीत मला बसवले होते. बारा-साडेबारा वाजले तरी माझ्या अध्यक्षीय भाषणाची वेळच येईना. समोर प्रथम विद्यार्थ्यांचे जलतरंगापासून ते 'चलो जवानो! चलो किसान'-छाप संगीताचे कार्यक्रम. मी आपला मखरातल्या गणपतीसारखा फिक्स बसलेला. शेवटी बाराच्या सुमाराला मला बसवेना. मी उठून विंगमध्ये आलो आणि त्या कार्यवाहांना कां उठून आलो त्याचे कारण सांगितले. तिथे स्टेजवर भारतीय संगीताच्या भवितव्याचा परिसंवाद चालू असताना मला माझ्या भविष्याची चिंता वाटायला लागली होती. एका जागी चार-चार तास बसावे लागले तर माणसाचे काय होते? अध्यक्ष झाला म्हणून काय झाले? त्या कार्यवाहांनी मग जिथे न्यायचे, तिथे नेले. मग मी एक सिगारेट ओढून घेतली आणि परत जाऊन मखरात बसलो. दुसऱ्या-तिसऱ्या दिवशी मला पत्र आले. त्यात सन्माननीय पाहुणा असून मी जागा सोडून तिथून गेल्याबद्दल माझा निषेध केला होता. आता मी काय ऑडियन्सला करंगळी दाखवून तिथून उठायचे? आपल्या प्रत्येक हालचालीकडे जेव्हा

समाज पाहायला लागतो, त्या वेळी जी हैराणी होते, ती भोगणारालाच ठाऊक.

इतके असूनही जसे येते, तसे आपण लिहीत राहावे, तोंडाला रंग लावून नाचत राहावे, असे ज्यामुळे वाटते, अशीही पत्रे येतात. 'बटाट्याच्या चाळी'च्या प्रयोगानंतर असंख्य बरीवाईट पत्रे आली. एक पत्र अजून स्मरणात आहे. कुठल्याशा गृहस्थाच्या निधनानंतर त्याची पत्नी बाहेर कुठे जाणे तर सोडाच, पण घरातल्या दिवाणखान्यातदेखील येत नव्हती. कर्तेसवरते मुलगे होते. एके काळी अत्यंत आनंदात असलेल्या आईची उदासीनता त्यांना पाहवत नव्हती. निष्प्राण बाहुलीसारखी निमूटपणे कर्तव्य करणारी सौम्य अशी ती बाई पुन्हा एकदा तरी हसताना दिसू दे, असे त्यांना वाटे. एके दिवशी त्यांनी आपल्या आईला जवळजवळ सक्तीने माझ्या प्रयोगाला आणले आणि काही वेळानंतर तिला मोकळेपणाने हसताना पाहिले. त्या मुलाने मला पत्र पाठवून ही हकीगत कळवली होती. मला माझ्या प्रयोगाचे भारतीय रंगमंचाच्या इतिहासात काय स्थान आहे, माहीत नाही; पण नकळत जर माझ्या त्या प्रयोगातून सुकत चाललेल्या जीवनाच्या मुळांना झारीभर पाणी मिळाले असेल तर तेवढे यश मला रगड.

आताशा कविता बरीच चतुर, शहाणी वगैरे झाली आहे. त्यामुळे कवी यशवन्तांच्या ओळी उद्धृत करणे हे जुनेपणाचे लक्षण आहे. तो धोका स्वीकारूनही मला वाटते की, आम्ही सगळेच लेखक, कवी, कलावंत आपापल्या 'पाणपोया' खोलून बसलो आहो. पांथस्थांनी पाणीही प्यावे आणि जाता जाता 'दुवा'ही द्यावा, ही सगळ्यांची अपेक्षा आहे. वाचकांची पत्रे हा 'दुवा' घेऊन येतात. 'व्यक्ती आणि वल्ली'च्या प्रस्तावनेत मी 'माझे लेखन वाचकांना आवडले तर मला धन्यता वाटेल' अशा स्वरूपाचा मजकूर लिहिला म्हणून दिलीप चित्र्यांनी मला थाळी घेऊन केल्या खेळाबद्दल भीक मागणाऱ्या डोंबाऱ्याची उपमा दिली होती. मला वाटते की, ही थाळी कुणालाही चुकली नाही. प्रत्येकाच्या खेळ करण्याच्या जागा निराळ्या आहेत. थाळीत दिडक्या टाकणारे 'साहेब' निराळे आहेत. कुणी थाळ्या लपवून नेतात, कुणी उघड!

वाचकांच्या आणि प्रेक्षकांच्या पत्रांतून येणारा मनापासूनचा दुवा कुठला आणि नुसताच आगाऊपणा कुठला, हे अनुभवाने ओळखता येते.

जन्मभर आठवण राहावी, अशीही कधी कधी पत्रे येतात. 'दीपावली'च्या एका दिवाळी अंकात मी 'माझे खाद्यजीवन' नावाचा लेख लिहिला होता. त्याच वर्षी चिनी आक्रमण झाले होते. त्यात लगबगीने आघाडीवर जावे लागलेल्या एका जवानाचे मला पत्र आले. हा तरुण बिनतारी संदेशवाहक विभागात होता. ऐन दिवाळीत हिमालयाच्या बर्फमय प्रदेशात त्याची रवानगी झाली होती. अंगावरचे कपडे थंडीपासून बचाव करू शकत नव्हते. जाता जाता हाती लागतील ते एकदोन नवे दिवाळी अंक त्याने विकत घेतले होते. ते पेटवून त्यांची शेकोटी करावी, असा विचार आला आणि त्याने अंक बाहेर काढले. त्यांत चुकून 'दीपावली'च्या अंकात त्याला माझे नाव दिसले. त्याने त्या तसल्या कडाक्याच्या थंडीत तो लेख वाचला. पुढे तो सुखरूप आपल्या छावणीत आल्यावर त्याने

मला पत्र लिहून ही हकीगत कळवली होती. त्या पत्रात त्याने लिहिले होते :

'...त्या भयानक थंडीत कुडकुडताना आत्महत्येचे विचार डोक्यात येत होते. एकाकी जिणे आणि तसली भयंकर थंडी यांमुळे अत्यंत निराश झालो होतो. ही सारी यातायात कशासाठी करायची, तेच कळेनासे झाले होते. अंक पेटवणार इतक्यात आपले नाव वाचले. निदान मरण्यापूर्वी हसून घ्यावे म्हणून लेख वाचला. त्यातल्या खाद्यपदार्थांची आपण रसभरित वर्णने केलेली वाचल्यावर हे सारे खाण्यासाठी तरी जगलेच पाहिजे, असे वाटले. मरण्याचा बेत रद्द केला. शेकोटीसाठी अंकही जाळवेना. सुदैवाने बेसला सुखरूप परत आलो आणि आपल्याला धन्यवाद देण्यासाठी पत्र लिहिले. मी लेखक नाही. तरी वेडेवाकडे लिहिल्याबद्दल राग नसावा.'

त्याच लेखात मी चिवडेवाल्या छत्र्यांचा उल्लेख केला होता. हे मूळ छत्रे व्यवसायातून तीसपस्तीस वर्षांपूर्वी निवृत्त झाले होते. त्यांना कुणीतरी तो लेख दाखवला. त्यांचे मला पत्र आले. त्यात त्यांनी म्हटले होते :

'...मी व्यवसायातून निवृत्त होऊन तीस-पस्तीस वर्षे झाली. त्यामुळे माझ्या हातचा चिवडा आपण खाल्ला नसावा.' एवढ्यावर हे थांबले नाही. एके दिवशी पोष्टाने एक छोटासा डबा आला. सोबत पत्र होते : '...हा अस्सल माझ्या हातचा चिवडा. यापूर्वी लोकमान्य टिळक विलायतेला जाताना मी तो त्यांना सोबत न्यावयास दिला होता. बिपिनचंद्र पाल यांनाही दिला होता. आता तुम्हांला पाठवीत आहे...' मी तो चिवडा प्रसादासारखा खाल्ला. असली पत्रे आली की मला आनंद तर होतोच, पण भीतीही वाटते.

लेखक म्हणून किंवा नट म्हणून आपला काय वकूब आहे, ह्याची मला बरीच चांगली जाणीव आहे. एक नुसता वुडहाऊस वाचला किंवा 'गॅलिलिओ'सारखे नाटक वाचले की, आपण आपल्या गल्लीतले ब्रॅडमन आहोत, हे समजते. अशा वेळी एखादा पत्रलेखक इतक्या उंचावर नेऊन बसवायला लागला की त्याला एकच सांगावेसे वाटते की, ''बाबा रे, 'महान', 'थोर' वगैरे शब्द हल्ली विराटाघरच्या पांडवांसारखे अत्यंत अपमानाचे जिणे जगताहेत. ग्रामपंचायतीच्या अध्यक्षापासून ते राष्ट्रपतीपर्यंत सगळेच 'भार्ताचे थोर न्येते' आहेत. काही लिहिलेले, केलेले आवडले तर आनंदाची चिटोरेभर पावती पुरे. मानपत्र नको.'' (मानपत्राइतके खोटे आणि हास्यास्पद लेखन हस्तलिखित मासिकाच्या संपादकीयातदेखील नसेल.)

कधी कधी 'परमपूज्य', 'माननीय' असल्या पदव्या लावून पत्रे येतात. 'जागतिक कीर्तीचे महान व थोर ख्यातनाम साहित्यिक' असे एकदा पत्यावर लिहिले होते. 'विनोदसम्राट' तर आहेच. 'बटाट्याच्या चाळीचे मालक, मुंबई' अशा पत्त्याचेही पत्र आले आहे. क्वचित खऊटपणाने 'श्रीमान' असेही असते. 'नवकोटनारायण' असे एकदाच आले होते. एकदा मात्र नावापुढे कै० घालून पत्र आले, तेव्हा धक्काच बसला. मला नव्हे


''आपण ती नाकारू नये, अशी विनंती आहे.''

तर ते पत्र मला स्वत:ला घेताना पाहून पोस्टमनलादेखील! कुठल्या तरी मुलाला माझी स्वाक्षरी हवी होती. मी कै०चा खुलासा विचारला. उत्तर : 'आपण महाराष्ट्रातले थोर नाटककार असल्यामुळे कै० खाडिलकर, कै० गडकरी, कै० देवल ह्यांच्याप्रमाणे आपल्याविषयीच्या आदरभावनेने प्रेरित होऊन त्यांना मिळालेली पदवी आपणांस दिली आहे. आपण ती नाकारू नये, अशी विनंती आहे.' मी विनंती मान्य केली. पण ह्या सगळ्यांत अति छळवादी पत्रे म्हणजे नाही नाही ते खाजगी प्रश्न विचारणारी. एकाने विचारले होते :


''या प्रसंगात आपली विनोदबुद्धी कामी आली का?''

'...आपल्या जीवनातला अत्यंत दु:खाचा प्रसंग कोणता? या प्रसंगात आपली विनोदबुद्धी कामी आली का? विनोदाला कारुण्याची झालर आवश्यक आहे का? कृपया खुलासा व्हावा –आपला एक निस्सीम चाहता...'

चाहते निस्सीमच हवेत. एक तर मला तो 'कृपया' हा शब्द नको नको वाटतो. वरपांगी बुळबुळीत पण अंतर्यामी अति उद्धट. सभेत कोणी 'कृपया शांत राहा' म्हटले की, 'तुझ्या बैलाला हो' असे ओरडावेसे वाटते. 'जीवनातला अत्यंत दु:खाचा प्रसंग कुठला, काऽऽय?' मी त्यांना पत्र पाठवून दु:खाचा प्रसंग सांगितला :

'स० न० वि० वि०

आपले पत्र मिळाले. माझ्या आयुष्यातल्या अत्यंत दु:खाच्या प्रसंगाविषयी आपल्याला कुतूहल आहे, हे वाचून अतिशय आनंद झाला. माझ्या आयुष्यातला अत्यंत दु:खाचा प्रसंग म्हणजे मी जन्माला आलो तो. बेंबीच्या देठापासून रडरड रडत होतो. त्या काळी ईश्वराचे कृपेने आणि मायभवानीच्या आशीर्वादाने बेंबीला देठही होता. त्या प्रसंगी माझी विनोदबुद्धी नक्कीच कामी आली असावी. कारण माझ्या कचकावून चाललेल्या रडण्यातून

मी विनोदच निर्माण केला. माझे रडणे ऐकून भोवतालचे प्रेक्षक खूष होऊन हसले आणि त्यांनी साखर वाटली, असे मला स्मरते. मात्र ते लोक कोण होते, ते मी ओळखले नाही. त्या काळी मी दु:ख डोळे मिटून, रडून सहन करत असे. विनोदाला कारुण्याची झालरच काय, झालर, मेणकापड, गोधडी, अशा अनेक वस्तू जवळ हव्यात; परंतु सभेत विनोद करायचा असल्यास नुसत्या झालरीने भागणार नाही; सद्र्याखाली चिलखतही घालावे. कृपया ह्या वस्तू आसपास ठेवून विनोद करावा व नंतर थोडीशी कारुण्याची झालर लावावी किंवा दु:खाची गोधडी टाकावी. विनोदाखाली वेदनेचे मेणकापड घालायला मात्र विसरू नये.'

तापदायक पत्रांचे हल्ले परतवता तरी येतात; पण अगदी मनापासून मोठेपणा देणाऱ्या पत्रांना मात्र काय उत्तर द्यावे, ते कळत नाही. ही पत्रे साध्या भाषेत असतात. अशा पत्र-लेखकांना मला सांगावेसे वाटते की, मित्रांनो, आजवर जे लिहून झाले, त्यापेक्षा जे झाले नाही, त्याचे दु:ख मोठे आहे. ते दु:ख कुणाला सांगायचे? आणि सांगून पटणार कोणाला? लोकांनी आपापल्या मनाने माझ्या ज्या प्रतिमा केलेल्या असतील, त्यांत असले काही दु:ख असलेला माणूस, ही प्रतिमा असणारच नाही. कारण असली प्रतिमा पुजायच्याही लायकीची नाही की चिखल फेकायच्याही लायकीची नाही. सार्वजनिक जीवनातल्या माणसांच्या प्रतिमांचे दोनच उपयोग : एक उत्सवाला शोभा आणण्यासाठी वापरणे किंवा चिखल फेकायला लक्ष्य म्हणून स्वत: उपयोग करणे अगर कोणी केलेला असल्यास ती मजा चवीने पाहणे. पण मिळालेले नाव अगर कीर्ती लिलिपुटियन्सच्या जगात आपण गलिव्हर आहोत, एवढ्याच मर्यादित अर्थाने स्वीकारायची जाणीव असलेला लेखक किंवा कलावंत असू शकतो, हे सामान्यत: कुणाला पटत नाही.

'...आपल्या आगमनाची सारा गाव प्रतीक्षा करतो आहे...' हे वाक्य बोलणाऱ्या कार्यवाहाच्या डोळ्यांतील 'काय साल्याला बटर लावून राहिलो आहे...' ही धूर्त भावना आम्हांला सवयीने ओळखता येते. ह्याच्यावर सहसा कोणी विश्वास ठेवत नाही. गौरवाची आवडही नाही आणि नावडही नाही, अशी काहीतरी, ही सदैव मुंबईत मे महिन्यात सकाळीच उकडत असते, त्या वेळी होणाऱ्या त्रासासारखी भावना.

कौतुकाची पत्रे असल्या उकडण्यावर क्वचित फुंकर घालतात; पण घामोळ्याची चिडचीड वाढवणाऱ्या ह्या फुंकरी असतात. फुंकरीने जखम बरी व्हायची ती गार वाटता वाटताच वाहायला लागते. लेखक उपेक्षेने मरतो, त्याहूनही त्याच्या लेखनातून नकळत तयार होत चाललेल्या प्रतिमेच्या पूजेने अधिक लवकर मरतो. लेखकरावाचे जिणे अधिक भयानक होते ते असे. त्याला अपेक्षा नसताना नाव मिळते. आणि ज्या नामहीन अवस्थेत त्याने काही निर्मिती केलेली असते, ती अपरिचित निर्गुण-निराकारावस्था जाऊन तो सगुणसाकार होतो. त्याच्या मूर्ती होतात तऱ्हेतऱ्हेच्या. त्यांच्या पूजेचीही घाई आणि भजनाचीही. पूजा त्यालाही धुंदी आणते. आणि त्यातच तो लिहिण्याचे, न लिहिण्याचे स्वातंत्र्य गमावून बसतो! कारण न लिहिणारा लेखक म्हणून जितेपणी कै० होण्याची त्याला

सर्वांत मोठी भीती वाटायला लागते. प्रसिद्धीकडे नेलेले जुने पूल त्याला जाळून टाकावेसे वाटतात; पण ते जाळणेदेखील त्याच्या हाती नसते. प्रसिद्धिविन्मुख लेखक ही प्रसिद्धीची सर्वांत मोठी जाहिरात! जगापासून दूर दूर राहणारा लेखक माळावरच्या एकुलत्या एका झाडासारखा जगाचे लक्ष आपल्याकडे खेचून घेत असतो. त्याला गर्दीतला एक हालता-बोलता नगण्य ठिपका होता येत नाही. मनाच्या अशा अवस्थेत वावरताना पुन्हा सकाळच्या डाकेला कुठल्या तरी अज्ञात वाचकाचे पत्र येते : 'आपले हे पुस्तक म्हणजे मराठी भाषेला आपण चढवलेला अमोल अलंकार आहे. उत्तरोत्तर आपल्या हातून असले खूप लिखाण होवो. आपले यापुढील पुस्तक केव्हा येते, याची वाट पाहत आहो. आपल्या पुस्तकांच्या किंमती मात्र फार असतात.' (अमोल अलंकारदेखील स्वस्तात हवेत!)

आयुष्याकडे लेखक म्हणून गळ्यात फाटकी झोळी घेऊन आशाळभूतपणाने प्रत्यक्ष वा परोक्ष अनुभूतींची भीक मागणारा मी आणि त्या फोलपटाचा चिवडा खाऊन तृप्तीची ढेकर देणारे माझे प्रिय वाचक! माझा कविमित्र सुरेश भट याची एक ओळ आठवते : 'कशास एका भिकारड्याला पुकारतो हा दुजा भिकारी?' अजब सौदा आहे. हसूही येते आणि रडूही येते. वर मौज अशी की, रोजच्या डाकेत असले एखादे वाचक वा प्रेक्षकाचे पत्र आले नाही, तर नाही म्हटले तरी उदास वाटते.

मग हे असे कां? दोन्हींतही फारसा अर्थ नाही, हे आता कळत असते. गावोगावची ती सार्वत्रिक सभागृहे पाहिली की वाटते, ह्याच व्यासपीठांवरून अनेकांनी यापूर्वी वक्तव्ये केलेली आहेत. 'आजचा दिवस संस्थेच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिण्याचा आहे,' हे वाक्य तिथे शेवटच्या 'जनगणमन'इतक्यांदा यापूर्वी उच्चारले गेले आहे, हे सर्व ठाऊक असते. मानमरातब वा पदव्यांचा स्वीकार करताना कळत असते की, राष्ट्रपतींनी गेल्या वर्षी, त्यापूर्वीच्या आणि त्यापूर्वीच्याही वर्षी अशीच पागोटी आणखीही काही डोक्यांवर अशाच अलिप्ततेने चढवली आहेत. त्यांनी तरी नित्याच्या कार्यक्रमात उत्साहाने ॲक्टिंग कितीदा म्हणून करावे? लग्नाचा उत्साह वधूवरांना. भटजी दाढ्यासुद्धा धड करत नाहीत. ''हाताला हात लावा'' म्हटल्यावर पहिल्या (बहुधा) स्पर्शाने मोहरून जाणाऱ्या वधूवरांसारखे ते दृश्य पाहून प्रत्येक बोहल्यावर भटजीही मोहरून जाऊन त्यांच्या शेंडीचे केस ताठ उभे राहू लागले तर कठीणच व्हायचे. सार्वजनिक पदव्या किंवा गौरवाइतके तर बिनचेहऱ्याचे दुसरे काही नसेल. आणि म्हणूनच असेल कदाचित की, एखाद्या कार्डावर सुरेख अक्षरबिक्षर काढून जेव्हा कोणी लिहितो :

'...काल रात्रभर तुमची 'अपूर्वाई' वाचत होतो. खूप हसलो. मधून मधून हृदय हेलावले...' (ही साहित्यिक भाषा आमच्याच भाईबंदांनी बिचाऱ्याला शिकवली.)

माझ्या डोळ्यांपुढे काही काळापुरते का होईना, आपण कोणा अज्ञात माणसाला आवडणारी सोबत करत होतो, हा विचार सुखवून जातो. स्वतःची उंची उमजूनही असल्या कौतुकाच्या पत्रांची ओढ त्या धन्यतेच्या भावनेपोटीच जिवंत राहत असावी. म्हणूनच ही एवढीएवढीशी कार्डे आजही माझ्यातल्या निबर आणि निराश लेखकाला पुन्हा एकदा

नवखा करतात. प्रत्येक नवा लेख किंवा नवा प्रयोग किंवा रेडियोतला एखादा नवा कार्यक्रम होईपर्यंत अजूनही वाटणारी धडधड टिकवून धरतात–नव्हे, एका अर्थी अखंड मलाच टिकवून धरतात!



# काही साहित्यिक भोग

तुकारामबुवांनी हजारो ओळी लिहिल्या असतील; पण 'आलिया भोगासी असावें सादर' ह्याला तोड नाही. अभंग वगैरेमुळे भलता 'पब्लिक' होऊन गेलेला साहित्यिक. आता त्या काळच्या समीक्षकांनी त्यांची कविता नुसतीच 'पॉप्युलर' कविता आहे असे म्हणून त्याला साहित्यिक समीक्षेच्या कसोटीला न उतरणारा अभंगलेखक ठरवला असला तरी देवळादेवळांतून, जत्रेच्या फडांत वगैरे 'कवी, संगीतदिग्दर्शक तुकाराम देहूकर' अशीच जाहिरात होत असणार. अशा रीतीने पॉप्युलर झाल्यावर तुकोबाच्या नशिबी पब्लिक माणसाचे सारे भोग आल्याशिवाय कसे राहतील? तरी बरे, त्या काळी रेडियो नव्हता. वर्तमानपत्र नव्हते. नाही तर 'देहूसमाचार'च्या प्रतिनिधीने ''शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधानांच्या नेमणुकीबद्दल आपले काय मत आहे?'' इथपासून ''महाराष्ट्रातल्या लोकांनी किराणा-भुसाराच्या व्यापारात (आपण पडलात तसेच) पडावे का?'' इथपर्यंत नाना प्रश्न विचारले असते. 'दिवाळी अंकासाठी नवे अभंग लिहावे. पांडुरंग वगैरे पुष्कळ झाले...' अशी पत्रे आली असती. तुकारामाच्या आवलीची महिलांच्या मासिकात 'आमचे हे : एक ध्यान' ह्या विषयावर मुलाखत छापून आली असती. साहित्यिक तुकोबांच्या काळात हे 'भोग' नव्हते. तरीही 'आलिया भोगासी असावें सादर' ही ओळ त्यांनी लिहिली.

पण नव्या साहित्यिक भोगांची तुकोबांना त्या काळी स्वप्नातही कल्पना नसणार. त्यांच्या काळी साहित्यिकांकडून आमच्या काय अपेक्षा आहेत हे बजावणारे प्राध्यापक नसणार. तुकोबांनी यापुढे 'म्लेंच्छांच्या राजवटीविरुद्ध वीरश्रीयुक्त पोवाडे लिहिले पाहिजेत' हे बजावणारे पुढारी नसणार. तुकोबांची आर्थिक परिस्थिती आणि बाईल कर्कशा वगळली तर त्यांना 'लकी'च म्हणायला हवं. अर्थात रामेश्वरशास्त्र्यांची सेन्सॉरशिप वगैरे भोग त्याना भोगावे लागलेच होते.

पण ह्या नव्या साहित्यिक भोगांना सादर कसे व्हावे हा प्रश्न फारच जटिल (काय शब्द आठवला. 'जटिल'!! वा!!) झाला आहे. तरीही आम्ही तुकोबांचा मूळ उपदेश मानतो : ''आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालोनिया.'' भार घालायला देवासारखी

सोय नाही, हेही जाता जाता आम्ही नमूद करतो. (कुठे जाता? आपले म्हणायचे जाता जाता–एवढेच!)

बरे, हे भोग अमुकच ठिकाणी भोगावे लागतील असे नाही.

## भोग क्रमांक एक

स्थळ : पुणे शहरातील एक बस-स्टॉप.

पात्रे : 'खडूस' ह्याखेरीज मराठी भाषेतला दुसरा शब्द सुचू नये असल्या नमुन्याचे सत्तरीच्या घरातले गृहस्थ.

मी त्यांच्या बाजूला जाऊन रांग धरतो. आश्चर्य म्हणजे रांग नाही. आम्ही दोघेच. काही क्षण ते खडूस गृहस्थ आम्हांला खालपासून वरपर्यंत न्याहाळतात. आम्ही समोरच्या 'कारंडे टेलर्स'चे कारंडे एका लठ्ठ गृहस्थाच्या पोटाचे माप घेत असल्याचे सुखद दृश्य पाहण्याचा बहाणा करतो. इतक्यात कानावर आवाज :

ते गृहस्थ उपाख्य बाजी गणेश जोशी : दशभुजा गणपतीचं देऊळ कुठं आहे हो?

मी : काही कल्पना नाही बुवा.

बा० ग० जो० : पुण्यातच राहता ना? (ह्या प्रश्नावरून ते पुण्यात राहतात हे लक्षात आले.)

मी : हो.

बा० ग० जो० : किती वर्षे?

मी : बरीच.

बा० ग० जो० : काय व्यवसाय?

मी : पुस्तकं वगैरे लिहितो.

बा० ग० जो० : म्हणजे साहित्यिक. आणि तरीही तुम्हांला साधा दशभुजा गणपती ठाऊक नाही?

मी : आपण कुठल्या गावाहून आलांत?

बा० ग० जो० : मी कशाला कुठल्या गावाहून येतोय? इथेच जन्मलो. इथेच मरणार.

मी : ('कधी?'–हा प्रश्न गिळून.) इथेच मरणार कशावरून?

बा० ग० जो० : दशभुजा गणपती ठाऊक नाही हे सरळ सांगा. आमच्या मरणाची काळजी करू नका. तुम्हांला काही मी खांद्याला बोलावणार नाही.

मी : खांद्याची आमंत्रणं काय स्वत: मृताच्या सहीनं जातात वाटतं?

बा० ग० जो० : हे पहा, तुम्ही साहित्यिक असल्यामुळे भाषाप्रभुत्व हा तुमचाच जन्मसिद्ध हक्क मानायची गरज नाही. मीदेखील पुण्याचाच आहे. ज्या गावच्या बोरी त्याच गावच्या बाभळी. पुण्यात राहून स्वत:ला साहित्यिक म्हणवणाऱ्या माणसाला दशभुजा गणपती ठाऊक नसावा? ही तुमची समाजाविषयी आस्था. उद्या शनवारवाडा ठाऊक नाही



''ही तुमची समाजाविषयी आस्था.''

म्हणाल...परवा पर्वती ठाऊक नाही म्हणाल.

मी : तुम्हांला तरी कुठे ठाऊक आहे दशभुजा गणपती?

बा० ग० जो० : आ–हे!

मी : मग मला कशाला विचारताय?

बा० ग० जो० : तुम्हांला ठाऊक आहे की नाही ते पाहायला.

मी : पण दशभुजा गणपतीशी माझा काय संबंध?

बा० ग० जो० : सांगतो. 'पुणे शहरातील ढासळती धर्मभावना' ह्या विषयावर लेखमाला लिहितोय मी. ह्या ष्टापवर सकाळी सातपासून उभा आहे मी. बेचाळीस लोकांत दशभुजा गणपती ठाऊक असलेला एक निघाला. पण त्याचं देवळासमोर ष्टोदुरुस्तीचं दुकान आहे, गेली अकरा वर्षे. एकदाही आत दर्शनाला गेला नाही.

मी : म्हणजे दशभुजा गणपती फक्त पत्त्यापुरता.

बा० ग० जो० : हीच तर ट्रॅज्येडी. देवळांचा उपयोग पत्त्यासाठी? एकदा आम्ही विचारलं, 'डॉक्टर मंजुळाबाई सपाटे प्रसूतिगृह कुठे आहे?' तर तो गृहस्थ म्हणाला, 'सोमण मारुतीपुढे'! अरे, काही सारासारविवेकबुद्धी? अरे, निदान प्रसूतिगृहाच्या पत्त्याला तरी मारुतराय वापरू नका! काय?

मी : खरं आहे.

बा० ग० जो० : एक साहित्यिक म्हणून देवळात जाणं हे तुम्ही तुमचं कर्तव्य मानता की नाही?

मी : (देवावर भार घालून.) मानतो तर.

बा० ग० जो० : मग जाता का?

मी : दशभुजा गणपतीला नाही जात–

बा० ग० जो० : आय् ॲम् नॉट पर्टिक्युलर अबाउट धिस गणपती ऑर द्याट्! (रिटायर्ड म्हातारा भडकला की इंग्रजीत फुटतो.) एनी टेंपल फॉर द म्याटर ऑफ् द्याट्! (प्रत्येक 'द्याट'वर पाय आपटून.) रोज जाता?

मी : (देवा क्षमा कर. आपली जेव्हा भेट होईल तेव्हा खुलासा करीन.) हो. रोजच म्हणायला हरकत नाही.

बा० ग० जो० : मला होय की नाहीचा रकाना भरायचाय्–हो की नाही.

मी : (फर्गिव्ह मी ओ लॉर्ड!) हो. (आता हे खोटं नाही. रोज रात्री बुडकुले विठोबाच्या देवळात काणे भटजी, दाजीबा टेलर, सोपानराव हेअरड्रेसर आणि मी वरच्या नगारखान्यात रमी खेळतो. एक पैसा शंभर पाइंट. आषाढी-कार्तिकीला काणे भटजी पाइंट वाढवा म्हणतात; पण आम्ही ऐकत नाही.)

बा० ग० जो० : एक साहित्यिक ह्या दृष्टीने तुमची धर्मावर श्रद्धा आहे की नाही?

मी : श्रद्धा ही वस्तूच मुळी देव आणि धर्म यांच्यावर ठेवायला तयार केलेली आहे, असं माझं मत आहे. (गोल पोटावरून तळव्यापर्यंतचं पॅण्टीचं माप घेताना समोरच्या कारंडे टेलर्सनी टेप बेंबीपासून ओळंबा धरावा तशी सोडली आहे. हे मोहक दृश्य पाहायला मला टाईम न देता)

बा० ग० जो० : तुम्ही सरळ हो की नाही सांगा–

मी : हो. कारण धर्मावर श्रद्धा नाही ठेवायची तर काय मुन्सिपाल्टी, जिल्हाबोर्ड, बसवाले, हॉटेलवाले यांच्यावर ठेवायची?

बा० ग० जो० : तुम्ही कृपा करून वाक्याच्या शेवटीं पूर्णविराम येईल असं उत्तर द्या. शेवटी प्रश्नचिन्ह नको.

मी : (मुकाट्याने) बरं.

बा० ग० जो० : आता सांगा, धर्मावर तुमची श्रद्धा आहे की नाही?

मी : यथेच्छ. श्रद्धा आहे. धर्म नसता तर दसरा, होळी, दिवाळी, नारळी-पौर्णिमा– म्हणजे पुरणपोळी, कडबू, मोदक बघायलासुद्धा मिळाले नसते. सत्यनारायण नसता तर असला शेराला सव्वाशेर चपचपीत तुपाचा शिरा खायला मिळाला नसता.

बा० ग० जो० : तुमच्या बोलण्यात थट्टेचा सूर आहे. धर्म हा काय शिरा खाण्यासाठी आहे? (इथे बा० ग० जों०नी शिरा ताणून हा प्रश्न विचारला.)

मी : शिऱ्याशिवाय सत्यनारायण करून दाखवा. होडी बुडेल.

बा० ग० जो० : तो शिरा नसतो. प्रसाद असतो.

मी : सत्यनारायणाला खारीक वाटता येणार नाही. प्रसाद म्हणूनसुद्धा. माफ करा, पण तुम्ही मला छुपे कम्युनिस्ट दिसता.

(होतकरू साहित्यिकांस सूचना : मधूनमधून अशी टफ लाइन स्वीकारावी–कम्युनिस्ट कसे बिगरकम्युनिस्टांना प्रतिक्रांतिवादी म्हणतात? तीच स्टाईल.)

बा० ग० जो० : मी कम्युनिस्ट? दशभुजा गणपती कुठे आहे ते तुम्हांला ठाऊक नाही आणि मी कम्युनिस्ट?

मी : (पुण्यात नव्या एका देवाला जन्म देत) झोपाळू नरसोबाचं देऊळ कुठं आहे सांगा पाहू.

बा० ग० जो० : झोपाळू नरसोबा? पहिल्यांदाच ऐकतोय.

मी : झोपाळू नरसोबा पहिल्यांदाच ऐकताय काय?–सॉरी. प्रश्न आला. झोपाळू नरसोबांसारख्या जागृत देवाचं नाव पहिल्यांदा ऐकताय हे ऐकून आश्चर्य वाटलं. जाऊ द्या. मी नास्तिकांशी बोलत नसतो. सत्यनारायणाला खारका वाटायला निघाले आहेत. (होतकरू साहित्यिक, प्लीज नोट. वादाच्या प्रसंगी प्रतिपक्षाने न केलेल्या मुद्यावर जोर द्यावा.) सत्यनारायणाला खारका! उद्या गोकुळाष्टमीला केक वाटाल.

बा० ग० जो० : तुम्ही हे कुणाला सांगता आहांत?

मी : तुम्हांला! इथे दुसरं कोण आहे?–सॉरी, दुसरं कोण नाही पूर्णविराम.

बा० ग० जो० : आपला काही तरी गैरसमज होतोय. आपण राहता कुठे?

मी : (इथे खरी कसोटी आहे. डिटेलवार पत्ता देऊन गोंधळात टाकण्याच्या शास्त्राचा अभ्यास असल्याखेरीज ह्या कसोटीला उतरता येत नाही.)–तुम्हांला झोपाळू नरसोबा ठाऊक नाही. बरं, रेडेकर तालीम ठाऊक असेल.

बा० ग० जो० : ती कुठेशी आली?

मी : रविवारात. घाणेकरांच्या कोळशाच्या वखारीला लागून.

बा० ग० जो० : काढीन शोधून. घाणेकर तालीम...

मी : घाणेकर तालीम नाही–घाणेकर कोळशाची वखार. त्याला लागून रेडेकर तालीम. रास्ते वाड्यावरून खाली या सरळ. (इथे खाली येणे याचा हवा तसा अर्थ घ्यावा.) तिथे घाणेकर वखार विचारा. तिथे घाणेकरांना विचारा पापडवाले बेंद्रे कुठे राहतात ते. पापडवाल्या बेंद्र्यांच्या वाड्यावरून गल्ली जाते. तिच्या टोकाला माशाळकर बखळ. (गल्लीला दोन टोके असतात हे विसरणे.) माशाळकर बखळीत विचारायचं, संपतराव लाँड्री कुठे आहे.

बा० ग० जो० : जरा सावकाश सांगा. मी लिहून घेतोय. आताशा कापडवाले बेंद्रेपर्यंत आलोय–

मी : कापडवाले बेंद्रे नाही, पापडवाले. तिथे सोवळ्यातले पापड मिळतात. मग माशाळकर बखळ. मग संपतराव लाँड्री.

(बस येईपर्यंत बा० ग० जो०ना घुमवायच्या बेताने) संपतराव लाँड्रीत सोनबा आहेत का

विचारायचं. ते तुम्हांला भोरप्यांचा वाडा दाखवतील.

बा० ग० जो० : भोरप्यांचा? थांबा जरा. सावकाश सांगा.

मी : सावकाश काय सांगा–बस आली म्हणजे?

बा० ग० जो० : बस कशी येईल?

मी : म्हणजे?

बा० ग० जो० : हा बसस्टॉप क्यान्सल झालाय.

मी : काय म्हणता?

बा० ग० जो० : अहो, पंधरा दिवस झाले–हा वन वे झालाय. इकडून प्रवेश बंद. एक तरी बस तिथून येऊन तिथे गेली का?

मी : मग मघाशी कां नाही सांगितलंत?

बा० ग० जो० : वा! मग तुम्ही थांबला असतात का? आणि काय हो, साहित्यिक असून तुम्हांला गावातले वन वे ठाऊक नाहीत? कमाल आहे. काय नाव तुमचं?

मी : (स्वत:चे नवे बारसे साजरे करत.) गोविंद गोपाळ दहिभाते.

बा० ग० जो० : आजच हे नाव ऐकतोय.

मी : मीसुद्धा! (बा० ग० जो० शुद्धीवर आहेत की बेशुद्ध पडले ते न पाहता मी सटकतो. तात्पर्य, देवावर भार घालूनसुद्धा भोग सुटतोच असे नाही.)

## भोग क्रमांक दोन

शिक्षणपद्धतीत बदल व्हायला हवा ही मानवी इतिहासात पहिली शाळा निघाली तेव्हापासूनची तक्रार आहे. हल्लीची पिढी बिघडली हे आदमने ईव्हला म्हटले होते, असे परवाच कुठेसे वाचले. ('परवाच कुठेसे वाचले' हे पळवाटीचे वाक्य शोधून काढणाऱ्या आद्य साहित्यिकाला आमचे दंडवत प्रणाम.) शिक्षणपद्धती बिघडो की सुधारो, ह्या पद्धतीत विद्यार्थ्यांचे हस्तलिखित मासिक केव्हा शिरले कोण जाणे. आता हा साहित्यातला उमलत्या कळ्यांचा भुंगा गळत्या कळ्यांच्या मागे कसा लागतो तो भोग पाहा :

स्थळ : आमचे तीन खोल्यांचे घर.

पात्रे : मुख्य पात्र मी.

शिवाय 'बालकिरण' हस्तलिखिताचे बाल संपादकमंडळ. एकूण तिघांचे. त्यात एक इयत्ता दहावी (क) मधील वर्गभगिनी कु० कुणीतरी. ती मुळी आमचा हॉल कम् बेडरूम हा फोटोग्राफरचा स्टूडिओ असावा अशा समजुतीने यत्किंचितही हालचाल न करता आणि चेहऱ्याची घडी बिघडली तर इस्त्रीला टाकावा लागेल अशा भीतीने बसल्यासारखी पोज घेऊन बसते. उरलेल्या दोन संपादकांचे वय आवाज नुकताच फुटतो त्या सुमाराचे. आता हा 'भोग' मुलाखतीचा. ही मुलाखत शक्य तितकी जोडाक्षरविरहित द्यावी असे अनुभवाने आमच्या ध्यानात आले आहे. लेखन म्हणावे; वाङ्मय म्हणू नये. त्याचे 'वांगमय' होते. काही काही शब्दांतून त्या हस्तलिखित मासिकात सत्याच्या अधिक जवळ जाणाऱ्या चुका

होतात. उदाहरणार्थ, साहित्याची 'मूढभूत' प्रेरणा, साहित्यातील 'समीक्ष शहा', नवकथेचे 'आढ्य'प्रवर्तक, इ० इ०. तरीही शेवटी आपली मुलाखत कशी अवतरेल हे सांगणे अशक्य. उदाहरणार्थ : 'बालकिरण'मधली माझी मुलाखत पाहा. त्यात बालचित्रकार ऊर्फ भावी रंगसम्राट अरुण खोडवे (इ० ११ वी, ब) यांनी बाबू जगजीवनराम, डॉ० लोहिया किंवा मार्शल टिटो यांच्यापैकी कुणाच्या तरी चित्रावरून पेन्सिल, कोळसा आणि अर्थातच रबर घासून चित्र काढले होते. त्याखाली 'ओळखा पाहू' असे शीर्षक. (चित्राच्या तळाशी मजकूर लिहितात त्याला खरे तर 'तळक' म्हणायला हवे. किंवा वर देतात तो मथळा असल्यास लेखामध्ये आल्यावर 'कोथळा' आणि खाली दिल्यास 'लाथ-ळा' म्हणावे.) पान सत्तावन पाहा म्हटल्यावर मी त्या पानावर गेलो. त्यावरून ते चित्र आमचे होते हे उघडकीला आले. मी मुलाखत दिली होती ती येणेप्रमाणे :

बालसंपादक कुमार अजित रेवणकर : हल्लीच्या शालेय विद्यार्थ्यांबद्दल आपल्याला काय वाटतं?

मी : ('कान उपटून अभ्यासाला बसवावं, असं वाटतं'–हे उत्तर गिळून) मला अभिमान वाटतो. विद्यार्थ्यांची प्रत्येक क्षेत्रातली प्रगती पाहून मी थक्क होतो–आणि विद्यार्थिनींचीही. (इथे ती बालसंपादिका जरा तरी गाल वाकडा करील असे वाटत होते. पण छे!)

बालसंपादक : आपला आवडता लेखक कोण?

मी : (अर्भकांनो, या प्रश्नाचं तुम्हांला कुठल्याही हाडाच्या, रक्ताच्या, अश्रूच्या किंवा चरबीच्यासुद्धा साहित्यिकाकडून कधीही खरे उत्तर मिळणार नाही.) आता खरं सांगायचं, तर माझा आवडता लेखक अमुक एक असं सांगता येणार नाही. पण कालिदास, भवभूती, शेक्सपिअर, टॉल्स्टॉय, ज्ञानेश्वर, व्हाल्टेअर, रूसो, बर्नार्ड शॉ...(हस्तलिखितात टॉल्स्टॉयचा 'स्टॉलटॉय' आणि बर्नार्ड शॉचा 'बलाढ्य शहा' असे झालेच. मी ह्या यादीत आणखीही चारपाच युरोपीय लेखक घुसवले होते, पण संपादकांना त्यांची नावे टिपता आली नव्हती.)

बालसंपादक : हरी नारायण आपट्यांविषयी आपलं काय मत आहे?

मी : (असे बोला. दिवंगत साहित्यिकाला आकाशापर्यंत पोहोचवायची आपली तयारी आहे.) हरी नारायण आपटे, राम गणेश गडकरी, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यासारखे साहित्यिक पुन्हा होणार नाहीत.

बा० सं० : आपल्याला सुरुवातीच्या काळात खरं मार्गदर्शन कोणी केलं?

मी : माझे शालेय गुरुजी घोडेगावकर सर यांनी...('गधड्या! ऐक माझं. असल्या काऊचिऊच्या गोष्टी लिहिण्याऐवजी जरा अभ्यास कर. पुस्तक लिहून कधी कोणाचं भलं झालंय?'–माझ्या त्या घोडेगावकर सरांचं हे मार्गदर्शन त्या वेळी ऐकलं नाही म्हणून तर हे भोग.) घोडेगावकर सर म्हटले की तेथे कर माझे जुळती. (वास्तविक ह्या घोडेगावकर सरांनी मी मॅट्रिकच्या वर्गात असताना चौदा मुलींच्या देखत मला बाकावर उभे केले होते. पण मुलाखतीत मात्र–) घोडेगावकर सरांनी मला जीवनाचं विहंगमावलोकन करायला



शिकवलं. (हस्तलिखितात 'विहंगमावलोकन'चे 'हंगामी लेखन' करायला शिकवले असे लिहिले होते.)

बा० सं० : आपला आवडता छंद कोणता?

मी : पोष्टाची तिकिटं जमवणं. डोंगर चढणं. काड्याच्या रिकाम्या पेट्या गोळा करणं. जुनी नाणी गोळा करणं.

यावरील बा० सं०चे भाष्य : ''आम्ही हा संग्रह पाहावयास मागितला त्या वेळी काकांनी आम्हांला जी करुण कहाणी सांगितली ती तर हृदयद्रावकच होती. काका म्हणाले, 'ती एक करुण कहाणी आहे. माझे हे सारे संग्रह पानशेतच्या पुरात वाहून गेले.' '' (डझनभर साहित्यिकांची न केलेल्या संशोधनाची हस्तलिखिते वाहून गेली, तर आपण कधीही न केलेला संग्रह पुरात ढकलून दिला म्हणून काय बिघडले?) ''काकांच्या तोंडून ही कथा ऐकताना आमचेही डोळे पाणावले. म्हणून आम्ही म्हणालो, 'आपल्याला खूप दुःख झाले असेल...' ''

मी : लहानपणापासून कसलेही दुःख पचवण्याची सवय आमच्या आजोबांनी आम्हांला लावली. (त्यांनी आम्हांला पहाटे उठा, अभ्यास करा, शिवाय हे करा–इथे जा, हे आणा, तिथे जा, ते आणा–अशी नाना दुःखे द्यायची आणि आमची दुःखांची पचनशक्ती

वाढवायची ही आमच्या घराण्याची परंपरा ह्या नव्या पिढीला कशाला सांगा?)

बा० सं० : मग आता पोष्टाची तिकिटे वगैरे जमवता का?

मी : नाही. आता मधूनमधून नाणी जमवतो. (बाळानो, त्याशिवाय दुपार टळत नाही हे तुम्हांला आणखी आठ-दहा वर्षांत कळेल.)

बा० सं० : आपला आवडता खेळ कुठला? (बालसंपादक-मंडळ 'आवडत्या'-पलीकडे सहसा जात नसते.)

मी : मला सर्वंच खेळ आवडतात (साहित्याच्या रिंगणात 'चिखलफेक' हा एक अत्यंत लोकप्रिय खेळ आहे हे तुम्हांला आता सांगण्यात अर्थ नाही.) पण क्रिकेट हा माझा आवडता खेळ. आमच्या कॉलेजच्या टीममध्ये मी होतो. (स्कोअररचा मदतनीस हा तपशील सांगितला नाही.) जाऊ दे, ती एक निराळीच कथा आहे.

बा० सं०चे हस्तलिखित भाष्य : 'आपण क्रिकेट कां सोडला हे काकांनी आम्हांला सांगितले नाही. पण त्या कथेतली व्यथा आम्हांला जाणवली.' (बालसंपादकाच्या हाती मराठीतला समीक्षात्मक लेख कधी तरी लागलेला दिसतो. एरवी कथा-व्यथाचा प्रास त्याला ह्या वयात सुचू नये.)

बा० सं० : आपला आवडता नट कोणता?

मी : ॲखिम टिमेरॉफ. तुम्ही नाव ऐकलंच असेल.

बा० सं० : हो, हो...(होणार, हा पोरगा नक्की पत्रकार होणार. ह्याच्या जन्माआधी ॲखिम टिमेरॉफ थडग्यात गेला होता. हस्तलिखितात 'ॲखिम टिमेरॉफ'चा 'अफीम टिमेराव' झाला होता.)

बा० सं० : लेखक व्हायला काय पूर्वतयारी करावी लागते?

मी : (कोरे किंवा शाळा-कॉलेजांत परीक्षक होण्याचा चान्स मिळत असल्यास पाठकोरे कागद साठवून ठेवावे लागतात. पेनमधे शाई भरावी लागते.) पूर्वतयारी? सतत चिंतन. साहित्यिक जीवनासंबंधी विचारग्रस्त असावा लागतो. (हस्तलिखितात 'विचार गृहस्थ' झाले होते.)

बा० सं० : आपण चिंतन केव्हा करता?

मी : भल्या पहाटे.

बा० सं० : लेखकाने पहाटे उठायला हवं का?

मी : (अर्थात म्हणजे काय दूधवाला आहे?) अर्थात! जगातले सारे लेखक पहाटेच उठायचे. शेक्सपियर पहाटे पाच वाजता उठून, ॲव्हन नदीत स्नान करून, चर्चला तीन प्रदक्षिणा घालायचा आणि मगच नाटक लिहायला बसायचा, असे मी अलीकडेच कुठेसे वाचले आहे. लंडनला रहायला आल्यानंतर त्याची टेम्स नदीची आंघोळ आणि सेंट पॉलच्या चर्चची प्रदक्षिणा चुकली नाही. (हस्तलिखितात टेम्स नदीची 'टाईम्स' नदी आणि सेंट पॉलच्या चर्चचे 'सँपलचे चर्च' झाले होते.)

बा० सं० : काका, तुमच्या आयुष्यातला अविस्मरणीय आनंदाचा प्रसंग कुठला?

मी : पुष्कळ आहेत. (खरे प्रसंग : (अ) गेल्याच आठवड्यात शेजारच्या शेंडे डॉक्टरांचे रात्रंदिवस भुंकून उच्छाद मांडणारे कुत्रे मेले. (ब) वरच्या गोखल्यांची सुमी त्यांच्याच ड्रायव्हरचा हात धरून पळाली. (क) आमचे किराणाभुसारवाले गणूशेट (ॲण्ड सन्सचे फादर) यांनी मोड परत करताना वीस पैसे अधिक दिले...किती म्हणून अविस्मरणीय प्रसंग सांगावे? पण ह्यांत साहित्यिक अविस्मरणीयता नाही.) माझ्या आयुष्यातला अविस्मरणीय आनंदाचा प्रसंग म्हणजे एस०टी० स्टँडवरून एका वृद्ध बाईची भाजीची टोपली मी स्वत: उचलून डोक्यावर घेतली आणि स्वारगेटापासून मंडईपर्यंत तिला सोबत केली. (न्या० मू० महादेव गोविंद रानडे यांच्या आत्म्याने मला क्षमा करावी. त्यांनी एका म्हातारीच्या टोपलीला उचलायला हात लावल्याची कथा मी वाचली होती. ती सत्यकथा मी ललित केली एवढेच. कथेचे बीज फुलवून तिला गतिमान करणे म्हणजे नाही तरी दुसरे काय असते?)

बा० सं० : हल्लीची तरुण पिढी बेजबाबदार झाली आहे का?

(हा प्रश्न त्यांच्या हेडमास्तरांनी लिहून दिलेला असावा. पाहुण्याच्या हातून विंचू मारायचा डाव आम्ही ओळखत नाही की काय?)

मी : भलतंच? हल्लीच्या तरुण पिढीइतकी जबाबदार पिढी मी यापूर्वी कधीही पाहिली नाही. (संपादक मंडळ खूष!)

बा० सं० : भारताचं भवितव्य तरुण पिढीच्या हातात असावं का?

मी : अर्थात. (आपल्या 'बा'चे काय जाते!)

बा० सं०नी जोडलेले शेपूट : ''हल्लीचे वृद्ध आता म्हातारे झाले आहेत'' असे काकांचे स्पष्ट मत ऐकून आम्हांला आनंद झाला. आम्ही काकांचा निरोप घेतला. हास्यविनोदाच्या लहरींवर पोहण्यात आमचा वेळ कसा गेला ते आम्हांला कळले नाही. ''उद्याच्या ज्ञानेश्वर-गोविंदाग्रजांनो या...'' हे काकांचे वाक्य आमच्या कानांत घुमत होते.

## भोग क्रमांक तीन

स्थळ : आमचे घर. वेळ : रात्रीचे दोन. टेलिफोनची घंटा वाजते. आम्ही दचकून उठतो. छातीवरील प्रा० कादंबिनी किरमिजे यांचा लेख असलेले—सॉरी, छातीवरील 'प्रायोगिक रंगभूमीवरील नवीन समस्या' हा कादंबिनी किरमिजे यांचा लेख असलेले मासिक खाली पडते. निद्रानाशावर त्यांचे लेख हा एक अक्सीर इलाज आहे.

टेलिफोन : ट्रिंग...ट्रिंग...

मी : हलो—

टेलिफोन : मी दैनिक 'जनजागरण'मधून बोलतोय.

मी : बोला.

जनजागरण : आपली प्रतिक्रिया हवी आहे.

मी : कोण गेलं हो?

जनजागरण : गेलं नाही कुणी.

मी : मग कसली प्रतिक्रिया? (एके काळी कुणी आटोपले की 'क्रिया' करण्यात माणसे गुंतायची. आता 'प्रतिक्रिया'ही करावी लागते.)

जनजागरण : कापूस एकाधिकार योजनेसंबंधी जे सरकारचे धोरण आहे त्यासंबंधी तुमची एक साहित्यिक म्हणून प्रतिक्रिया हवी.

मी : (अद्यापीही मी त्या लेखरूपी झोपेच्या गोळीच्या अमलाखाली आहे की काय अशी शंका येऊन) कापूस एकाधिकार योजना?

जनजागरण : यस्!

मी : कुणाला फोन करायचा होता आपल्याला?

जनजागरण : आपल्यालाच! एक साहित्यिक म्हणून प्रतिक्रिया हवी आहे.

मी : पण कापूसखरेदीतलं मला काय कळतंय?

जनजागरण : साहित्यिक असून ह्या ज्वलंत प्रश्नाकडे आपलं लक्ष नाही?

मी : कापूस ही एक ज्वलंत वस्तू आहे एवढं मला ठाऊक आहे.

जनजागरण : विनोद न कराल तर बरं होईल.

मी : कुणाचं? आज कापसावर प्रतिक्रिया विचारलीत, उद्या कोळशावर विचाराल.

जनजागरण : पण एक साहित्यिक म्हणून तुमच्याकडून आमच्या अपेक्षा आहेत–

मी : अहो, त्या पुऱ्या करायचा आम्ही कागदावर प्रयत्न करतो–कापसावर नव्हे.

जनजागरण : पुन्हा तुम्ही विनोदात शिरताय...'जनजागरणा'ला ह्याचा गंभीरपणाने विचार करावा लागेल.

मी : प्लीज...असं काही करू नका. रातपाळीच्या वेळी गंभीर विचार करायला लागलात तर झोप येईल. काही नोकरीचा विचार करा.

जनजागरण : (दाबात) म्हणजे कापूस एकाधिकार योजनेबद्दल तुम्ही तुमच्या प्रतिक्रिया व्यक्त करणार नाही तर–

मी : अशी प्लीज दमदाटी वगैरे नका करू. तुम्ही सांगा ना तुमची प्रतिक्रिया काय ते.

जनजागरण : आम्हांला जनतेच्या प्रतिक्रिया हव्यात–

मी : तुम्ही जनता नाही वाटतं?

जनजागरण : आम्ही या क्षणी पत्रकाराच्या भूमिकेत आहोत.

मी : आम्हीही अवेळी झोपेतून जागं केलेल्या माणसाच्या भूमिकेत आहोत–थांबा थांबा...ही घ्या प्रतिक्रिया...कापूस एकाधिकार योजना हे शब्द कानी पडल्याबरोबर मला खडबडून जाग आली. मी म्हणालो, हे काय चाललंय?'' एवढं पुरे ना?

जनजागरण : जस्ट ए मिनिट्...हो...सोळा शब्द आहेत. बरोबर बसताहेत...थँक्यू.

## भोग क्रमांक चार

स्थळ : आणखी कुठले?–आमचेच घर. आम्ही सकाळच्या वर्तमानपत्रातील राशिभविष्य वाचत आहो. दारावरची घंटी वाजते. चारपाच मंडळी आत येतात. त्यांतले...

चष्मेवाले : नमस्कार. म्हटलं भेटता की नाही.

मी : या–बसा. थांबा. खुर्ची आणतो.

चष्मेवाले : राहू द्या...ह्या खुर्चीवर आम्ही दोघे बसतो. (मी उभा. बाकीचे बसतात.)

मी : बोला, काय हुकूम आहे?

चष्मेवाले : आपल्याकडे एक समस्या घेऊन आलो आहो.

मी : कसली?

चष्मेवाले : त्याचं काय आहे? आज पंधरा दिवस झाले–आमच्या गल्लीच्या नाक्यावरचा कचरा उचलायला मुन्सिपाल्टीची गाडी आली नाही.

टक्कलवाले : आजचा सोळावा दिवस.

केसवाला तरुण : हे पहा...कचऱ्याच्या ढिगाचे फोटो.

मी : बाप रे!

गांधी टोपी : आपण साहित्यिक आहांत. ह्या विषयावर आपण एक नाटक लिहून द्यावं अशी विनंती करायला आम्ही आलो आहो.

मी : (क्षीण स्वरात) कचऱ्यावर नाटक?

टक्कल : ही एक सार्वजनिक समस्या आहे. त्या दृष्टिकोनातून एक साहित्यिक ह्या दृष्टीने आपण कचरा हा विषय हाताळायला हवा.

चष्मा : सर, जरा थांबा...साहेब, हे प्राध्यापक खोळेकर–खोळेकर क्लासिसचे मालक.

मी : आपलं नाव ऐकलंय...(ही आमची पेटंट प्रतिक्रिया.)

टक्कल : साहित्यिक ह्या नात्याने आपण आपले कर्तव्य मानत असालच.

मी : ('असे काय लेको'–हे वाक्य आवरून.) अर्थात. कर्तव्य ही गोष्ट समाजात साहित्यिक आणि प्राथमिक शाळामास्तर यांनीच केली पाहिजे असं माझं मत आहे. डॉक्टर, वकील, व्यापारी यांना कर्तव्य काय जमणार?

चष्मा : आता कसं बोललात? काय मी म्हणालो होतो की नाही, साहेब आपलं काम केल्याशिवाय राहणार नाहीत म्हणून.

मी : मग 'कचरा' ह्या समस्येवर नाटक पाहिजे म्हणता?

केस : प्रायोगिक पद्धतीने लिहा.

गांधी टोपी : ए अरण्या, नाटक कसं ल्याहावं हे तू साह्यबाला सांगतोस होय रे गधड्या! साहेब, भाचा माझा. नाटकात काम झकास करतो.

मी : आपलं नाव काय?

केस : अरुण घोसाळकर.

मी : ऐकल्यासारखं वाटतंय.

केस : प्रायोगिक रंगभूमीबद्दल आपलं काय मत आहे?

गांधी टोपी : अरण्या, तुला काय विचारायचं ते पुन्हा कधीतरी येऊन विचार. आधी कचऱ्याच्या समस्येचं बोलू या.

चष्मा : यस्. तर साहित्यिक ह्या नात्याने आपण कचऱ्याचे ढीग साफ करण्याची मोहीम हाती घ्यायला हवी, असं आम्हांला वाटतं.

टक्कल : आपण स्त्रीपात्रविरहित लिहा. आमच्या आळीत नाटकातल्या कामाला बायका मिळत नाहीत.

मी : म्हणजे कचरा टाकायला फक्त पुरुष येतात, असं दाखवावं लागेल.

गांधी टोपी : तसं काही नको, साहेब. दोनचार बाया घाला अन् ड्यान्स टाका. आपल्या आळीत सैदू ढोलचीवाला ऱ्हाहातो—तो जमवील त्येवढ्यापुरतं. आपण काय, बाईची नाइट् देऊ—का हो सर?

टक्कल : यस्! (टक्कलवाले आळीचे 'सर' आहेत.) लोकनाट्याच्या माध्यमातूनच कचऱ्याची. समस्या उभी केली पाहिजे.

मी : पण नाटक लिहायला मला महिनाभर तरी लागेल. कारण सध्या मी रस्त्यातल्या खड्ड्यांच्या समस्येवर कादंबरी लिहितो आहे. 'खड्ड्यात जा' नावाची. कचऱ्याची समस्या रस्त्याशी निगडित असली तरी फार व्यापक आहे. महिन्यानंतर ते आपण बसवायला घेणार. मधल्या काळात कचरा साफ झाला तर समस्येची तीव्रता राहणार नाही. काय सर? (टक्कलवाल्यांना आम्ही 'सर' करून टाकले.)

टक्कल : बरोबर. त्यासाठी तो कचऱ्याचा ढीग हलवला जाणार नाही याची काळजी घ्यायला हवी.

मी : तुमच्या नगरसेवकांना हे सांगून ठेवा.

गांधी टोपी : नगरसेवकांचं प्रतिनिधिमंडळ सध्या मुन्सिपाल्टीच्या खर्चानं काश्मीरला गेलंय—

मी : काश्मीरला?

गांधी टोपी : श्रीनगरमधल्या कचऱ्याची समस्या पाहायला.

चष्मा : चैन करतायत जन्तेच्या पैशावर.

गांधी टोपी : असं नका बोलू. ज्याचं त्याचं नशीब आहे. काय साहेब?

मी : खरं आहे. काश्मीरसारख्या फुलांच्या देशात जायचं आणि फक्त कचऱ्याचे ढीग पाहायचं कर्तव्य करायचं हे खरोखरीच नशीब नाही तर काय? (मी गांधी टोपीची बाजू घेतली की चष्म्याची हे न कळल्यामुळे मंडळी गोंधळात.) ठीक आहे. पण हे नाटक बसवणार कोण?

केस : अर्थात 'घोळकर आळी युवक संघ.'

चष्मा : काय म्हणून? 'घोळकर आळी कला मंडळ' का नाही?

केस : प्रायोगिक नाटक बसवायचं म्हणजे काय बेबंदशाही बसवायची आहे की काय?

मी : ठीक आहे. (माझी नाटक लिहिण्यातून सुटका झाल्याच्या आनंदात.) नाटकाला 'कचऱ्या कचऱ्या साठत जा–' नाव कसं आहे?

टक्कल : छान. उपहास आणि उपरोध हाच आपल्या नाटकाचा स्थायिभाव असणार, नाही का?

मी : (मनात : 'लेको, 'कचरा' हा तुमच्या आळीच्या नाक्यावरचा स्थायिभाव आहे ते पाहा आधी. उघड) अर्थात.

केस : पण नाटक प्रायोगिक हवं–

चष्मा : अरण्या, पुन्हा सांगतो, ह्या नाटकाशी तुमच्या मंडळाचा संबंध नाही.

मी : मी पुन्हा आपल्याला सांगतो, नाटक कोणी करायचं ते आपण ठरवा. ठरलं की मला सांगा. मी कास्ट पाहीन. तोपर्यंत कचऱ्याचा ढीग हलणार नाही याची काळजी घ्या. मूळ समस्या नसली तर मग त्या नाटकाला अर्थ नाही.

सगळे : त्याची काळजी नको. नाटक होईपर्यंत कचऱ्याची काडी हलणार नाही.

मी : अशी एकजूट पाहिजे.

(घोळकर आळी शिष्टमंडळ खूष होऊन जाते.)

जिन्यातून एक आवाज : तुमचं मंडळ हे नाटक कसं करतं ते पाहतो.

दुसरा आवाज : आमच्या मंडळातले कलावंत काय केळी खात बसणार काय?– करून दाखवा.

(कचऱ्याच्या समस्येवरील नाटक लिहिण्याचा भोग टळल्याच्या आनंदात आम्ही रेडियो लावतो.)

रेडियो : भार्तातल्या निरक्षर समाजात आपले साहित्य पोचवायचे आद्य कर्तव्य साहित्यिकांचे आहे. लघुउद्योग-सप्ताहात त्यांनी सक्रिय भाग घेऊन औद्योगिक क्रांती केली पाहिजे.

(मी रेडियोवरून नशिबी आलेला भोग टाळून काटा 'विविध भारती'वर नेतो. तिथे 'बम्बईसे आया मेरा दोस्त । दोस्त को सलाम करो' चालू असते. या क्षणी भारतातली बहुसंख्य जनता स्वत:च्या आणि इतरांच्या रेडियोवरून फक्त हेच ऐकत असणार ह्या खात्रीने जनतेशी एकरूप होण्याचे साहित्यिक कर्तव्य करतो.)

## भोग क्रमांक पाच

स्थळ : तेच. वेळ : समोर शिवणकाम-शिक्षिका आपल्या 'सुलभ शिवणकला, भाग पहिला' ह्या ग्रंथाला प्रस्तावना लिहून द्या, असे सांगत असल्यामुळे असल्या वेळेला 'कातर-वेळ'च म्हणायला हवे.

लेखिका : एकदा हे हस्तलिखित वाचा आणि योग्य वाटलं तर प्रस्तावना लिहा.



''ते म्हणाले, आपण कुठल्याही पुस्तकाला प्रस्तावना लिहून देता.''

मी : पण शिवणकामातलं मला काय कळतं?

लेखिका : आपण राग मानू नका. पण आजचे मराठी साहित्यिक जीवनापासून दूर जाताहेत असं माझं मत झालंय.

मी : ('जा! तुला सुईच्या अग्रावर मावेल इतकीही प्रस्तावना देणार नाही!'–हे अर्थातच मनात.) तुमच्या मताशी मी शंभर टक्के सहमत आहे.

लेखिका : आपल्याआधी मी कवी उमेश सावर्डेकरांकडे प्रस्तावना मागायला गेले होते.

मी : ('बाई, हे असं दुसऱ्या लेखकाला सांगायचं नसतं.') मग?

लेखिका : ते म्हणाले, ''मला शिवायचंय माझं तोंड. ते शिवण शिकवाल का?'' आता अशा वेळी आपण काय बोलणार? मग त्यांनीच आपलं नाव सांगितलं. ते म्हणाले, आपण कुठल्याही पुस्तकाला प्रस्तावना लिहून देता. आपला काय रेट असेल तो सांगा–

मी : (रेट? 'शिलाई' म्हणाली नाही बाई हे नशीब! मी रेट घेऊन प्रस्तावना लिहितो काय रे सावर्ड्या...)

लेखिका : मग प्रस्तावना न्यायला केव्हा येऊ?

मी : तुम्हांला खरोखरीच चांगली प्रस्तावना हवी आहे का? तुम्ही प्रोफेसर कुळकर्ण्यांची घ्या.

लेखिका : कुठले कुळकर्णी?

मी : (आले वांधे!) हे हो, दादासाहेब कुळकर्णी...एवढं त्यांचं नाव गाजतंय महाराष्ट्रात–

लेखिका : दादासाहेब कुळकर्णी–म्हणजे आमच्या ट्रेनिंग कॉलेजात शिकवायचे ते?

मी : यस्. तेच. (कुणी तरी कुळकर्णी कुठल्या तरी कॉलेजात काही तरी शिकवत असणारच याचा अंदाज खरा ठरल्याच्या आनंदात) तेच तेच.

लेखिका : अय्या, ते आमचे सर होते, हँडीक्रॅफ्टचे. इश्श, त्यांचं नाव कुठे गाजतंय? ते केव्हाच रिटायर झाले. तुळशीबागेत हल्ली दिवाळीत आकाशकंदील विकतात.

मी : (मरणोन्मुख अवस्थेत) ठीक आहे, देतो प्रस्तावना. (आलिया 'भोगासी'च्या मूडमध्ये शिरून) परवा या.

लेखिका : आणि प्रकाशनसमारंभाला अध्यक्ष म्हणून यायला हवं.

मी : मीच?

लेखिका : नाही तर माणसं जमत नाहीत हो–

(मी लेखिकेच्या बालबुद्धीपुढे शरण जातो.)

मी : येतो.

('सुलभ शिवण, भाग पहिला' याची प्रस्तावना पाहा. एका मुद्रणदोषाने आमची अब्रू वाचवली आहे. प्रस्तावनाऐवजी 'पस्तावना' असे पडले आहे.)

## इतर भोग

रोज पोष्टाने येणारी आवक आणि आमची जावक :

पत्र आवक : वास्तविक 'खो खो' हा राष्ट्रीय खेळ असून त्याविषयी आपण आजपर्यंत काहीही लिहू नये याचे आम्हांस आश्चर्य वाटते.

पत्र जावक : आमची चूक आम्ही मान्य करतो. आमचे विनोदी लेख वाचून आम्ही 'खो खो' हसलो अशा मजकुराची आम्हांला क्वचित पत्रे येत असल्यामुळे आम्ही अप्रत्यक्षपणे 'खो खो'ला उत्तेजन देत आहो असे आम्हांला वाटले होते.

पत्र आवक : आमच्या भागात डासांचा उपद्रव भयंकर वाढला आहे. तरी एक साहित्यिक ह्या दृष्टीने ह्या छळाला तोंड फोडणे हे आपले कर्तव्य नाही का? उत्तराची अपेक्षा आहे. सोबत पाकीट पाठवत आहोत. (पाकीट असते. त्याला फक्त ष्टांप नसतो.)

पत्र जावक : डास मारणे हे काम मुन्सिपाल्टीच्या आरोग्यविभागाचे आहे, असे मानण्यात आजवर आमची घोडचूक होत होती. माशा मारत बसण्याप्रमाणे डास मारत

बसणे हादेखील साहित्यिकांच्या कर्तव्याचाच भाग आहे. आम्ही डास प्रश्नावर 'एकच चावा' हे नाटक, 'मच्छरदाणीतील रक्त' ही रहस्यकथा आणि 'डास, पिसवा, ढेकूण—मराठी देहांना छळणाऱ्या तीन शोषक प्रवृत्ती' ह्यावर एक दीर्घ प्रबंध लिहावा अशा विचारात आहो. साहित्य हे मत्सरग्रस्तांचे क्षेत्र असले तरी जीवन हे मच्छरग्रस्तांचेच क्षेत्र आहे याची जाणीव करून दिल्याबद्दल धन्यवाद.

पत्र आवक : तेव्हा सोबत माझी मुलगी चि० सुरेखा हिची कुंडली पाठवत आहे. आपण गावोगावी व्याख्याने वगैरे देत हिंडत असता. देशस्थ सामदेवी, भृगू, गार्ग्य अगर दुर्वास गोत्रातील स्थळ आढळल्यास पाहावे. समाजात बिकट होत चाललेल्या विवाहसमस्येत साहित्यिकांनी लक्ष घालायला हवे, असे आमचे मत आहे. आपले पुस्तक शेजारच्या गृहस्थांनी लायब्ररीतून आणले होते ते आम्ही सर्वांनी वाचले. त्या पुस्तकावरून आपला पत्ता मिळाला. आपलाही हल्लीचा फोटो पाठवावा. वय व उत्पन्न कळवावे. ही विनंती.

पत्र जावक : तेव्हा चि० सुरेखाची कुंडली प्रा० पां० का० बाळेगावकर यांच्या वर दिलेल्या पत्त्यावर पाठवावी. त्यांची पुढल्या चार महिन्यांत चांद्यापासून बांद्यापर्यंत 'ज्ञानेश्वर-जन्मशताब्दीचे फलित' या विषयावर एकूण बेचाळीस व्याख्याने लागली आहेत. आमच्या दोन्ही डोळ्यांत मोतीबिंदू पडलेला असल्यामुळे हल्लीचा फोटो काढून पाठवणे शक्य होणार नाही. ग्रूप फोटोत आमचा नातू मांडीवर आहे. तो चालत असल्यास पाठवतो.

पत्र आवक : एक साहित्यिक ह्या दृष्टीने निद्रानाशावर एखादा उपाय सुचवावा. मलाही लेखनाची आवड आहे.

पत्र आवक : निवांतपणे झोपणे हा निद्रानाशावर एकमेव उपाय आहे. आपल्याला लेखनाची आवड आहे हे वाचून आनंद झाला. आपण नाट्यसमीक्षणे आणि संगीतसमीक्षणे लिहायला घ्यावी. नाटके पाहताना किंवा गाणी ऐकताना आपल्याला गाढ झोप लागण्याचा संभव आहे. नाही लागली तर परखड परीक्षणे लिहून नाटककार, नट, गायक वगैरेंची झोप उडवावी. परीक्षण मात्र परखडच हवे. म्हणजे 'अमुक अमुक नटाला जोड्याने मारले पाहिजे' ह्या भाषेत. घाबरू नका. नट, गायक वगैरे निरुपद्रवी जात. कुणीही आपल्या निद्रानाशावरील इलाज म्हणून त्यांना ठोकावे. म्हणजे त्या लोकांची झोप उखडेल—तो आनंद आपल्याला लाभेल आणि मन आनंदी असले की झोप येते. भूकही वाढते.

पत्र आवक : आमची मुलगी चि० सौ० मनोरमा ऊर्फ छबी प्रसूत होऊन तिला मुलगी झाली. एक साहित्यिक ह्या दृष्टीने चांगले नाव सुचवा. नावात 'म' हे आद्याक्षर हवे व चार अक्षरी. आम्ही भारतीय संस्कृतीचे अभिमानी असल्यामुळे अत्याधुनिक बॉबी, ज्यूली वगैरे नावे नकोत. आमचे जावई चि० आप्पासाहेब सिव्हिल इंजिनियर असून सध्या तराईच्या जंगलात रस्ते बांधण्याच्या खात्यात आहेत. लग्नापूर्वी ते कविता करत. आता नोकरी करतात. आपण एकदा तराईच्या जंगलात जाऊन एक साहित्यिक ह्या दृष्टीने तिथली मलेरियाची रोगराई पाहावी अशी त्यांची इच्छा आहे. तरी 'म' ह्या अक्षराने सुरू होणारे चार

अक्षरी नाव नातीसाठी सुचवावे.

पत्र जावक : (मला 'म'ने सुरू होणारे चार अक्षरी नाव 'मलेरिया' हेच 'व्हिक्टोरिया'सारखे सुचत होते. पण भारतात मलेरिया असला तरी भारतीय संस्कृतीत नाही.)

आपल्या मुलीला मुलगी झाल्याबद्दल सर्व संबंधितांचे मी अभिनंदन करतो. 'म'ने सुरू होणारे, भारतीय संस्कृतीला धरून असणारे चार अक्षरी मला सुचणारे एक नाव 'मंदोदरी' असे आहे. 'मं'ऐवजी 'म'च हवा असल्यास 'मन्दोदरी' असे लिहावे. दुसरे चांगले नाव 'मनोरमा'–पण ते तिच्या आईचेच आहे व भारतीय संस्कृतीत पहिला जॉर्ज, दुसरा जॉर्जसारखी मनोरमा दि फर्स्ट, मनोरमा दि सेकंड ही सोय नाही. तराईच्या जंगलातील मलेरिया पाहायला मी नक्की जाईन. आपले जावई त्या जंगलात आणखी अनेक वर्षे राहून यशस्वी होवोत ही शुभेच्छा.

पत्र आवक : एक साहित्यिक ह्या दृष्टीने आपणांला आपल्या कर्तव्याची जाणीव करून द्यावी, असे आम्हांला तीव्रतेने वाटत आहे. 'खाटेगाव तालुका हरित क्रांती मंडळी'तर्फे माननीय जिल्हाधिकारी यांच्या उपजतिथीत भरलेल्या भाजीपाला-प्रदर्शनाचे छापील निमंत्रण आपणांस पाठवले होते. आपण प्रत्यक्ष हजर तर राहिलाच नाही, परंतु एक शुभसंदेशसुद्धा पाठवला नाही याबद्दल आमच्या जिल्ह्यात तीव्र नापसंती व्यक्त होत आहे. हरित क्रांतीच्या कार्यात साहित्तिक असून आपण सहभागी होऊ नये हे देशाचे दुर्भाग्य आहे.

पत्र जावक : भाजीपाला-प्रदर्शनाला सुयश चिंतिणारा मी आपल्याला पाठवलेला संदेश पोष्टात गहाळ झालेला दिसतो. तरी मूळ संदेशाची नक्कल पाठवत आहे. 'हरित क्रांतीत सर्व साहित्यिकांनी सामील होऊन भाजीपाल्याला उत्तेजन दिले पाहिजे, असे माझे मत आहे. भाकरीच्या प्रश्नाइतकाच भाजीचा प्रश्न महत्वाचा आहे. भाजीशिवाय भाकर म्हणजे बैलाशिवाय औत आणि लेखणीशिवाय दौत असे माझे मत आहे.' पुढल्या प्रदर्शनाचे वेळी माझे मत जाहीर वाचून दाखववे. हरित क्रांतीचा विजय असो. (हुश्श!)

पत्र आवक : आमच्या समोरच्या घरातील रेडियो एवढ्या मोठ्याने लावतात की, हल्ली आम्हांला शेजाऱ्यांचे बोलणेदेखील ऐकू येत नाही. एक साहित्यिक ह्या दृष्टीने ह्या गोंगाटाविरुद्ध आपला आवाज उठवणे हे अशा वेळी आपले कर्तव्य ठरते.

पत्र जावक : आपण म्हणता तो त्रास आम्हांलाही भोगावा लागतो. त्याविरुद्ध आवाज उठवण्याचा एकच मार्ग आहे. आपला रेडियो ग्यालरीत ठेवून समोरच्यांच्या रेडियोच्या दुप्पट जोरात लावावा. मात्र त्यांच्या रेडियोवर भक्तिगीते चालली असतील तर आपण 'विविध भारती'वर सिनेमा-संगीत लावावे. हा उपाय प्रत्येक नागरिकाने करावा. तरच गोंगाटाविरुद्ध आवाज उठलेला दिसेल. आपला मतभेद आवाज उठवूनच व्यक्त केला पाहिजे. लोकशाहीतले आवाजी मतदान ते हेच.

पत्र आवक : ...एक साहित्यिक ह्या दृष्टीने चीनवर तुम्ही ॲटम बॉंब टाकला पाहिजे...

पत्र जावक : आपल्या मताशी मी संपूर्णपणाने सहमत आहे. आपण आपल्या सवडीने दोनतीन ॲटम बॉंब आणून द्यावेत. चीन हा थोडा मोठा देश असल्यामुळे एक ॲटम बॉंब पुरणार नाही. बॉंब मिळाल्याबरोबर टाकून येतो. बॉंब करण्याची तसदी दिल्याबद्दल क्षमा असावी.

पत्र आवक : आमचे गावातील गरुडेश्वराच्या मंदिराच्या कळसावरच्या दगडी गरुडाचा पंख तुटला आहे. नवीन पंख बसवणे आवश्यक आहे. कल्पनेच्या गरुडभराऱ्या मारणारे साहित्यिक ह्या दृष्टीने आपण गरुड-पक्ष-निधीला साहाय्य करणे हे आपले आद्य कर्तव्य आहे. वरील पत्त्यावर मनीऑर्डरने रक्कम पाठवावी. शंभर रुपयावरील रक्कम देणाऱ्याचे नाव कळसावरील दगडी गरुडाच्या नवीन पंखावर कोरले जाईल. गरुड-पक्ष-निधीसाठी वर्गणी जमवणारे श्री० पांडोबा हातमारे यांचा ह्या निधीशी संबंध नाही.

पत्र जावक : आपले पत्र मिळाले. गरुडेश्वराच्या कळसावरील गरुडाचा दगडी पंख तुटणे ही मी एक राष्ट्रीय आपत्ती मानतो. त्याच भावनेने आठच दिवसांपूर्वी श्री० पांडोबा हातमारे नावाच्या गृहस्थांना गरुड-पक्ष-निधीसाठी एकशे एक रुपये रोख दिले. पावतीची वाट पाहत आहे. पंखावरच्या नावाचे विसरू नये.

पत्र आवक : एक साहित्यिक ह्या दृष्टीने आपण साहित्यिकांची कर्तव्ये काय आहेत असे समजता? तरुण साहित्यिकांना संदेश द्यावा.

पत्र जावक : रोज पहाटे उठून सवाशे सूर्यनमस्कार घालून त्यानंतर दहा मैल फिरायला जावे. त्यानंतर आपल्या शहरातील सर्व जनतेच्या सर्व सुखदु:खांशी समरस होऊन दुपारी घरी परतावे. मग तरुणांचे प्रश्न हाती घ्यावेत. रोज तीन वाजण्यापूर्वी हे काम उरकावे व तरुण पिढीला दुपारचे शो पाहण्यासाठी वेळ मोकळा ठेवावा. संध्याकाळी तरुण नाक्यानाक्यावर, हॉटेलात वगैरे कार्यमग्न असतात. त्या टेहळणी बुरजांवर आपण जाऊ नये. संध्याकाळी धार्मिक प्रश्न हाती घ्यायला देवळात जावे. रात्री नाना प्रकारच्या समस्या अनुभवायला गल्लीगल्लीतल्या मारामाऱ्या पाहाव्या. तिथे मार खावा. म्हणजे सार्वजनिक हॉस्पिटलातील रोगी, नर्सेस इत्यादिकांच्या समस्या पाहण्याची संधी मिळते. मधूनमधून शाळेत जाऊन शिक्षकांचे प्रश्न सोडवावेत. पूर्वी शाळेत विद्यार्थ्यांना प्रश्न असत. तो काळ गेला. शनवार-रविवारी ग्रामीण प्रश्न सोडवायला जावे. स्त्रियांचे प्रश्न सोडवणे म्हटले तर सोपे व म्हटले तर अति बिकट. कारण त्यासाठी स्त्रिया कुठल्या आणि महिला कुठल्या ते ओळखता यायला हवे. सामान्यत: ज्यांच्या घरी पगारी स्वैपाकणी चूल सांभाळतात आणि मोलकरणी मुले व घर सांभाळतात त्यांना महिला म्हणावे. त्या क्रांती करत असतात. बाकीच्या कामे करतात. तेव्हा ह्या क्षेत्रात ज्याने त्याने आपापल्या जिम्मेदारीवर जावे. आता एवढ्या भानगडीत साहित्यिकाने पोटापाण्यासाठी काय करावे?—हा प्रश्न विचारू नये. हा विचार त्याने आपला पहिला लेख छापून येण्यापूर्वी करायला हवा होता. स्वत:चे पोट भरताना त्याची भूमिका काय हा प्रश्न चूक आहे. बंबवाल्याच्या घराला आग लागली असताना ती विझवायला जाताना त्याची भूमिका काय?

एक साहित्यिक ह्या दृष्टीने मी तरुण साहित्यिकांना संदेश द्यावा ही अपेक्षा व्यक्त केल्याबद्दल मी आपला आभारी आहे. जीवनाशी सर्वांगाने समरस होण्याचे हल्ली हे असे प्रयत्न चालू असल्यामुळे आमच्या जवळ देण्यासारखी 'संदेश' हीच एक वस्तू उरली आहे. तरुण पिढीला आमचा एकच संदेश : ''आलिया भोगासी असावें सादर'' ह्या वृत्तीने जगावे आणि आमचे गणूशेट (ॲण्ड सन्स्–किराणा व भुसार मालाचे व्यापारी) 'यापुढे उधारी बंद' हे आम्हांला सांगताना म्हणाले त्याप्रमाणे, ''कालचे साहित्य ही आजची आणि आजचे ही उद्याची रद्दी आहे,' हे तत्त्व ध्यानात ठेवावे.''



साहित्याचे मूल्यमापन

# ललित आत्मपरिचय कसे लिहावे ? :

## एक मार्गदर्शन



आम्ही (म्हणजे मार्गदर्शक)

'आपली आपण करी स्तुति तो एक मूर्ख' असे समर्थ रामदासस्वामी म्हणून गेले. गेले म्हणून बरे झाले, नाहीतर मूर्खांची जुनी लक्षणे किंवा जुन्या मूर्खांची लक्षणे 'शहाण्याची लक्षणे' म्हणून त्यांना लिहावी लागली असती. तेव्हा ते एक बरेच झाले. माणसांनी वेळच्या वेळी जावे. कारण मूल्ये बदलतात. जुन्या चवल्या गेल्या. त्यांनी गणितही बदलले. बारा दुणे चोवीस हा जुना हिशेब. पण पैशांच्या हिशेबात आता बारा दुणे पंचवीस झाले. पावलीचे पंचवीस. पण दुकानदाराकडून मोड घेताना मात्र त्यांतला तेराचा वाटा त्याचा. बाराचा घेणाऱ्याचा. तर मूल्ये अशी बदलतात. शेराला पूर्वी सवाशेर भेटे. आता किलोला सवाकिलो भेटायला हवा. पूर्वी एखाद्या 'राजियानें ब्राह्मणास दोन ग्राम दान दिलें' असा औदार्याचा उल्लेख होता. आता दोन ग्राम 'काय दान दिले?' असा प्रश्न येईल. कारण ग्रामाचेही पारडे फिरले. कारण आता ग्राम तागडीत पडले. तेव्हा अशी ही मूल्ये बदलत असताना 'मी'विषयक मूल्यही बदलावे हे ठीकच आहे. बदललेली मूल्ये प्रथम साहित्यिकांना कळतात. ही एक मौजच आहे. तर ते असो. कारण शब्दांचे मूल्य बदलते. एके काळी शब्दांना अर्थ असे. त्यामुळे अर्थ पाहून शब्दाचे मोल असे. आता शब्दाला अर्थ नाही असे ठरले. कुणी ठरवले तो शोध व्यर्थ आहे. आता अर्थ फक्त उदाहरणार्थ. तर तेही असो. आणि हेही असो. तर तर केल्याशिवाय लिखाण तरतरित होत नाही. म्हणजे ग्रेटच. वगैरे. अशा वेळी आत्मपरिचय लिहिण्याचा प्रसंग आला तर तो कसा लिहावा हे पाहू. वास्तविक 'जिज्ञासूंसाठी हे पाहू' असे लिहिणार होतो. पण 'प्रिय वाचक' आणि 'जिज्ञासू' हे मनुष्यविशेष आता नष्ट झाले. तेही एक बरेच.

एक काळ असा होता की, आत्मप्रौढी हा दुर्गुण होता. 'बढाई' असा एक शब्द होता. त्यामुळे माणसे स्वत:विषयी विनयाने लिहीत–एकमेकांची अंतरे राखून लिहीत. तर ते आता चूक. तर बरोबर काय? तसे न लिहिणे. म्हणून आता आत्मपरिचय कसा लिहावा हे नव-साहित्यिकांसाठी–'होतकरू' म्हणणार होतो, पण जिज्ञासूप्रमाणे आता कोणी होतकरू नाही. सगळे एकदम तयार. ('साहेब तयार आहे–आता खाण्यासारखा' हे चिकूचे किंवा आंब्याचे विशेषण असते तसा तय्यार. पोपयासारखासुद्धा.) तर काही

नमुन्यांचे आत्मपरिचय लिहितो. कादंबरी, नाटक वगैरे सावकाश लिहावी. त्याआधी आत्मपरिचय तयार पाहिजे. पूर्वी 'मी व माझे लेखन' हा लेख साठीच्या आसपास येताना लिहीत. हल्ली 'अ आ इ ई'एवढे लिहिल्यावरसुद्धा लिहिता येतो. तर हे नवे मूल्य. आता उदाहरणार्थ : किशोर कोरे याने 'ग म भ न' ही निर्मिती केल्यानंतर लिहिलेला आत्मपरिचय पाहा. किशोर कोरे हा अगदी नवसाहित्यिक आहे. कारण गेल्या महिन्यापासूनच तो लिहायला लागला. ग म भ न र स पर्यंतचे अक्षरवाङ्मय त्याने लिहिले आहे.



''आमचा बाप ग्रेट आहे.''

''आमचा बाप ग्रेट आहे. आणि आईसुद्धा. आमच्या बापाचं आईवर प्रेम नसावं. कारण बापाला प्रेम काय ते कळतं म्हणून मला शाळेत पोचवायला येतो आणि आमच्या वर्गातल्या बाईशी बोलत बसतो. बाप सिगारेट ओढतो म्हणून आई त्याला बोलते. बापाने सिगारेट ओढली तर माझ्या आजाचं काय जातं? मला आजे दोन आहेत. एक आईचा बाप आणि एक बापाचा बाप. हेही ग्रेटच. मी ग म भ न र स पर्यंत लिहिलं. बाईला त आणि ळ येत नसावा. पुढं जातच नाही. 'स'शीच येऊन थांबली आहे. आमची बाई दॅट इज निमाताई. तिला काहीच येत नाही. तिला मोटरचा उच्चार 'कार' असा आहे हे ठाऊक नाही. बालगीतं म्हणजे वैताग. म्हणून वर्गातली बाकीची भुक्कड गर्दी 'शाणी माजी भावली' म्हणताना फक्त मी तेवढा 'बोल राधा बोल' म्हणत असतो. मी कधी शाळेत जाईन असं मला वाटलं नव्हतं. बाप उचलून घेऊन गेला. शाळा हा साला ताप आहे. आपण शिकणार नाही. कारण शिकण्यासारखं काहीच नाही. होतं ते शिकलो. आता फारतर शिकलेल्या अक्षरांना टोप्या घालायच्या, नाहीतर काने, मात्रा ओढायचे. म्हणजे वैताग. बालगीतासारखा. खरं तर ग ला म कां नाही म्हणत? सगळी भाषा बदलली पाहिजे. 'मंमं' म्हणजे जेवण हे कळत असताना जेवण हे कशाला शिकायचं? भूभू

म्हणजे कुत्रा हे कुत्र्यालासुद्धा कळतं मग कु कशाला नि त्रा कशाला शिकायचा? पण 'जो जो' म्हणजे झोप तेव्हा 'ज' शिकला पाहिजे आणि 'कुक् कुक्' म्हणजे आगगाडी तेव्हा 'कु' शिकलाच पाहिजे. म्हणजे वैताग. एकंदर सगळा वैताग आहे हे आजवरच्या आयुष्यातल्या अनुभवावरून सांगतो. तिसऱ्या वाढदिवसाला बाप काय देतो पाहीन, नाहीतर चक्क बापाला डॅडी न म्हणता बाप म्हणेन. हे बाप लोक आम्हांला जन्माला घालण्यापूर्वी विचारीत कां नाहीत? आमच्या बापाचं नाव मोरेश्वर म्हणून मी त्याला नामानिराळा ठेवतो आणि माझं नाव फक्त किशोर कोरे एवढंच सांगतो. एक पाव्हणा म्हणाला, 'अरे तुझ्या बापाचं नाव सांग.' मी म्हटलं, 'हा इथे बाप आहे त्यालाच त्याचं नाव विचारा.' पाव्हणा आडवा. एका कॅडबरीत काय काय म्हणून सांगायचं? पाव्हण्याच्या बायकोने माझी पापी घेतली. तिला मी माझं नाव 'किशोरकुमार' असं सांगितलं. ती म्हणाली, 'सगळं नाव काय?' मी म्हटलं, 'दिलीपकुमारचं सगळं नाव विचारून या.' पाव्हणी करपली. आपण नाही कोणाला भीत. माझी महत्त्वाकांक्षा गांजा ओढणं ही आहे.''

तर नवीन ललित आत्मपरिचयाची ही बालशैलीतली झलक आहे. हेच गुण वाढीला लावले की, 'उद्धटपणा' हा दुर्गुण नसून आत्मप्रकटीकरणाचे ठळक वैशिष्ट्य आहे, हे कळेल. ऊठ म्हटले की उठणे हे आज्ञाधारकपणानामक दुबळेपणाचे लक्षण आहे. बस म्हटले की उठले किंवा ऊठ म्हटल्यावर लोळायला सुरवात केली की, शब्दांच्या गांजणुकीतून मुक्तता होते. आणि कशालाही न बांधणारी बांधिलकी सुरू होते. तेव्हा आता यापुढे स्वत:ची वळख ह्या तत्त्वज्ञानाला ढका न लावता करावी तरच ते योग्य वाटावे व पटावेही.

आता हा वाढीला लागल्यानंतरचा नमुना पाहावा:

माझी कादंबरी लिहून होईपर्यंत मी कादंबरीकार होईन, असं मला वाटलंच नव्हतं. कारण साहित्याची भंकस आपल्याला पटली नाही. आमच्या फेवरिट हातभट्टीच्या अड्ड्यावर पंडा भोरकरानं बेट घेतली : ''लिहून दाखव कादंबरी.'' आपण दिली. आठव्या दिवशी तीन बाटल्या शाई आणि पाच रिमं कागद चिताडून काढले शब्दांच्या मुडद्यांनी. झाली कादंबरी. बगलेत मारून अड्ड्यावर जात होतो. कामू नाक्यावर झाडम्या भेटला. स्कूटरमागं यल्लम्माला घेऊन. त्याला वाटलं, काखेत जिन्नस आहे. मी म्हटलं, झाडम्या, येड्या ही कादंबरी. झाडम्या म्हणाला, मारो गोली. आणि स्कूटरला किक मारून यल्लीसकट पसार. मी म्हटलं, ह्याची केस केली पाहिजे. आमच्या गँगमधला जेम्स बाँड आहे मी. टॅक्सीला दमडा नाही खिशात. म्हणून प्यांट विकणार होतो तर नाक्यावरच्या जरीपुराणेवाल्याकडे कवितासंग्रहाचे गठ्ठे विकायला प्रकाशक आला होता. त्याला म्हटलं, खाकेत कादंबरी आहे. केवढ्याला घेतोस? तो म्हणाला, केवढ्याला देतोस? मी म्हटलं, घेशील तेवढ्याला. आधी टॅक्सीला पैसे दे. तेवढ्यात रद्दीवाल्याने कवितासंग्रह तागडीत तोलले आणि त्याला बावीस रुपये दिले. आपण खेचले आणि कादंबरी प्रकाशकाला

देऊन बगल मोकळी केली. बावीस रुपये! आपकमाईचे. बापकमाईचे तर दरमहा शंभर रुपये टिकवतो बाप आपल्याला टरकून. पुढल्या महिन्यात बी०ए०च्या परीक्षेला बसण्याबद्दल बोनस देणार आहे. लेकाचा बाप. तोवर बावीस रुपये तो सही. माझी कादंबरी बगलेत घालून प्रकाशक गेला. मी सरळ टॅक्सी गाठली आणि झाडम्याचा नाद सोडून सीधा गेलो आपल्या गँगच्या अड्ड्यावर. तिथे पंडा भोरकर आणि चिमण्या मल्हारी मार्तंड बसले होते चणे खात. म्हटलं, बावीस रुपये आपकमाई. पंडा म्हणाला, ही काय भंकस? चिमण्या म्हणाला, ''बूटपालीस केलंस काय?'' मी म्हणालो, ''आवाज बंद. जान निकालेगा. कादंबरीचा ॲडवान्स. बावीस रुपये.'' पंडा म्हणाला, ''साली माझी आयडिया घेऊन लिहितोस.'' मी म्हटलं, ''तू व्हिक्टर बॉट्लनेकची नाही घेत?'' पंडाची जबान तुटली. चिमण्या म्हणाला, ''छोडो यार!'' मग मी छोडलं. ''पण आधी बीट मारलीस त्याचे पैशे मोज. मेरा पैशे मोज.'' पंडा म्हणाला, ''कसली बीट?'' मी म्हटलं, ''कतरूं नकोस प्यारे–कादंबरी लिहून दाखवायची बीट! जबान बदलतोस? दिला शब्द खरा कर!'' पंडा म्हणाला, ''शब्द खरा करायचा म्हणून कोणी सांगितलं?'' पंडाही ग्रेट. मग सहा रुपयांचा नंबरी जिन्नस आणला कालिन्याहून. आणि भेंडीबाजारात उस्मान

''आपली आवड : बेकारांतला बेकार सिनेमा आणि चरस, गांजा आणि अफू मिसळून हातभट्टी.''



कादरकडे मुर्गी चावली. दोन रुपये उरले. मी म्हटलं, ''यार लोक, एवढे आम्हांला ठेवा. बापाचा मंथली हप्ता यायला अजून दोन दिवस आहेत.'' पंडा म्हणाला, ''जहन्नममें ज्याव.'' मग मी जहन्नममध्ये गेलो. इकडे प्रकाशकाने कादंबरी छापखान्यात नेली. प्रकाशक ग्रेट. कादंबरीला प्राइझ मिळवून दाखवलं. लोकही ग्रेट. त्यांनी विकत घेऊन वाचली. दुसरी लिहिली. प्रकाशक ती पण बगलेत मारून गेला. तिलाही प्राइझ. मग तिसरी लिहिली. गँगमधले यार लोक म्हणतात, प्रकाशकाचा बगलबच्चा! मी म्हटलं, पहिल्या

प्राइझमध्ये शर्ट घेतले, दुसऱ्यात बनियन–तिसरं मिळालं तर प्यांटी घेणार! आपल्याला साहित्यबिहित्य पसंत नाही. आपण औलिया. तेवढ्यात आपलं लग्न झालं. बाप म्हणाला, दहा हजार रुपये हुंडा मिळतोय. मी म्हटलं बापाला, फिकिर मत करो बेटा. शादी करेगा. तुम्हारे लिये बँकमें नोकरी करेगा. आपण मॅनेजरला नाही भीत. मग शादी केली. हल्ली बँकेत नोकरी करतो. पंडा भोरकर गँगशी बेमान निघाला. आमचा लीडर असून मुन्सिपालटीत खर्डेघाशी करतो. आणि रस्त्यांत भेटला तर तोंड चुकवतो. माझ्या कादंबऱ्या खपतात म्हणून खार खातो. आपली आवड : बेकारांतला बेकार सिनेमा आणि चरस, गांजा आणि अफू मिसळून हातभट्टी. नावडते लेखक : व्यास आणि वाल्मीकी. आवडते लोक : आपल्याला ग्रेट म्हणणारे.

आता वर दिलेल्या नमुन्यांत तपशिलाचा फरक करता येईल. पण साचा असा असावा. एकेका काळाचे एकेक नायक असतात. निळा ब्लेझरचा कोट, पोलो कॉलरचा शर्ट आणि काचा मारलेले धोतर हा हीरो एक काळ नाजूकपणाने गाजवून गेला. कॉलेजच्या पोर्चमध्ये जे जे काही व्हायचे ते होऊन गेले. तेही ठीकच आहे. कॉलेजेही नवी होती आणि पोर्चही. मग शहराच्या रोगट हवेतून हीरोमंडळी मोटेवर, शेताच्या बांधावर, चावडीवर वगैरे थोड्या मोकळ्या हवेत हिंडून आली. ताकद वाढली तशी 'भंकस' नावाचा नवा कलाप्रकार शिकली. आता तोंडात चारमिनार नसेल त्या वेळी शिवी हवी. ही नवसभ्यता आहे. प्रेमपत्रं, परिचय, पहिली ओळख, आरक्त कपोल, हुरहूर, बापाचा विरोध (कुणाच्याही) ह्या सगळ्या वळसेवेलांट्यांना आता टाइम कोणाला आहे? आता फक्त स्कूटरच्या मागली सीट मोकळी हवी. तेव्हा रेडिमेड हे केवळ कपड्याचेच विशेषण उरले नाही. तर नव्या समाजातली मेडसुद्धा रेडी असावी. हे नवदर्शन घडवणारे नवलेखक आत्मपरिचय जेव्हा लिहितात त्या वेळी तो जुन्या वळणाचा कसा चालेल? असला जुनाट परिचय संपादक लगेच परत पाठवून देईल. दत्तात्रय वासुदेव आचमने हे वडिलोपार्जित सोज्वळ नाव धारण करणाऱ्या एका जुन्या पठडीतल्या कादंबरीकाराने आपला परिचय एवंगुणविशिष्ट लिहिला आणि उलटून आला. आचमने अगदीच बाळबोध.

''वाई येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणकुळात माझा जन्म दत्तजयंतीच्या दिवशी झाला म्हणून माझे नाव दत्तात्रय असे ठेवण्यात आले. माझे तीर्थरूप दशग्रंथी होते. अत्यंत धर्मपरायण आणि प्रेमळ अशा मातेच्या छत्राखाली माझे बालपण गेले. सकाळी उठल्याबरोबर प्रातर्विधी आटोपून मी गोठ्यात जाऊन गोमातेचे दर्शन घेत असे व धारोष्ण दूध पीत असे. शाळेत पणशीकर-गुरुजींनी मला वाङ्मयाची आवड उत्पन्न केली. संस्कृत, मराठी, इंग्रजी वगैरे उत्तमोत्तम पुस्तके वाचून घेतली. श्री० वि० स० खांडेकर, सानेगुरुजी, हरि नारायण व नारायण हरि आपटे यांचे ग्रंथ त्यांनी वाचून घेतले. आचार्य प्रल्हाद केशव अत्रे व श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांची विनोदी पुस्तके वाचून मनाला अत्यंत आल्हाद वाटत असे. चार्ल्स डिकन्स, थॅकरे प्रभृति इंग्रजी थोर लेखकांच्या ग्रंथवाचनाने इंग्रजी व्याकरण सुधारले. गोविंदाग्रज, कवी यशवंत, गिरीश, काव्यविहारी, साधुदास,

मोरोपंत, वामनपंडित, बा० भ० बोरकर इत्यादिकांच्या कविता वाचून मराठी सुधारले. आधुनिक कवींत प्रा० करंदीकर, प्रा० बापट व प्रा० पाडगावकर यांच्या कवितांतील देशप्रेमविषयक व निसर्गपर कविता मला फार आवडतात. प्रा० ना० सी० फडके यांची



दत्तात्रय वासुदेव आचमने

मराठी शैली तर चित्तवेधक आहे. ज्ञानेश्वरीचा एक अध्याय वाचल्याखेरीज मी अन्नग्रहण करत नाही व रोज एका कादंबरीचे एक प्रकरण लिहिल्याखेरीज झोपत नाही. आजवर मी पंचेचाळीस देशभक्तिपर, बावीस सामाजिक सुधारणापर, तीस धार्मिकपर कादंबऱ्या लिहिल्या आहेत. शिवाय महाभारत, रामायण, गुरुचरित्राचे गद्य रूपांतर, पद्यमय अहिल्यादेवी होळकर चरित्र, झाशीच्या राणीचा पोवाडा, सखाराम बापू बोकील यांचे चरित्र, सहाशे निसर्गपर कविता असे फुटकळ लिखाणही केले आहे. तरी प्रिय वाचकांनी येथे न्यून ते पुरते अधिक ते सरते करोनि घ्यावे अशी विनंती आहे. माझी पत्नी संसारदक्ष असून आल्यागेल्याचे गृहिणीधर्मास अनुसरून स्वागत करते. माझ्या पाच कन्यांचे विवाह झाले असून जामात सरकारी व निमसरकारी नोकरीत आहेत. दोन मुली लग्नाच्या आहेत. त्या सुदृढ असून गृहकृत्यांत व विणकामांत दक्ष आहेत. दोघींच्याही हिंदी प्रथमा परीक्षा पास झाल्या आहेत. श्रीशारदेच्या कृपेने मी लिखाण करत असतो. माझी सर्व पुस्तके शाळाखात्याने पुरवणी वाचन म्हणून मंजूर केली आहेत. मी माननीय शिक्षणमंत्री व समाजकल्याण खात्याचे उपमंत्री व भारताचे पंतप्रधान यांचा ऋणी आहे. गेल्या वर्षी मी कुरमुडे तालुका साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होतो. दत्तकृपेने महाराष्ट्र साहित्य संमेलनाचा अध्यक्ष झालो तर शारदेच्या सेवेचे चीज होईल अशी उमेद आहे. साहित्यात मांगल्याचा बोध, सुखाचा शोध, आणि दुरिताचा क्रोध असावा असे माझे नम्र मत आहे. पुढल्या वर्षी माझ्या वयाला साठ वर्षे पुरी होत आहेत. मी निर्व्यसनी असून अजूनही शंभर बैठका आणि

सवाशे जोर काढतो. धारोष्ण दुधामुळे सकस साहित्य-निर्मिती होते अशी माझी श्रद्धा आहे. म्हणून गोमातेस प्रणाम. माझा थोरला सुपुत्र सब् ओव्हरशियर असून दुसरा सुपुत्र मोजणी-कारकून आहे. दोघेही लग्नाचे असून सुस्वभावी आहेत.''

असला आत्मपरिचय जर संपादकाचे हाती ह्या काळात आला तर त्याला झीट येईल. प्रस्तुत परिचय जर दत्तात्रय वासुदेव आचमने यांना छापून यायला हवा असेल तर त्यांनी तो नवतंत्राचा अभ्यास करून लिहिला पाहिजे. मजकुरात नावापासून बदल केला पाहिजे. म्हणजे असा :



दत्त आचमने (तेच ते द० वा० आ०)

''दत्त आचमने : आमचे बाप वाईला दर्भ घेऊन हिंडायचे. पहाटे उठायचा ताप. वर गाईचं दूध प्या. शाळेत पणशीकर नावाच्या मास्तरने पिडले. खांडेकर, सानेगुरुजी, हरी नारायण आपटे वगैरेंची फालतू बुके वाचण्यात वेळ गेला. शिवाय डिकन्स-थॅकरे यांच्यासारखे इंग्लिश बाजारबुणगे. मग लग्न केले. दोन पोरे आणि सात पोरी झाल्या. तर ते एक असो. दिवसभर वाटेल ते लिहितो आणि खपवतो. बोधवाङ्मयाला भाव आहे म्हणून बोधवाङ्मय लिहितो. आपल्याला पुस्तक खपल्याशी कारण. रामामुळे खपले तर रामावर लिहीन. कृष्णामुळे खपले तर कृष्णावर. पब्लिकची टेस्ट अशी त्याला करणार? पाच बक्षिसांत पाच पोरींचे हुंडे निघाले. सहावीचा आणि सातवीचा हुंडा गद्य गुरुचरित्रातून नक्की निघेल. नावडते लेखक : इंग्लिश. खाण्याची आवड : रोज शिक्रण पाहिजे. कारण शेवटी आम्ही भटेच. त्याला काय करणार?''

आता खुद्द आचमनेगुर्जींनी जर आपला असा आलेला परिचय वाचला तर रस्त्यातून धोंडे मारत वाईभर हिंडत राहतील हा भाग निराळा. आत्मपरिचयाच्या ह्या नवतंत्रांत बसणारे असे काही इतरही नवपरिचय आहेत. त्यांत साहित्यिकांचे घरेलू दर्शन घडवण्याचा प्रकार असतो. म्हणजे बनियन, धोतराचा सोगा खांद्यावर इत्यादी. उदाहरणार्थ, जालंदरनाथ

बुडकुले यांनी लिहिलेला गदाधर गोकर्णीकर ह्या कथाकाराचा परिचय पाहा :

''गद्याच्या लिखाणाला म्हणूनच चोच येत नाही– पण चव येते.''



(डावीकडून)
जालंदरनाथ बुडकुले आणि गदाधर गोकर्णीकर

''गदाधर गोकर्णीकराला आम्ही गद्या म्हणतो. गद्या लाख माणूस. सहा प्लेटी मिसळ आणि सहा दहिवडे एका बैठकीला खातो. आणि कथा छापून आली की, दोसे खिलवतो. कादंबरीला मुर्गी. त्यामुळे गद्याने कथा लिहिण्यात वेळ फुकट घालवू नये, असे वाटते. मी पुण्याला गेलो की, सकाळचा चहा आणि आमलेट खायला आमच्या अण्णा बुरणुसे प्रकाशकाकडे जातो. तिथून समोरच नाटककार काळभोऱ्यांच्या घरी पोहे आणि कॉफी. काळभोऱ्यांची कॉफी मस्त असते. तिथून सरळ गद्या गोकर्णीकराकडे. तेवढ्यात गद्याची कथा लिहून झालेली असते. ती उचलायला एखादा संपादक आलेला असतो–मग गद्या, मी आणि संपादक मिळून करंदीकराची मिसळ. तिथे गप्पांचा अड्डा जमतो. गद्या दिलखुलास आहे. बाळ्या पटाशीकर त्याला बिलखुलास म्हणतो. कारण संपादक किंवा प्रकाशक नसला तर गद्याच नेहमी बिल देतो. गद्याचे लिहिणे अतिशय रेखीव आहे. शंकरपाळ्यासारखे. त्याची 'तिरपी भिवई' ही पहिली कथा मी वाचली त्या वेळीच त्याला सांगितले, 'गद्या, पॅटिस काढ. कथा मस्त आहे.' गद्याची शैलीही टुमटुमीत आहे तोंडल्याच्या भाजीसारखी. त्याच्या कथा वाचताना मला चिवडा करत असताना येतो तसला खमंग वास येतो. गद्यासारख्या संसारी वाटणाऱ्या माणसाला स्त्रीमनाचे इतके विविध पापुद्रे चिरोट्यासारखे दाखवणे कसे जमते हे मला कोडे आहे. त्याची कादंबरी मात्र मला किंचित तंदुरी चिकनसारखी वाटते. बिनपिसाची, पण मूळ आकृती राखून असलेली. गद्याच्या लिखाणाला म्हणूनच चोच येत नाही–पण चव येते. खाणे हा आम्हां दोघांनाही जोडणारा दुवा आहे. गद्या पीत नाही. पोटात अल्सर आहे अशी थाप मारत असावा. त्यामुळे गद्याबरोबर जेवायला जायचे असेल तर मी आधी दुसऱ्या एका साहित्यिक अड्ड्यावर जाऊन येतो. तिथे सगळे रंगात आले की, भारतीय संस्कृतीबद्दल बोलतात. म्हणजे मला सटकायला बरे पडते. गद्याचा आता नवा कथासंग्रह येतो आहे. हा

पंचविसावा कथासंग्रह. गद्याला म्हटले, 'याची पार्टी मुंबईला झडली पाहिजे. मुंबईच्या चिकनची सर पुण्याच्या चिकनला नाही.' गद्या 'बाय ऑल मीन्स' म्हणाला. मी त्याच्या पंचविसाव्या कथासंग्रहाची वाट पाहत आहे. आपल्याला जो मस्त खिलवतो तो बेस्ट लेखक असे आपले मत आहे. गद्या हा महाराष्ट्राचा अँटन् चेखाव आहे! मी जे मिळेल ते 'खात' आहे.''

एके काळी 'लिखाण' हा शब्द लिख् धातूपासून आला असा अपसमज होता. लेखकांचे हे नवपरिचय वाचल्यापासून तो 'खा' ह्या धातूशी अधिक जवळचा वाटतो. ह्या सर्व परिचयांत एखाद्या स्त्री-लेखिकेचा परिचय हा शारदियेचे चंद्रकळे-मने मवाळे-चकोर तलगे इत्यादी सामुग्री घेऊन लिहिलेला असावा. गरजूंनी अधोनिर्दिष्ट परिचयाचा अभ्यास करावा. (अधरनिर्दिष्ट म्हणणार होतो. पण जीभ चावली. उगीच आपदा.)



सोनिया अमृते

''छान छान छान छान.''

''सोनियाचे वय मी सांगणार नाही. ती रुसेल माझ्यावर. हो. सोनिया अजूनही भावलीसारखी रुसते. आणि बुडकुलीसारखी कोपऱ्यात जाऊन बसते. सोनियाच्या शैलीत रातराणीच्या सुगंधी झुळका आहेत. (गरजूंनी आपापली आवडती फुले इथे लिहावी.) तिच्या कथा वाचताना तिने त्या पापणीचा केस दुधाच्या शाईत बुडवून लिहिल्या असाव्यात, असे मला वाटते. आणि कागदावर नव्हे—सदाफुलीच्या पाकळ्यांवर. सोनिया इटुकली आहे. पिटुकली आहे. आणि कापुस पिंजायच्या धनुकलीसारखी धिटुकली आहे. म्हणून तिला वय नाही. आणि बायकांना वय विचारायची मला सवय नाही. एकदा कुणीसे तिला वय विचारले. साहित्य-संमेलनाला जाताना पुरे तिकिट काढायचे की अर्धे यासाठी. सोनियाने आपले गाल पुरीसारखे फुगवले. सोनियाला सूर्योदय फार आवडतो. सूर्योदय पाहिला की, ती नकळत म्हणून जाते—छान छान. अजूनही ती कावळ्याला 'काऊ' म्हणते आणि चिमणीला 'चिऊ' म्हणते. कावळा दिसला रे दिसला की, ती एकदम 'छान

छान' म्हणते आणि चिमणी दिसली की, 'छान छान.' पण कावळा आणि चिमणी एकदम दिसली की 'छान छान छान छान' म्हणते. दोन छान काऊचे. दोन छान चिऊचे. एकदा तिच्या गॅलरीतून एक कावळ्यांचा आणि एक चिमण्यांचा तांडा उडून गेला, तेव्हा दिवसभर सोनिया छान छान छान छान म्हणत होती. सगळ्यांचे प्रत्येकी दोन छान संपेपर्यंत सांज झाली. अशी ही काउचिउवेडी सोनिया. तिच्या लुकलुकत्या डोळ्यांत दोन फुले पडलेली दिसतात. दिवसभर आकाशातल्या ढगांचे आकार पाहत बसते आणि रात्री चांदण्या मोजते. संध्याकाळी समुद्राच्या लाटा मोजते. सकाळी पहाटवाऱ्याच्या झुळका मोजते. मग जाईच्या कळ्यांशी बोलते. गुलाबाला गझल म्हणून दाखवते आणि तुळशीला अभंग. सोनिया रंगबावरी आहे आणि गंधसावरी आहे. सूरहावरी आहे आणि ओठचावरी आहे. सोनिया काव्यात रंगणारी आणि कथेत तरंगणारी आहे. म्हणून तिला वय नाही. परवा कुणीसे तिच्या थोरल्या मुलीच्या लग्नात म्हणाले की, नवरीपेक्षा नवरीमुलीची आईच अधिक नटली आहे. सोनिया इतकी चिडली की, तिने त्या बाईला जाईच्या कळ्यांनी मारले. 'अगदी त्या बाईला किनई गुलाबदाणीत नेऊन बुडवावी अस्सा मला राग आला होता!' असे सोनिया म्हणाली. मग मिस्टर अमृते म्हणाले की, कसे झाले तरी आपला वधूपक्ष आहे. मिस्टर अमृते ट्रॅक्टरचे एजंट आहेत. त्यांना सोनियाच्या मनाचा मुलायमपणा कसा कळणार? पण सोनिया मुलीच्या लग्नातदेखील आपले ते अनघ मूलपण टिकवून होती. कुणीसे म्हणाले (परिचयात हे सोयिस्कर 'कुणीसे' खुशाल आणावे)–शोभत नाही हो ह्या वयात. त्या बिचाऱ्या कुणीशाला काय ठाऊक की, फुलाचं फूलपण उमर ठरवत नसून भ्रमर ठरवत असतात. शिंपल्यांत रांधावे आणि चिंचेच्या पानावर जेवावे म्हणणारी सोनिया खूप सुगरणही आहे. मुर्गी काय सुरेख करते. ('मुर्गी' हा नवसाहित्याचा–मुरगळलेला–मानबिंदू आहे हे अभ्यासकांनी ध्यानात धरावे. मेली कोंबडी कवीला भीत नाही.) आकाशगंगेच्या पाण्यात कोंबडीचा रस्सा करण्याची तिची महत्त्वाकांक्षा आहे. म्हणून पिसासारखी हलकी सोनिया मला पिशीसारखी वाटते.''

साहित्याची सुरुवात प्रथम शाईने लिहिणाऱ्या लेखकांनी केली. समर्थ वगैरेंनी 'मसी' कैसी करावी तेही सांगितले. नंतर रक्ताने लिहिणारे आले. कुणी घामानेही लिहिल्याचे ऐकिवात आहे. एक दशक अश्रूंनी लिहिणाऱ्यांचे झाले. हे युग ड्रेनेजच्या पाण्याने लिहिणाऱ्याचे आहे–त्यांतच एखादा लाळेनेही लिहून जातो. ही लाळ आत कुठेतरी शिजणाऱ्या कोंबडीच्या रश्शाची की आणखी कसली ह्याची चिकित्सा करू नये. दिवस हे असे आहेत. ते फालतू चिकित्सेत दवडू नयेत. चांगल्याला चांगले म्हटले की, गर्दीच्या आवाज़ात आवाज मिसळून जातो. तेव्हा चांगले चांगले कसे नाहीत हा सूर काढावा. कारण ह्या नव्या चालीवरच उद्याचे चरित्रकोश तयार होणार आहेत. त्याचीही थोडीशी वानगी द्यावी म्हणतो :

ज्ञानेश्वर : ज्ञानेश्वरी नावाचे बी०ए० व एम०ए० विथ मराठी घेणाऱ्यांसाठी पुस्तक लिहिले. काव्य आणि तत्त्वज्ञान अशा दोन दरडींवर हात ठेवून लिहिल्यामुळे साहित्यिक मूल्य शून्य.

समाधीत शिरावे कसे ते कळले. बाहेर कसे पडावे ते कळले नाही. आळंदीपासून पंढरपुरापर्यंत हजारो लोकांनी पालखीतून घालून वर्षानुवर्षे नेले तरी प्रकाशक मिळाला नाही. शेवटी बी०ए०ला लागल्यावर प्रकाशक मिळाले. शैली कृत्रिम. प्रतिमासृष्टी नाही. पहिल्या हस्तलिखित आवृत्तीला खप नव्हता. तीनशे वर्षांनंतर एकनाथ नावाच्या परोपकारी गृहस्थाने दुसरी आवृत्ती काढली. वयाच्या सोळाव्या वर्षी लिहिल्यामुळे लिखाणात मॅच्युरिटी नाही. कुमारवाङ्मयाचा प्रयत्न म्हणून बरा आहे. लिखाणाचा पोत भरभरित आहे. काठ इंद्रायणीचा असल्यामुळे फारसा रुंद नाही. ओवीच्या बंधनामुळे पदर आखूड वाटतो. उपमांची खडी काढली आहे व तत्त्वज्ञानाच्या दशा सुटल्या आहेत. एकूण हा लेखक वीस मार्कांपर्यंत लावण्यास बरा आहे. लेखकास एकही सरकारी पारितोषिक मिळाले नाही.

तुकाराम : देहू येथील एक सामान्य कवी. प्रतिमासृष्टी अगदीच घरगुती. कल्पनेच्या भराऱ्या नाहीत. रामेश्वरशास्त्री नावाच्या ख्यातनाम टीकाकाराने अभंग नदीत बुडवण्याच्या लायकीचे आहेत, असा परखड अभिप्राय व्यक्त केला होता. अभंग बुडवून वर आले त्या अर्थी किराणाभुसार दुकान चालवणाऱ्या ह्या कवीने ते दुकानाच्या फळ्यांवर लिहिले असावेत. शिवाजी नावाच्या राजाने सरकारी बक्षीस देऊ केले होते ते स्वीकारले नाही अशी एक दंतकथा आहे. सरकारी बक्षीस स्वीकारणार नाही अशी आरोळी ठोकून ते स्वीकारण्याची परंपरा आजतागायत चालू आहे; तेव्हा ते ह्या कवीने प्रत्यक्षात स्वीकारले की नाही हे कळावयास मार्ग नाही. स्वीकारले असावे. त्याखेरीज शेवटी देहूच्या विमानतळावरून हा गेला त्या विमानाचे तिकीट काढायला पैसे कुठले आले?

रामदास : चांगली शाई आणि वळणदार अक्षर काढता आले तर चांगले काव्य लिहिता येते अशी समजूत असलेला एक भाबडा बैरागी. ह्या कवीने 'दासबोध' नावाचे गाईड लिहिले आहे. शिवाय 'मनाचे श्लोक' नावाची प्राथमिक शाळांतल्या विद्यार्थ्यांसाठी पद्यावली. ह्याच्या लेखनात शुद्धलेखनाच्या अनेक चुका आहेत. मराठीतला हा पहिला पलायनवादी कवी. बोहल्यावरून पळाला. नेहमी गावात न राहता डोंगरात राहत असे. तरी सरकारदरबारी मात्र उत्तम वशिला होता. त्यामुळे एकदा सारे राज्य बक्षीस मिळाले होते. परंतु ते चालवता येईल असा आत्मविश्वास नसल्यामुळे परत केले. राज्यसरकारकडून राज्य बक्षीस देण्याची योजना तेव्हापासून बंद पडली. म्लेंच्छसंहार जाहला ह्याचा ह्या कवीला आनंद झाला, त्यामुळे तो मानवतावादी नव्हता हे सिद्ध होते.

रामदास तुकाराम वगैरे मंडळींची उद्याच्या चरित्रकोशांत अशी वासलात लावल्याखेरीज नव्या प्रत्ययकारी (ह्या शब्दाचा अर्थ शोधण्याच्या फंदात पडू नये.) साहित्यिकांचे ग्रेटपण ठरणार नाही. नव-चरित्रकोशांतली त्यांचीही खाती पाहू या :

प्रा० सुदाम सुपडे : 'आंतड्यांत अडकलं विजेचं बटण' ह्या एका ओळीने जग जिंकणारा कवी. 'मी—एकमेव टीकाकार. बाकीचे भुक्कड' हा टीकात्मक लेख लिहून जुन्या हादऱ्यांना नवे हादरे देणारा टीकाकार.



कालिका दसनुरे : 'बाई नावाचा बुवा' ही एकच कादंबरी लिहून डोस्टोव्हस्कीची कढी (खरे म्हणजे इथे व्होडका हवी.) पातळ करणारा कलंदर कलावंत.





बंब बेलापूरकर : 'चिखल फेकण्याच्या नव्या पद्धती' हा संदर्भग्रंथ लिहून अजरामर झालेला लेखक. टिळक : एक ढोंग, रानडे : एक सोंग, आगरकर : एक थोतांड, ह० ना० आपटे : एक कुभांड, सानेगुरुजी : एक आपला असाच-इत्यादी निबंधांचा असामान्य लेखक.



बच्चू भडकुले : काळबरे मामू ह्या फ्रेंच लेखकाचे लेखन वाचलेला एकमेव आशियाई वाचक. 'घुंगुरट्याची घुंगर्जना' हे महाकाव्य लिहिण्याचा संकल्प सोडलेला कवी.

तेव्हा उद्याच्या चरित्रकोशात अशी आदरयुक्त नोंद हवी असेल तर गरजूंनी आत्मपरिचयाच्या पुस्त्या गिरवायला सुरुवात केली पाहिजे. सौजन्य, शिष्टाचार इत्यादी दुर्गुण झाडले पाहिजेत, आणि त्या तयारीला लागले पाहिजे. बंब बेलापूरकरांनी सुप्रसिद्ध नायजीरियन कवी ठोंबे घृअंन्क्रुम्फे छुक् छुकुम्बा याच्या काहिली कवितेच्या मराठी अध:पातात म्हटलेच आहे. त्या ओळीचे प्रथम कालिका दसनुरे यांनी भाषांतर केले. मग बच्चू भडकुले यांनी अपभ्रंश केला आणि शेवटी बंब बेलापूरकर यांनी मूळ आशय आणि अभिव्यक्तीच्या निकट येणारा अध:पात केला. तरी मूळ ध्वनी आला नाही असे ठोंबे छुक् छुकुम्बा यांनी म्हटल्यामुळे ते त्या कवितेच्या अध:पाताच्या आधारे 'सत्यानाश' करणार आहेत. तो हाती येण्यापूर्वी संतप्त साहित्यिकांची लक्षणे सांगणाऱ्या कवी ठोंबे घृअंन्क्रुम्फे छुक् छुकुम्बाच्या 'कानिबाल हुप् कानिबाल' ह्या कवितेचा बंबकृत अध:प्रात पाहा :

''माणसामाणसा हुप् हुप्
प्रथम शिंका एक अपशकुनी शिंक
अजागळाचा पिळून स्तन
काढा दूध एक एक मण
आधी शिंका–मग थुंका
कुठेही आणि कोणावरहि
वर जाणारी ओढा टांग
ओरखाडावे सगळे आंग
पडणाऱ्याच्या तोंडासाठी
पडण्यापूर्वी पसरा चिखल
स्वत:चे मात्र संभाळा बकल्
तावातावाने भरून काढा
मग कागदाचे ताव ताव
जोडीला पण चालू ठेवा काव काव काव
काव
चोच मारा चांगली खोचून
बोलत जा चांगले टोचून
आपापला गट करा
गटाबाहेरच्याला गट्ट करा
किंवा गट्टी फू करा. गटांत जमवा निगरगट्ट
या देशीचे त्या देशींचे
सगळे फक्त मिथुनराशीचे
आणि पेटवा कागदी कढया
चांगले बेट्यांना तळून काढा
पगडी, उपरणे आणि जोडा
मांगल्याच्या कळशा फोडा
सौजन्याची वस्त्रे फेडा
आया ताया साळ्या भावजया
इथून तिथून सगळ्या बाया
रात्रंदिवस एक मंत्र
मी सत्य बाकी मिथ्या
तस्मात् तूं हो माझा पित्त्या
मी लिहितो ते ब्रह्मवाक्य
मी बोलतो तेच चारी वेद

इतर लेखन–नुसता मेद
बाकी सारे सारे भुक्कड
माझी ओळ न् ओळ फक्कड
ते साहित्य? नुसती चर्बी
त्यालाहि पण लागते डर्बी
बक्षिसांची सरकाराच्या
रॉयल्ट्यांची प्रकाशकाच्या
जेवल्या ताटी थुंकून जावे
गोंजारत्यावर भुंकून यावे
कौतुकाचा उठला हात
त्यात रुतवा आपले दात.
बापाजीला करा सवाल?
पुन्हा कुणाला जलम् द्याल?
जित्या बापाला करा तर्पण
फार तर मग पुस्तक करा अर्पण.
दूम दबाके घूम जाव । पळून जावे गुपचूप
पण दिसेल त्याला हूप हूप
माणसा माणसा हूप हूप
माझी आरती तुझा धूप
थोडक्यात म्हणजे
भल्याची कास धरू नका
'हल्याची' धरा
आणि व्हा मूर्तिभंजक.''

# प्रा० विश्व० अश्व० शब्दे

*''शब्द-शब्द-शब्द!''*–हॅम्लेट

प्राध्यापक विश्वनाथ अश्वत्थामा शब्दे यांची कीर्ती आज साहित्याच्या विश्वात दुमदुमून राहिली आहे. शारदेच्या मंदिरात त्यांची टीकात्मक प्रतिभा पुजाऱ्याच्या लाडक्या लेकीसारखी अनिर्बंध संचार करून राहिली आहे. त्यांचे 'नाटकाविषयी थोडेसे', 'नवकवितेविषयी थोडेसे', 'ईलियटविषयी इवलेसे', 'एकनाथाविषयी एवढेसे', 'जगाविषयी जरासे' इत्यादी लेख त्यांच्या मूलग्राही अथवा तळगाठू विद्वत्तेची साक्ष देत आहेत. (त्यांच्यावर टीका करू पाहणाऱ्या एका उद्धटाने त्यांच्या ह्या लेखांवर, 'विषयांविषयी थोडेसे व स्वत:विषयी बरेचसे' अशी एक दुर्हेतुमूलक टीका केली. सदरहू टीकाकारमजकुरांचे एक पुस्तक चांगले इंटरला लागायला आले होते ते लागले नाही. 'लहान तोंडी मोठा चावा घेतल्याबद्दल त्याला झाले हे शासन योग्य' हे प्रा० अस्तरदार यांचे उद्गार चिंत्य आहेत.)

प्रा० शब्दे यांची विद्वत्ता वादातीत आहे. 'वाद' हे त्यांचे राखीव खाते आहे. 'वादाविषयी वांईच!' ह्या आपल्या खेळकर शैलीने लिहिलेल्या लेखात ते म्हणतात : ''निर्मिती ही वाङ्मयीन प्रक्रियेची उत्तरक्रिया आहे. ग्रंथ हे लेखकाच्या जीवरूप वृद्धीच्या परिपूर्तीचे अष्मरूप दर्शन आहे. प्रतिभेचा अमीबा शब्दाचा देह धारण करून ग्रंथात पडला की तो फॉसिलाइज झाला. कलेचे चिरंतनत्व हे फॉसिल्सचे दीर्घजीवित्व होय. टिकतात शब्द. शिलारूप शब्दांबद्दल चर्चा अगर वाद संभवतच नाही. टीका ही सर्जनाचा मागोवा घेण्यात होते. ह्याविषयी खूप लिहिता येईल. पण आज 'वांईच' पुरे!...'' (वरील परिच्छेदातील बारीक टाइप आमचा. वास्तविक प्रा० शब्द्यांची सारी विद्वत्ता जाड टाइपात हवी. पाहा : 'जाड टाइपाविषयी थोडेसे'–प्रा० शब्दे.)

प्रा० शब्द्यांच्या असल्या ह्या मौक्तिकमज्जनन्यायाने सिद्ध होणाऱ्या टीकेपुढे केवळ शुक्तिसंतुष्टांचा काय पडिवार? एतदर्थ त्यांच्या आसपास चारपाचच उपविद्वान टिकले. त्यांचे उथळ शत्रू त्यांना शुकसज्जन म्हणतात. उदाहरणार्थ, प्रा० अस्तरदार. 'कोटाला अस्तर' ह्या शैम्पिक-सिद्धान्ताप्रमाणे शब्देप्राध्यापकांमागे प्रा० अस्तरदारांचे इमान. शब्द्यांनी

बोलावे आणि अस्तरदारांनी त्याची झील धरावी, किंवा तो शुकपाठ घटवावा. सूर्यपृथ्वीन्यायाने बोलायचे म्हणजे स्वत:भोवती आणि सूर्याभोवती सदैव प्रदक्षिणा घालावी आणि परावर्तित प्रकाशेकरोन तोलावे, असा ह्या विश्वाचा कायदा आहे.



**शब्दसूर्यमाला** : भोवतीचे ग्रह आणि सर्वांना लपेटणारे वायुमंडळ

सुरुवातीला आपण हे वर्तुळ पाहू. त्यांतील हे छोटे छोटे पुंजके पाहा :

प्रा० अ०—हा अस्तरदारांचा पुंजका.

प्रा० चा०—हा प्रा० चाळशे यांचा पुंजका.

प्रा० घों०—हा प्रा० घोंगे यांचा पुंजका.

सोयीसाठी इथे आपण नाट्यपद्धतीचा अवलंब करू या.

[स्थळ : प्रा० विश्व० अश्व० शब्द्यांची अभ्यासिका. खोलीभर साहित्यिकांची कागदी 'फॉसिल्स', ज्याला अज्ञ लोक ग्रंथ असेही म्हणतात ती! भिंतीवर जिरेटोप काढलेल्या शिवाजीसारखा दिसणारा टागोरांचा तरुण वयातील चित्रालेख. हा 'फोटो' कुणाचा हे विचारण्याचे धाडस कुण्या उमेदवाराने केले होते त्याच्या डोक्याचे तेल भिंतीला दणकून



**प्रखर स्वयंप्रकाशित साहित्यसूर्य प्रा० विश्व० अश्व० शब्दे**

(संपूर्ण शब्दसूर्यमालेसाठी पृ० ५२ वरील आकृती पाहा.)

लागले आहे. भिंतीवर 'मामनुस्मर' अशी अक्षरे आहेत. कुण्या दुष्टाने पेन्सिलीने त्यांतील 'मा'वर अर्धचंद्र काढून 'मॉमनुस्मर' असे केले आहे. कोपऱ्यात बुद्धाचा अर्धपुतळा आहे. बुद्धाच्या चेहऱ्यावरील आशय आणि अभिव्यक्ती, एखाद्या भिक्षुणीविरुद्ध एखाद्या थविरेने विहारातून चीवर चोरल्याची तक्रार ऐकताना झाली असता त्या ढंगाची वाटते. प्रमुखस्थानी प्रा० शब्दे व आसपास प्रा० अस्तरदार, प्रा० चाळशे, प्रा० घोंगे इत्यादी.]

प्रा० शब्दे : आता हे पाहा, इथे मी माझ्या डायरीत स्वच्छ लिहिले आहे–

[प्रा० शब्दे डायरी उघडतात. पाहा, 'डायरीविषयी थोडेसे.']

''कलानिर्मितीमागील मुख्य प्रक्रिया तीन : एक म्हणजे अनिर्बंध चित्राकृतींचा अंतर्मनातील संचार–''

प्रा० अस्तरदार : राइट! म्हणजे क्रिएटिव रिक्रिएशनमागे लिमिटलेस पॅटर्न्सचा सब्कॉन्शसमधला ('संचार' शब्दावर ते अडले आहेत. संचार म्हणजे ट्रॅवल् की जर्नी? परंतु ते काही कच्च्या गुरूचे शागीर्द नाहीत.) सब्कॉन्शसमधला इंटर्नल कॉन्फ्लिक्ट म्हणजे–डेर्विश रीस म्हणतो त्याप्रमाणे–

प्रा० शब्दे : (अत्यंत गंभीरपणाने–ख्रिस्ती प्रेतयात्रेपुढे बायबल वाचत जाणाऱ्या पाद्र्याचा चेहरा असा असतो.) मी डेर्विश रीस वापरत नाही, मी जॉन् ड्यूई वापरतो.

प्रा० घोंगे : मीदेखील हल्ली ड्यूईच वापरतो. तुम्ही काय वापरता प्रोफेसर चाळशे?

प्रा० चाळशे : (ह्यांचे लक्ष चर्चेपेक्षा समोरच्या चहाकडे असते. ते एकदम ह्या अनपेक्षित प्रश्नाने दचकून) मी? मी आपला लिप्टनच वापरतो.

[हा नवा टीकाकार कोण?-तिघेही विद्वान बुचकळ्यात पडतात. परंतु अस्तरदार अट्टल

विद्वान आहेत. त्यांचा मध्य ढळत नाही.]

प्रा० अस्तरदार : लिप्टनचं लेटेस्ट वाचलंत का? *वर्ड्स ॲण्ड कर्ड्स?*

प्रा० चाळशे : (आपला अश्वप्रमाद ध्यानात घेऊन) नुकतंच संपवलं! (चहा संपवतात.)

प्रा० शब्दे : तात्पर्य, पहिली प्रक्रिया ह्या संचाराची—



''क्रिएटिव रिक्रिएशनमागे लिमिटलेस पॅटर्न्सचा सब्कॉन्शसमधला...''

**—प्रा० अस्तरंदार : शब्दसूर्यमालेतील एक ग्रह**

(पृ० ५२ वरील आकृती पहा.)



''नुकतंच संपवलं''

**—प्रा० चाळशे : तिसरा ग्रह**

(पृ० ५२ वरील आकृती पहा.)

प्रा० अस्तरदार : आपण त्याला 'लीप बियाँड द लीप' म्हणू शकू, नाही का वि० अ० साहेब?

प्रा० शब्दे : मी शब्दांच्या बाबतीत भलता कॉंप्रोमाइज करणार नाही.



''राइट्! अहो, ही इज ए हंबग विदिन ए हंबग!''

**–प्रा० घोंगे : त्याच मालेतील आणखी एक ग्रह**

(पृ० ५२ वरील आकृती पहा.)

['कॉं'चा उच्चार करताना लष्करात 'अटेंशन्'च्या वेळी अधिकारी लोक 'टें'चा उच्चार करतात तितका उंच आवाज.]

प्रा० अस्तरदार : यू आर राइट! इट इज ए कॉंप्रमाइज.]

[चेहऱ्यावरील भाव 'क्यू'मध्ये दीड तास राहून तिकिटाच्या खिडकीपाशी पोहोचल्यावर 'खाट्'कन तोंडावर खिडकी बंद झाल्यावर आपणां सर्वांचा होतो तो.]

प्रा० शब्दे : दुसरी प्रक्रिया म्हणजे अंतर्मनाचा शोध–

प्रा० अस्तरदार : म्हणजे द सर्च इन् द इनर सेल्फ...

प्रा० शब्दे : मी त्याला कॉन्शसनेस विदिन कॉन्शसनेस म्हणेन.

प्रा० अस्तरदार : मला वाटतं, हॅम पुर्शिविस् हेच म्हणतो...

प्रा० शब्दे : पुर्शिविस इज ए हंबग!

प्रा० घोंगे : राइट्! अहो, ही इज ए हंबग विदिन ए हंबग! लिटररी क्रिटिसिझममध्ये हल्ली असल्या बोगस लोकांची भयंकर गर्दी झाली आहे.

प्रा० शब्दे : लिटरेचरच कां? पेंटिंगमध्ये काय?

[त्यानंतर तासभर प्रा० शब्दे चित्रकलेवर बोलतात. चित्रकला म्हणजे काय हे अजून हजरहुजुरांखेरीज कुणालाही कळले नाही, ह्याविषयी त्यांचे घट्ट एकमत होते. आणि शब्द्यांच्या घरात दुसऱ्या चहाची ऑर्डर जाते. शब्दे चहा सांगायला आत जातात, तोच प्रस्तुत सूर्यमालिकेतील नवा तारा प्रा० चाळशे शब्द्यांची डायरी उघडून 'तिसरी प्रक्रिया' कोणती ह्याचा आगाऊ कानोसा घेऊ पाहतात. डायरीत ह्या प्रक्रिया असतात :

'घरभाडे–बावन्न रुपये.

चि० प्रिद्युम्न व अनिरुद्ध यांची फी–अकरा रुपये.

दत्तात्रय प्रसूतिगृह–नाव घालण्याची फी–वीस रुपये.

जमा : *अभिनव साहित्यविजेरी* : प्रकाशक 'लाथानी व बुटानी'. रुपये पंचाहत्तर आगाऊ.

व्याख्यान : नैऋत्य-मुलुंड महिला साहित्यप्रसारसभा. विषय : 'साहित्यांत निःस्पृहतेचे स्थान...'

आपण डायरी उघडून भलतेच काही वाचून गेलो आहोत हे ओळखून 'कुणि पाहील ना' ह्या भीतीने ते डायरी झटकन ठेवून देतात. बापाच्या खिशात जपमाळ शोधायला गेलेल्या पोरीला रेसची तिकिटे सापडल्यावर होईल तसा त्यांचा चेहरा होतो

प्रा० चाळशे : शब्द्यांची जीनीयस काही निराळीच आहे बुवा!

प्रा० अस्तरदार : मी त्यांना क्वीयर बॉटमशी कंपेअर करीन.

प्रा० घोंगे : ईव्हन बेटर!

"सोऽ–आता तिसरी प्रक्रिया." चहाचे पेले घेऊन येत येत शब्दे म्हणत होते. परंतु हे वाक्य तिथेच राहिले. कारण दारात दोन अनोळखी चेहरे उभे आहेत.

शब्दसूर्यमालिकेतल्या दुसऱ्या वर्तुळात आता आपण प्रवेश करीत आहो.

"माझं नाव सुरेश बोचके, आणि ह्या अभया! कुमारी अभया थोपटे!"

"नमस्ते!" अभया थोपटेच्या हालचालीत साहित्याच्या विश्वात नव्या जोमाने वावरू इच्छिणाऱ्या तरुणीचे अवसान सांडते आहे. तूर्त ती ज्यूनिअर बी०ए०च्या वर्गात आहे. आणि एवढ्यातच 'साहित्याचे नवे मूल्यमापन व्हावे', 'वा० म० जोशांचा पिंड ललितलेखकाचा नसावा', 'सानेगुरुजींचे साहित्य साहित्य नसावे', 'रविकिरण मंडळात काव्य नसावे', 'गडकऱ्यांना नाट्यबीजे नसावी', 'हरिभाऊंना कलेचे एंड्स सापडले नसावे', अशी विध्यर्थी विधाने झोकून देऊ लागली आहे. कुणालाही न कळणाऱ्या कवितेत तिला एक विशिष्ट संवेदना आढळते.

तिच्याबरोबर आलेला सुरेश बोचके गेल्या वर्षी अर्थशास्त्र घेऊन बी०ए० झाला. त्याने बी०ए०ला अर्थशास्त्र घेतल्यामुळे स्वतःचा दृष्टिकोन अर्थशास्त्रीय आहे अशी त्याची भूमिका आहे. हिंदुस्थानात एकालाही अर्थशास्त्र कळले नाही, हे सांगायला तो सध्या मोकळा आहे. वास्तविक काल रात्री काढलेल्या हस्तलिखिताची शाई त्याच्या बोटावरून



**सुरेश बोचके आणि अभया थोपटे**

शब्दसूर्यमालिकेतील दुसरे वर्तुळ

अजून वाळलेली नाही. परंतु नुकतेच एका द्वैमासिकात त्याचे पत्र छापून आले आहे. त्यात एका वयोवृद्ध लेखकाची त्याने शुद्धलेखनाची चूक काढून दाखवली आहे. त्यामुळे साहित्यिकांच्या रांगेत, शाळेत भूगोलाच्या पाळीला चुकलेल्याच्या कानफटीत मारून 'हो वर' करतात, तसे आपल्यालाही करायची संधी मिळावी अशी त्याची एक माफक मागणी आहे.

कॉलेज आणि गोरेगावातील राहती वाडी हे ह्या उभयतांचे कार्यक्षेत्र. मात्र दोघांचीही साहित्यिक वाढ उफाड्याची! 'नवा मुसलमान जास्त कांदा खातो,' ह्या न्यायाने मराठीतल्या लेखांची व इंग्रजी लेखकांची नावे त्यांना पाठ आहेत. गोरेगावला गेल्या वर्षी हेमंतव्याख्यानमाला यशस्वी रीतीने चालवल्यावर यंदा ते गाव उपसाहित्यसंमेलनाला लायक झाले, अशा अंदाजाने शब्द्यांच्या घरी पुढली बोलणी करायला ही मंडळी आली आहे. गोरेगावहून शब्द्यांच्या घरी पोहोचेपर्यंत त्यांचा झालेला संवाद येणेप्रमाणे :

सुरेश बोचके :हेमिंग्वेची *ओल्ड मॅन अँड द सी* वाचलीत का?

अभया : हो, वाचली की!

सुरेश : कशी काय वाटली?

अभया : काही खास वाटली नाही! कसं काय नोबेल प्राइझ मिळालं, देव जाणे!

सुरेश : अहो, नोबेल प्राइझचं काय? टागोरांना नाही का मिळालं?

(सुरेशला टागोर 'पटत नाही.')

अभया : राइट! पण ही कादंबरी इन् पार्ट्स बरी आहे. एक नवीन पॅटर्न म्हणून.

सुरेश : पण कंटेंट आणि पॅटर्न ह्यांच्यात कुठं लॉजिकल कोऑर्डिनेशन नाही—

अभया : हे बाकी खरं! मी आमच्या प्रोफेसर मटंग्यांना तेच म्हटलं!

(वास्तविक मनात 'माझ्या मटंग्यांना' म्हणायचे होते; परंतु गेल्या सुट्टीत त्याचे लग्न कुणाशीसे झाले!—परी नीचांनी वचनभंग केऽऽला!)

सुरेश : मटंगे?

अभया : इंग्लिशचा हो तो. डिकन्सच्या पुढे एक ओळ वाचली असेल तर शपथ! ईलियट्चं नाव नसेल ठाऊक–

सुरेश : ईलियट! त्याला कळला पाहिजे ना? तुम्ही वाचला असेलच!

अभया : वा! रद्द आहेत सगळे त्याच्यापुढं! नव्याच जाणिवा आहेत बेट्याच्या-द-दत्त-दयध्वम!'

अभयेच्या भाषेला कमावलेला पुरुषी घाट आहे. वास्तविक पलिकडल्या फूटपाथवरून आकर्षक वाटावी इतपत ती दिसायला बरी आहे; पण भाषा ही अशी : ''आमचे हे कॉलेजातले शाळामास्तर अजून वर्डस्वर्थपुढं जातील तर शपथ! वर्डस्वर्थ–टेनिसन भुक्कड लेकाचे! नुसता फॉर्म पाहावा! कंटेंटच्या नावाने बोंब!'' अभयेच्या तोंडचा 'बोंब' हा शब्द ऐकून सुरेश दचकतो. वास्तविक अभया ही त्याची छुपी काव्यवस्तू आहे. 'तुझ्या किरमिजी डोळ्यांना, जांभळ्या वडाची गूढता, तुझ्या हिरव्या अंगुलीला, माघी मेघाची घनता' ही काय, किंवा 'शपथ तुला चष्म्याची, मुंबईच्या उष्म्याची, ग्रीष्माची, भीष्माची शपथ तुला...' इत्यादी ओळी तिच्याचवरून स्फुरल्या आहेत. तिच्याविषयी त्याच्या मनात पुष्क–पुष्कळ–लंपट ओले–असेदेखील येते; परंतु अजून 'मला सुरेश म्हटलं तरी चालेल' यापेक्षा जवळुकीचा मोठासा धिटुकला खडा फेकण्याचे त्याने धैर्य केलेले नाही. 'हा रस्ता अटळ आहे!' एवढे तो मनात म्हणतो. थोडक्यात, वाङ्मयीन अगर वैयक्तिक मुद्याच्या फार जवळ न जाता, चपलेचा चिखल अंगावर उडू नये ह्या बेताने, त्याने तिच्या-त्याच्यात सावधगिरीची पावसाळी चाल ठेवली आहे. आता ही मंडळी शब्द्यांच्या दारात आली.

''हं काय? काही विशेष काम?'' शब्दे विचारतात.

''आपल्याला थोडी तकलीफ द्यायची आहे!'' (हे वाक्य बोचके यांचे नसून अभया थोपटे यांचे आहे हे चाणाक्ष वाचकांच्याच ध्यानी यावे! वस्तुत: सुरेश व अभया ह्यांच्यापुढे शृंगापत्ती आहे. त्यांना मागणी घालायची आहे प्रा० शब्द्यांना. प्रा० अस्तरदार, प्रा० चाळशे व प्रा० घोंगे यांची नावे गोरेगावकरांनी एकमताने नामंजूर केली आहेत. प्रसंग बहारीचा! हे तिघे मात्र तीन स्वतंत्र ग्रंथ उघडून बसले आहेत. गांधीवाद्यांच्या सूतकताईप्रमाणे ह्यांचे वाचनदेखील मंडळीपुढे विशेष जोरात चालते. लक्ष शब्देथोपटे संवादाकडे केंद्रित झाले आहे.)

प्रा० शब्दे : कसली तकलीफ? आणि हे पाहा, काय सांगायचे ते स्पष्ट आणि थोडक्यात. (प्रा० शब्दे अत्यंत स्पष्टवक्ते आहेत; अपवाद प्रिन्सिपल व प्रकाशक ह्यांचा.) कारण मला एके ठिकाणी जायचं आहे.

अभया थोपटे : ठाऊक आहे मला! वडाळा वाङ्मयवैतरणीत व्याख्यान आहे आपलं आज, 'साहित्यातील गेले सहा महिने' ह्या विषयावर!

प्रा० शब्दे : (आपल्या दैनंदिन जीवनातला तपशील ह्या तरुणीच्या हिशेबी आहे ह्या कल्पनेने जरासे महिरून, 'वत्से, तुझे मी आतां काय प्रिय करूं?' ह्या सुरात) हं, बोला ना! काय हुकूम आहे?

अभया : आम्ही एक साहित्यसंमेलन भरवतोय!

(इतर तीन प्राध्यापक 'होश्शार!')

प्रा० शब्दे : आता बस् करा बुवा ही संमेलनं! (खोलीतले तीन येरू घाबरतात व मनात 'अभाग्या कामधेनु की रे सोडलीस!' असे म्हणतात. परंतु शब्द्यांचा हा केवळ एक पवित्रा आहे!) काही फायदा नाही अशा संमेलनांचा. नुसती करमणूक, नाच, गाणी! काही खरेखरीचं वाङ्मयीन स्वरूप राहणार आहे का त्याला?

अभया : मग तसे पॉप्युलर ऑथर्स गल्लोगल्ली पडले आहेत. आम्हांला ते मांगल्यवादी आणि सौंदर्यवादी पोपटपंची करणारे भटजी नकोत आता! एक धोंडा मारला तर सहा ध्येयवादी कादंबरीकारांचे चष्मे फुटतात! (हे वाक्य तिच्या मटंगेसरांचे आहे! ''दुष्ट मेला!'') आम्ही काही भगिनी-मंडळाचं दसरासंमेलन नाही भरवणार! ('बाई मर्द आहे'-प्रा० अस्तरकर.) तीन दिवस केवळ चर्चा. रोज एकएक ऑथर घ्यावा म्हणतो!''

प्रा० शब्दे : चांगली कल्पना आहे.

प्रा० अस्तरदार : पहिल्या दिवशी काफ्का घ्यावा.

प्रा० घोंगे : ठीक आहे. काफ्काला एकदा एक्सपोज् केला पाहिजे.

प्रा० शब्दे : मग तुम्हीच घ्या! (सुरेश बोचके व अभया थोपटे व्याकूळ होतात.) मग मी रिचर्ड्स घेऊ की क्रोचे? तुम्ही काय घ्याल हो चाळशे? (चाळशे मघाच्या डायरीच्या गूढात आहे. त्याचे पुन्हा लक्ष नाही.)

प्रा० चाळशे : मला आता काही नको–(''मी चहा घेतलाय दोनदा'' असे त्यांचे पुढले वाक्य आहे.)

प्रा० अस्तरदार : वा:! नको म्हणजे? तुम्ही निदान ॲरिस्टॉटल तरी घ्या ना.

प्रा० चाळशे : (भानावर येऊन) ॲरिस्टॉटल? नको, मी सार्त्र घेईन.

[इथे अभया थोपटे व सुरेश बोचके मृत्युपंथाला लागतात. गोरेगावात सार्त्र–ॲरिस्टॉटल–रिचर्ड्स आणि काफ्का म्हणजे अंधविद्यालयात नजरबंदीचे प्रयोग! त्यातून पूर्वगोरेगाव साहित्योजेकमंडळाच्या संमेलनाला तोंड द्यायचे होते. तिथे सकाळी चंद्रिकाराणीचे नृत्य आणि रात्री केशभूषास्पर्धा, दुपारी कातकरी लोकनृत्य आणि संध्याकाळी कवी विरुद्ध संपादक असा खोखोचा सामना, असा भरगच्च कार्यक्रम. त्यांना काफ्का, रिचर्ड्स व क्रोचेचा शह म्हणजे देवल सर्कशीला डोंबाऱ्याच्या खेळाचा शह देण्यापैकी होते. परंतु इथे सुरेश बोचकेने तोंड उघडले–आणि चुकून का होईना, त्याचा वार वर्मी लागला.]

सुरेश : प्रा० अस्तरकर, आपण काफ्कावर बोलणार का?

प्रा० अस्तरदार : हो. (इथे काय? काफ्का काय नि बाफ्का काय?)

सुरेश : मुख्यत: कुठल्या पुस्तकावर बोलता?

सुरेशचा हा वार अस्तरदारांच्याच काय, परंतु खोलीतल्या प्रत्येकाच्या जिव्हारी लागला. बोगस कॉल देऊन सुरेशने डाव जिंकला. काफ्काच्या एका पुस्तकाच्या नावावर सुरेश

तरला. फर्स्ट क्लास कंपार्टमेंटमधले सहाही जंटलमेन बिनतिकिटाचे असावेत आणि चेकर शिरावा म्हणजे जी भयाण शांतता पसरते तो प्रकार झाला. त्यातून इथे हा खरा चेकरही नाही; नुसतेच पांढरे कपडे घातलेला! सुरेशच्या प्रश्नावर अस्तरदारांनी चष्म्याच्या चकचकीत काड्या पुसल्या; प्रा० घोंगे कातडी बॅग भरू लागले; चाळशे 'टाइम्स' चाळू लागले आणि प्रा० शब्दे चहाचे रिकामे कप घेऊन आत गेले. हिंदी बोलपटात हा प्रसंग असता तर आंधळा बैरागी 'तुमबिन मेरी कोन खबर ले गोवर्धन गिरिधारी' गायला असता.

बाजी किंचित उलटली हे शब्द्यांच्या लक्षात आले. अशा प्रसंगी शिष्यांना सावरण्याच्या त्यांच्या चतुराईमुळेच तर ते सूर्यत्वाप्रत पोहोचले होते.

"मला वाटतं, एखादा मराठी ऑथर असावा, किंवा एक कालखंड घ्या!"

शब्द्यांची कालखंडावरील झडप तीक्ष्ण आहे. ते वीसवीस वर्षांच्या काय, परंतु वीसवीस तासांच्या कालखंडांतील सूक्ष्म भेद दाखवू शकतात. शब्द्यांच्या सूचनेनंतर गाडी रुळावर येते. अस्तरदारांचा चष्मा पुसून होतो. घोंगे परत बसतात. चाळशांचे 'टाइम्स'मधील शेवटले पान संपते...'सगळ्या नुसत्या व्हेटर्नरी सर्जन आणि ओवर्शियरच्या पोस्ट्स...सेंट्रलच्या लेवलला मराठीची एक पोस्ट नाही कधी...' टाइम्स वाचल्यानंतर त्यांना येणारा हा एक दैनिक विचार आहे.

अध्यक्षपदासाठी अभया व सुरेश यांनी भलत्याच लेखकाचे नाव आणले आहे. काफ्काच्या दणक्याची 'दूख' अजून गेलेली नाही. त्यामुळे हे नाव एकदम उडवण्याचे धाडस होत नाही. शब्दे आणि मंडळी मूक राहतात. 'गुरोस्तु मौन' ह्या न्यायाने शब्द्यांचे 'मन' वर्तुळ नंबर एकमधील तारे ओळखतात. दोन दिवसांनंतर गोरेगावला काही पत्रे जातात त्यांत 'वस्तुत: आपण सुचवलेले ते ज्येष्ठ साहित्यिक अध्यक्ष व्हायला हरकत नाही, परंतु मला वाटते, त्यापेक्षा तुम्ही प्रा० शब्द्यांनाच विचारून का पाहत नाही? मी मात्र फार तर एखाद्या शाखासंमेलनाचा अध्यक्ष होईन. याहून जास्त मोठी जबाबदारी माझ्यावर टाकू नये!" हाच मजकूर घोंगे, अस्तरदार, चाळशे इत्यादिकांच्या पत्रांत असतो.

यानंतरचा शब्दसूर्यवर्तुळातील परावर्तित प्रकाश घेऊन स्वत:ची सूर्यमंडळे कशी निर्माण होतात, हाही इतिहास मनोवेधक 'वाटावा'!

स्थळ : गोरेगावची खेमजी चापशी वाडी. सुरेश बोचकेच्या खोलीत अनौपचारिक सभा. भिंतीवर मार्क्स आणि विनोबा दाढीला दाढी लावून लटकत आहेत. सभाजनांची संख्या पंधराच्या आत. वयोमर्यादा सुमारे सोळा ते एकवीसच्या आसपास. एकदोन एस०एस०सी० ते इंटरच्या आसपासच्या मुली. आतल्या खोलीतून सुरेशची आई कौतुकाने पाहत आहे.

सुरेश : (टेबलावर बसून) काही एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन आपण हे संमेलन भरवीत आहो. मी प्रोफेसर शब्द्यांना स्वच्छ सांगितलं—शब्द्यांचंही मत माझ्याप्रमाणंच...आणि अभयाबाईप्रमाणंच पडलं. काही मौलिक चर्चा...(प्रा० शब्द्यांच्या घरी ऐकलेले सगळे शब्द वापरले जातात.)

मधु भिसे : (फर्स्ट इयर आर्टस्च्या वयाचा)...ए पण सुरेश, त्या कॉलनीतले लोक मस्त प्रोग्राम गोठवून राहिले आहेत ना! आम्ही गेल्या वर्षी बडोद्याला गमेल तसला विविधरंजनचा प्रोग्राम गोठवला होता. आपण त्यांच्याबरोबर जॉइंटली प्रोग्राम करू ना!

अभया : तुमची ही समन्वयवादी भूमिका मला मान्य नाही. वाटल्यास संमेलन भरवू नका; पण हे मळमळीत सौभाग्य नको. विशुद्ध वाङ्मयीन स्वरूप ठेवा. नाटक करा, पण उगाच काहीतरी नको! *मर्डर इन् द कॅथीड्रल* करा, नाही तर यूजिन ओनीलचं *हेअरी एप* करा!

सुरेखा वागळे : अय्या! ईंग्लीश नाऽऽटक–कऽऽरायचं तऽऽर मऽग बीऽऽशपस् क्यांऽऽऽड्ल स्टिक्स् आहे आमचं पाठ...

[सुरेश बोचकेला तिचा मुद्दा पटला नाही. परंतु हे वाक्य म्हणताना सुरेखाचे ओठ मुरडत होते छान!]

अभया : सिली! अग, काही ॲब्स्ट्रॅक्ट इमेजेस् येतात की नाही तुझ्या डोक्यात! (सारे जण एकदम स्तब्ध होतात. वास्तविक ही ॲब्स्ट्रॅक्ट इमेजेसची भानगड तिलाही नीट कळलेली नाही; परंतु वादाची सायकल तिच्या हातात आली आहे. पंधरावीस मिनिटे ती मटंगे आणि अन्य सरांकडून ऐकलेल्या शब्दांच्या पॅडल्स मारून घेते. तिच्या बोलण्याच्या केवळ वेगावरून तिचे पांडित्य सिद्ध होते. आणि शेवटी सुरेश बोचके, अभया थोपटे आणि जयद्रथ धुरंधर यांची कृतिसमिती नेमण्यात येते. जयद्रथ धुरंधराच्या यापूर्वीच्या दहा पिढ्यांशी साहित्याचा संबंध आला नव्हता; परंतु त्याच्या घरी टेलिफोन व कोच आहेत.

सुज्ञ वाचकाच्या लक्षात हे छोटे सूर्यमंडळ आले असेलच. मलेरियाच्या भाषेत बोलायचे म्हणजे साहित्यिकांची 'वीण' ही अशी वाढते.

परंतु मूळ सूर्याचे तळपणे शांत करायला ज्याप्रमाणे 'हैड्रोजन' किंवा जलवायूचा मारा असतो, त्याप्रमाणे ह्या साऱ्या धगधगणाऱ्या सूर्यावर सतत एक प्रकारच्या पाण्याचा उतारा चालू असतो. ह्या सर्व नवोदित, प्राचीन, अद्यतन–सगळ्या छोट्यामोठ्या सूर्यमंडळांभोवती ह्या शक्तीचे, मनात आणले तर सर्वविनाशक, परंतु वरपांगी चित्तशामक असे वायुमंडल असते. पृष्ठ ५२वरील चित्राकृतीत ह्या वायुमंडलाने सर्वांना कसे पोटात घेतले आहे ते पाहा. ह्या वायुमंडलाला प्रकाशकाचे वायुमंडल म्हणतात.

हे वायुमंडल महाप्रचंड आहे. ह्या वर्तुळात सूर्य शिरला, की त्याची अवस्था पेन्शन न्यायला आलेल्या फौजदाराहून केविलवाणी होते. ही शक्ती कोणाला कुठे राबवील हे सांगणे कठीण! ह्याने व्यासांना किंचित्काव्य लिहायला लावले असते आणि वाल्मीकीकरवी मॅट्रिकचे गाइड तयार करून घेतले असते. ह्याने वामनपंडिताकडून 'गोड गोड भावगीते' लिहून घेतली असती आणि जगद्गुरू शंकराचार्यांकडून 'संध्येचे सचित्र पुस्तक' (किंमत १ आणा) मागितले असते. ह्याने समर्थांना 'मठांतले रहस्य' लिहा म्हणून फर्मावले असते आणि ज्ञानेश्वरांकडून 'भिंत कशी चालवावी व इतर जादू'चे पुस्तक काढले असते. अशा ह्या महान जलशक्तीपुढे प्रा० विश्व० अश्व० शब्दे म्हणजे रोटरीपुढे

ट्रेडल! त्यांचा संवाद तो काय पाहायचा? पण पाहाच :

स्थळ : प्रकाशकाची कचेरी. प्रा० विश्व० अश्व० शब्दे अति नम्र होऊन बसले आहेत. प्रकाशकाने आपल्या गरगरीत शरीराचा अधोभाग टेबलावर झोकून दिला आहे. त्याच्या पायाचे तळवे शब्द्यांच्या तोंडासमोर आले आहेत. त्यावरील कुरपे नुकतीच कापलेली आहेत. त्या विलक्षण रेखाकृती पाहून शब्द्यांना आँरी मॉतिसच्या चित्रकलेची आठवण होते.

प्रकाशक : बोला शब्देशेठ! (इथे सारी परिभाषा बिजनेसची!) फर्स्टियरसाठी एक समर्थांच्या दासबोधाचे सिलेक्षन तयार करा.

शब्दे : पण आपण दासबोध बी०ए०ला लावतोय ना?

प्रकाशक : तुमचा साहित्यिक शिष्टपणा आवरा! (वाङ्मयसूर्यावर हा पाण्याचा फवारा. परंतु त्याने पाणउतारा होत नाही.) इथे सांगतो ते करा. झालं? फर्स्टियर सायन्सला सुप्रसिद्ध संशोधक फराडे याचे सुलभ चरित्र टाका—आपल्या जोगदंडमास्तरचं!

शब्दे : पण ते हायस्कूल लेव्हलचं पुस्तक आहे—

प्रकाशक : मग तुम्ही जरा त्यांत कठीण शब्द टाकून हाय लेव्हल करा त्याची! 'सुलभ' शब्द काढून टाकू.

शब्दे : हो, म्हणजे मला एडिट करावं लागेल.

प्रकाशक : पन्नास रुपये देईन. वर दमडा नाही मिळणार. ए कुशाभाऊ, फराड्याचं चरित्र घे. हे पाहा, 'मुलांनो, विजेचा शोध कुणी लावला हे ठाऊक आहे का तुम्हांला?' असली वाक्ये काढून टाका. आणि 'आजचे युग विज्ञानाचे आहे' वगैरे जड म्याटर भरा वीसएक ओळी. दोन फार्म वाढवा मजकूर. वीज नका म्हणू, विद्युत्छक्ती वगैरे म्हणा चांगलं भक्कम. तीनतीन इंचाचे शब्द टाका चांगले. काय? फर्स्टियर सायन्सला लागलं पाहिजे पुस्तक.

शब्दे : ते माझ्याकडे लागलं—

प्रकाशक : काय हो शब्दे? तुम्ही त्या अस्तरदार प्रोफेसराच्या नावावर 'लाथॉनी-बुटानी'कडे पुस्तक एडिट करून देताय इंटरचं म्हणे—

शब्दे : (ग्रहण लागलेल्या सूर्याचा चेहरा.) कुणी सांगितलं?

प्रकाशक : कुणी का सांगेना? डायरीत पंचात्तर रुपये जमा आहे तुमच्या. ही तुमची वाङ्मयीन डायरी काय?

शब्दे : साफ खोटं आहे!

प्रकाशक : आनंद आहे खोटं असलं तर!

शब्दे : बाय गॉड सांगतो—

प्रकाशक : शपथा कशाला खाता? हं, ही दोन पुस्तकं लागली पाहिजेत. बोर्डात मेजारिटी आहे ना? त्या चाळशे प्रोफेसराला कवितांचं सिलेक्षन देऊन थोपवलाय मी. लावा कामर्सबिमर्सला—आणि फराड्याचं चरित्र चांगलं साहित्यिक भाषेत लिहून काढा. प्रस्तावना

लिहा एक दणकून. की भावे इंजिनियरची घेऊ? त्याची एक मनाच्या श्लोकाची सटीप आवृत्ती काढतोय मी. पंधरा रुपयांत मिळेल. 'अध्यात्मात विद्युत्छक्तीचे स्थान'! घेऊ का?

शब्दे : नको! मी लिहीन! (तेवढ्यात पंधरा रुपये कापतोय लेकाचा!)

प्रकाशक : ठीक आहे. आणि हे घ्या. पंधरा दिवसांत भाषांतर करून आणा. (प्रा० शब्दे घाईघाईने ते पुस्तक बॅगेत टाकतात. त्याच बॅगेत कॉडवेलचे *स्टडीज इन डाइंग कल्चर* आहे, हेमिंग्वेची कादंबरी आहे, 'न्यू स्टेटसमन नेशन'चा एक अंक आहे, स्पेंडरचे *वर्ल्ड विदिन द* वर्ल्ड आहे आणि 'हे' पुस्तक–म्हणजे आगाथा ख्रिस्तीची एक गुप्त पोलिशी कथा आहे. त्याचे निनावी भाषांतर ही एक साहित्यिक हातभट्टी चालू आहेच.)

...रात्रीची वेळ आहे. कुणी लठ्ठ टीकाकार पुढे टेबलावर घेऊन शब्दे आपल्या अभ्यासिकेत बसले आहेत. क्रिया-प्रक्रिया...विलक्षण रेखाकृती...अंतर्मनाचे पापुद्रे... नाना शब्दांची जळमटे मेंदूत पिंगा घालताहेत...त्यांतून प्रकाशकांची उर्मट वाक्ये...ते पन्नास रुपये–अनिरुद्ध-प्रद्युम्नची फी...पुन्हा एकदा हा खर्च...डोके भणभणायला लागते...शब्दे पुन्हा एकदा गांजेकसाच्या कस्सून घेतलेल्या झुरक्यासारखा तो इंग्रजी 'नवा सिद्धान्त' वाचायला लागतात. हळू हळू त्या शब्दांच्या भोवऱ्यात पार मध्यावर जातात. गिरक्या सुरू होतात. नवे शब्द, नवा आशय, नवी अभिवृद्धी मस्ती चढत जाते. शब्दांचे घोटच्या घोट डोक्यात रिचतात. त्या नशेत–सारी संसाराची दुःखे बुडवली जातात–आणि डोक्याची नशा लेखणीत उतरते. लेखणीही कागदावर वारे प्यालेल्या वासरासारखी हुंदाडायला लागते...प्रा० शब्दे लिहितात, 'कलाविश्वाच्या मध्य आणि सुवर्णमध्याविषयी थोडेसे'...पुन्हा नवे वाद...नव्या चर्चा...अस्तरदारांची तीच पुष्टी...तेच भ्रमण, तेच परिभ्रमण...सूर्याच्याही नशिबाचे सुटत नाही. आणि मग साहित्यसूर्याच्या मागचे तरी कां सुटावे?



''पन्नास रुपये देईन. वर दमडा नाही मिळणार.''
–वायुमंडल

# आमचे भाषाविषयक धोरण

## [आमचे म्हणजे माझे आणि सोन्या बागलाणकराचे]

"तुझं भाषाविषयक धोरण काय?"

सोन्या बागलाणकराच्या ह्या अनपेक्षित प्रश्नाने माझ्या हातातली इडलीच्या इडली सांबारमच्या बशीत फतकन पडली. सोन्या बागलाणकर सकाळी घरातून बाहेर पडताना सदैव एक प्रश्न ओठावर घेऊन बाहेर पडतो. माणूस जिज्ञासू. दिवसभर जिज्ञासेचे बळी शोधत हिंडतो. लग्नकर्म झालेले नाही. त्यामुळे हिंडायला मोकळा. त्यातून जिज्ञासेला एक विषय नाही. व्याख्यानानंतर "कुणाला काही प्रश्न विचारायचे आहेत का?" असा अध्यक्षांनी पुकारा केल्याबरोबर पटकन ज्यांना प्रश्न सुचतात आणि ते विचारायचे धैर्य ज्यांच्यात असते अशांतला सोन्या बागलाणकर आहे. आता चांगली इडली खात असताना "तुझं भाषाविषयक धोरण काय?" हा प्रश्न विचारण्याचे काही कारण नव्हते. मी बुडालेली इडली वर काढण्यात दंग असल्यासारखे दाखवले. विषय बदलणे हा सोन्या बागलाणकराच्या जिज्ञासेवर एकमेव उपाय आहे. पण तो दर वेळी लागू पडत नाही.

"आज सांबारममध्ये वांगी नाहीत–भेंडी आहे."

"माझ्या प्रश्नाचं उत्तर नाही दिलंस." चिवटपणाने सोन्या बागलाणकर.

"कसला प्रश्न?" आपण जणू काय त्याचा प्रश्न ऐकलाच नाही, असे दाखवत मी म्हणालो.

"ऐक. तुझं भाषाविषयक धोरण काय?"

"अर्थात मातृभाषा. शिवप्रभू ज्या भाषेत बोलले ती माझी भाषा."

"टु द पॉइंट बोल–म्हणजे मराठी."

"अर्थात."

"ठीक आहे. मग दोन कॉफी मागवून दाखव."

"दो कॉफी लाव!"

"मराठीत मागवून दाखव."

"दोन कॉफी लाव–आण!"

"शिवप्रभू कॉफी म्हणत होते?"

"त्यांच्या वेळी कॉफी होतीच कुठं? धारोष्ण दूध लेका!"

"हे बघ, भाषा हा विनोदाचा विषय नाही. आम्ही ह्या भाषेपायी काय काय गमावून बसलोय ते आमचं आम्हांला माहिती. राष्ट्रीय पातळीवरून नाही बोलत मी; वैयक्तिक पातळीवरून बोलतोय." शिक्षा देणाऱ्या जज्जाइतक्या किंवा मुरलेल्या हेडक्लार्कइतक्या गंभीर चेहऱ्याने सोन्या बागलाणकर म्हणाला.

"वैयक्तिक पातळी?"

"जाऊ दे ते!"

सोन्या बागलाणकराने टाकलेल्या दीर्घ सुस्काऱ्यावरून वैयक्तिक पातळीपेक्षा पातळाशी ह्याचा संबंध असावा हे मी ताडले. पण मी ती जिज्ञासा आवरली. कारण सोन्या बागलाणकर हा एक चिरंतन प्रेमभग्न आहे.

"मराठीत कॉफी मागव."

"जमणार नाही."—मी.

"सोडा मागव."—सो० बा०.

"इडलीबरोबर सोडा?"—'येडाच आहे!' हे वाक्य मनातल्या मनात आवरून धरत मी.

"प्रत्यक्ष मागवू नकोस. समज, तुला सोडा मागवायचा आहे. तुझ्या मातृभाषेत. तर कसा मागवशील?"—सो० बा० हातातला चमचा माझ्यापुढे रोखत.

"एक सोडा."—मी. 'कटकट साली!'—हे मनात.

" 'सोडा' हा शब्द मराठीत आहे? 'सोडा' ह्याचा मराठीत अर्थ काय?" सोन्या बागलाणकराचा सूर उलटतपासणीच्या वकिलाच्या वळणावर चालला होता.

"मराठीत 'सोडा' म्हणजे लीव्ह इट."

"लीव्ह इट हे मराठी?"

"जाऊ दे ना—"

"बरोबर."—सोन्या बागलाणकर.

"काय बरोबर?"—मी.

"सोडा—म्हणजे 'जाऊ दे ना'-'सोडून द्या' असा अर्थ झाला."

"प्यायचा सोडा हा शब्द मराठीत नाही."

"खायचा सोडा आहे. तोही इंग्लिश. वॉशिंग सोडा."

'वॉशिंग सोडा ह्या सोन्या बागलाणकराने खाल्ला केव्हा होता?' हा प्रश्न मी मनात दाबला.

"पण सोन्या, अस्सल मराठी खायचा सोडा असतो. सुकवलेली कोलंबी. सी० के० पी० वगैरे लोक खातात."

"सी० के० पी०!"—असे दात चावत म्हणून सोन्याने चमच्याखाली इडली चिरडली. सी० के० पी० लोकांनी याचे काय केलेय ते कळले नाही. "पण तुला प्यायचा सोडा हवा असला तर काय मागवशील?"

''सोडा.''

''मराठीत मागव.'' टेबलावर बुक्की आपटत सोन्या बागलाणकर म्हणाला.

''कां म्हणून?''

''तुझं भाषाविषयक धोरण तसं आहे म्हणून. तू मराठीवाला आहेस म्हणून.''

''मी मराठीवाला! संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत तूच तर ऑफिसला दांडी मारून—''

''ऑफिस कशाला म्हणतोस? कार्यालय म्हण.''

''कार्यालय? हे बघ सोन्या, कार्यालय म्हटलं की डोळ्यांपुढं लग्न उभं राहतं. आता बहुतेक ऑफिसात लग्नं इतकी जमताहेत की ऑफिसलाही कार्यालय म्हणायला हरकत नाही—''

''ही तुझी विषयांतराची खोड सोडून दे. तुम्हा लग्न झालेल्या लोकांच्या ट्रिका आमच्यावर नको चालवूस.''—हा सोन्या सकाळीच असा कशाने पिसाळला होता, मला कळेना.

''ठीक आहे. मी मराठीवाला. मग तू संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत कार्यालयाला दांडी मारून मिरवणुकीत जात होतास तो कशाला?''

माझा हा प्रश्न सोन्या बागलाणकराच्या जिव्हारी लागला असावा. कारण असे काही जिव्हारी लागले की तो खिशातल्या हातरुमालाने खसाखस कपाळावरचा अबीरबुक्का पुसावा तसे कपाळ पुसतो. त्यामुळे 'जिव्हार' हा अवयव सोन्याच्या कपाळाच्या आसपास असावा, असे मला नेहमी वाटत आले आहे. व्यवस्थित कपाळ पुसून झाल्यावर, पडलेला उमेदवार विजयी उमेदवाराचे अभिनंदन करताना जसा क्षीणपणाने हसून 'अभिनंदन' म्हणतो—नेमक्या त्याच स्टाइलने हसून सोन्या बागलाणकर म्हणाला, ''ते तुला ठाऊक आहे.''

''सॉरी हं सोन्या—आपलं क्षमस्व. मला तुझी खपली काढायची नव्हती.''

त्याचे काय झाले, त्या वेळी सोन्या बागलाणकर हा तारा बेलसरे नामक ग्रहदशेच्या फेऱ्यात सापडला होता. तिच्या नादाने सोन्या कम्युनिस्ट होऊन आरडाओरडा करत होता. पुढे महाराष्ट्राला मुंबई मिळायची ती मिळाली. सोन्याला मात्र तारा मिळाली नाही. गड आला, पण सोन्याच्या बाबतीत काहीतरी भानगड झाली.

ताराने एका आय० ए० एस० ऑफिसरशी लग्न केले. मुंबई सोडून दिल्लीला गेली. सोन्यानं कम्युनिस्ट पार्टी सोडून, सूड म्हणून जनसंघात गेला. मला तो प्रसंग आठवला. ह्याच हॉटेलात ''जगात खरं प्रेम असतं का?'' हा प्रश्न त्याने मला विचारला होता.

''गप्प काय बसलास?'' सोन्या बागलाणकराच्या दटावणीने मी भानावर आलो.

''तारा बेलसरे तुला बनवणार हे मी तुला बजावलं होतं, सोन्या! बारा पिंपळावरची—''

आणि एकदम माझ्या लक्षात आले की बारा पिंपळावरच्या मुंजासारखी बायकांसाठी मातृभाषेत म्हण नाही. मला हळूहळू मातृभाषेची कीव यायला लागली. साधा 'सोडा' नाही ज्या भाषेत मागवता येत, त्या माझ्या मातृभाषेचे भवितव्य मला कठीण दिसायला लागले.

"मग तुझं काय म्हणणं, सोन्या–इंग्लिश भाषा राहिली पाहिजे–"

"त्याशिवाय गत्यंतर नाही."–तो.

"मग हिंदी राष्ट्रभाषा कां नको?"–मी.

"आणि उद्या तुझी मद्रासला ट्रान्सफर झाली तर?"–तो.

"कशावरून?"

"ब्रँच निघते आहे."–तो.

"आपण नाही जाणार."–मी.

"नाही जाणार तर घरी बसा."–तो.

"आणि खा काय?"

"मातृभाषा." शेवटली चकती पॉकेटमधे घालणारा कॅरमवाला समोरच्या कॅरमवाल्याकडे बघतो तसे माझ्याकडे पाहत सोन्या म्हणाला.

"ठीक आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणं इंग्रजीतून सगळा व्यवहार सुरू झाला."

"समृद्ध भाषा आहे! यू कॅन् एक्सप्रेस व्हॉटएव्हर–" त्या समृद्ध भाषेतला हवा तो शब्द सोन्याला मिळेना.

"समृद्ध! ठीक आहे. इंग्लिशमधून मावशीला कांद्याचं थालीपीठ करायला सांग! इंग्लिशमधून अळवाची जुडी घेऊन दाखव!" इंग्लिशमधून 'आंघोळीचं पाणी काढलं का' असं बोंबलून दाखव. इंग्लिशमधून आंबाडीच्या भाजीवर झणझणीत–झणझणीत हं–तेलाची फोडणी घालून दाखव!"–मी सरबत्ती सुरू केली.

सोन्या बागलाणकर अंतर्मुख झाला. शर्टाच्या पहिल्या बटणाच्या काजापाशी हनुवटी खोचल्यानंतर 'अंतर्मुख'च म्हणतात अशी माझी समजूत आहे. नसेल तर थोडक्यात मी सोन्या बागलाणकराच्या इंग्लिशचा पतंग काटला. "सोन्यासाब बागलाणकरजी, अब तुमकू गप बैठनेकू क्या हुवा? जबान उघडो!"

जबान वगैरे हिंदी शब्द मी मवाल्यांच्या भांडणात ऐकलेले आहेत.

"तुझ्या बोलण्यात काही पॉइंट आहे."

सोन्या बागलाणकराने त्यानंतर इडलीचा तुकडा ज्या असहायपणाने तोंडात टाकला ते पाहून मला त्याची दया आली. म्हणून मग मी "सोवळ्यातले पापड कर इंग्लिश. भाजणीच्या चकल्या कर इंग्लिश. अळिवाचे लाडू, डोक्याला बांधायची टापशी, पंचा, पदर, कासोटा, 'गंपूच्या खेपेपासून किनई हे अस्संच होतंय'–'इश्श'–कर इंग्लिश..."–हे सगळे माझ्या भात्यातले बाण परत भात्यात टाकले. नाहीतर 'कर ह्याचं इंग्लिश' म्हणून मी सोन्या बागलाणकराचा नि:पात किंवा पब्लिकच्या भाषेत भुसा किंवा भुक्ना म्हणतात ते करणार होतो.

"बरं मग माझं राहू दे. तुझं भाषाविषयक धोरण काय?"

सोन्या बागलाणकराने संपूर्ण नांगी टाकली होती. मीदेखील मेलेल्याला मारण्यात काय अर्थ आहे म्हणून त्याला माझे भाषाविषयक धोरण समजावून द्यायला लागलो.

''सुरुवातीचं शिक्षण हे मातृभाषेतच झालं पाहिजे. म्हणजे मराठी मुलांचं मराठीत, गुजराती मुलांचं गुजरातीत, कानडी मुलांचं कानडीत, बंगाली मुलांचं बंगालीत, ओरिसातल्या मुलांचं–''

वास्तविक मी कानडी मुलांपर्यंतच थांबायला पाहिजे होते. पण बाजी आपली आहे ह्या थाटात मी उगीचच ओरिसात शिरलो. त्यांची मातृभाषा कुठली ते मला ठाऊक नव्हते. सोन्या बागलाणकरही विचारात पडला. त्यामुळे रेटून म्हणालो, ''–ओरिसातल्या मुलांचं ओरिसीत–''

''उरियात.''–सोन्या बागलाणकराने तेवढ्यात एक मार्क मिळवला.

''तेच.''–मी.

''पण मग गोव्यातल्या मुलांचं?''

''जरा थांब. वादग्रस्त मुद्यांना मग हात घालू.'' मी उरलेल्या इडलीला हात घालत त्याला डावलले. ''तव् व्यायइक वय्यंतअं इक्ह्‌ण–''

''इडली संपव आधी–आणि स्पष्ट बोल.''

''मॅट्रिकपर्यंतचं शिक्षण–'' मी थोडासा खजील झालो. खाता खाता बोलायच्या माझ्या खोडीबद्दल असे त्याने मला चापणे रुचले नव्हते.

''हं!''–सो० बा०.

''तर ते शिक्षण मराठीत.''–मी.

''इंग्लिश अजिबात नाही.''

''आहे तर! आठवी ते अकरावी इंग्लिश.''

''समज,'' सोन्या पुन्हा चमचा रोखीत बोलायला लागला, ''समज, 'अ' हा मुलगा मातृभाषा मराठी आणि चार वर्षं इंग्लिश, एवढ्याच भाषा जाणतो. समज, हा 'अ' पंजाबात गेला–''–सो० बा०.

''पण 'अ' हा माणूस पंजाबात जाईल कशाला?''–मी.

''समज गेला.''–सो० बा०.

''बरं, गेला.''–मी.

''गेला आणि सरदारजीच्या टॅक्सीत बसला. सरदारजीला मराठी कळणं शक्य नाही. इंग्लिशची खात्री नाही. देन व्हाट डझ ही डू?''

''एक सांगायचं विसरलो मी तुला, सोन्या. साइड् बाय् साइड् हिंदी शिकलीच पाहिजे.''

''म्हणजे आमच्या पोरांना ताप!''

''तुला कुठं पोरं आहेत?''

''माझ्या औरस पोरांना म्हणत नाही मी.''

सोन्याचे हे ऐकून मी दचकलोच. सोन्या बागलाणकराचे हे अंग (वस्त्र?) मला ठाऊक नव्हते.

''औरस?''

''म्हणजे माझ्या स्वत:च्या पोरांविषयी नाही–पण आपल्या एकूण मराठी पोरांना ताप.''

''तो कसा?''

''ऐक. हा 'अ' नावाचा मराठी मुलगा.''–पाण्याचा ग्लास पुढे ठेवत सोन्या बागलाणकर म्हणाला.

सोन्याला ही 'अ ब क'ची फार सवय आहे. त्याचं आणि ताराचं बिनसलं याचं कारण अ ब क हेच. ताराच्या बापाचा त्यांच्या लग्नाला विरोध आहे हे कळल्यावर वास्तविक सोन्या बागलाणकरापुढे दोन मार्ग होते. (अ) म्हाताऱ्याची कवळी उतरवून ठेवणे; (ब) त्याला फुकट मालीश करायला जाणे. त्याऐवजी सोन्या ताराला घेऊन हॉटेलात गेला, आणि ताराला ह्या प्रसंगातून पार कसं पडायचं हे ह्या काळ-काम-वेगाच्या भाषेत समजावून द्यायला लागला.

''बरं का तारा...हा कप. समज, हा तुझा बाप. आणि ही किटली. ही समज तुझी आई.''

आपल्या आईला स्वत:चा प्रियकर चक्क किटली म्हणतो हे ऐकून कुठली स्वाभिमानी मुलगी तयार होईल? तिने स्पष्ट सांगितले, ''बाबांना कपबिप म्हणायचं कारण नाही. इथं तू त्या कपाचा कान धरला आहेस. पण ते तुझा कान धरून तुला बाहेर फेकून देतील. आणि माझी आई किटली काय?–तुझी आई बादली आणि बाप हौद! गुड बाय्!'' असे म्हणाली आणि फॅमिली रूमचे दार आपटून गेली. ही कथा स्वत: सोन्या बागलाणकरानेच मला सांगितली होती...(''...काय सांगू–गेली ती गेली–इथं बाकी कम्युनिस्ट मुलगी हवीच होती कुणाला म्हणा! दोन स्पेशल चहा एकट्यानं प्यावा लागला मला–वेटर लेकाचा एक ट्रे परत नेईना...'' सोन्याचे दु:ख.) तेव्हापासून चहाचा ट्रे आला की सोन्या बागलाण-कराची सासुरवाडी आली म्हणतो आम्ही. सोन्याच्या गैरहजेरीत. तर हे एक विषयांतर झाले.

''पण सोन्या, अ ब कशाला?–समज, बंडू नावाचा एक मराठी मुलगा आहे.''–मी.

''जरा चांगलं नाव ठेव.''–सोन्या बागलाणकर.

''सुभाष म्हण.''–मी.

''पण हे नाव बंगाली वाटतं.''

''मग बंडू हेच नाव ठेवू. शिवाय बंडू हे प्रातिनिधिक नाव आहे.''

असला एखादा शब्द वापरला की सो० बा० निपचित पडतो थोडा वेळ.

''ठीक आहे. बंडू हा मराठी मुलगा. त्याला तुझ्या म्हणण्याप्रमाणं मराठी, हिंदी आणि इंग्लिश अशा तीन भाषा शिकाव्या लागणार. आणि उत्तर-हिंदुस्थानी मुलाला मात्र फक्त हिंदी आणि इंग्रजी म्हणजे दोनच. मग मराठी मुलावर हा अन्याय कां?''

''त्याला उपाय आहे.'' मी सर्वांगीण विकासाचा विचार करणारे लोक असतात तसा चेहरा करून सुरुवात केली, ''तर त्याला उपाय काय?...दो डोशा लाव.''

सोन्या चमकला. मग त्याच्या लक्षात आले की समोरची इडली संपली होती. आता हा नवा मद्राशी मॅनेजर आल्यापासून एक इडली आणि एक कॉफीवर दोन तास ढकलता येत नव्हते. गेल्याच आठवड्यात भारताच्या सीमारक्षणाविषयीचा आमचा वाद आम्हांला त्याच्या दटावणीमुळे आवरावा लागला होता.

''काऽना पिनिश हुवा तो टॅबल काऽऽऽली करो जी–कष्टमर वेऽऽट करता ऐ. तुम शिंपली यक् कप काऽऽऽऽऽफि लेकर दो गंऽऽऽटा कालिपिली भक्भक करकू बॅटता ऐऽऽ. ये क्या दरमश्याला ऐ क्याऽऽ ?...''

यापुढे फक्त मराठी हॉटेलात जायचे, असे ठरवून बाहेर पडलो होतो. दोन दिवसांत निश्चय बदलला. कारण पहिल्याच मराठी हॉटेलात बोर्ड होता : 'हॉटेल ही खाण्याची जागा आहे. वायफळ गप्पा मारत बसण्याची नव्हे. ग्राहकांनी ह्याची नोंद घ्यावी.' आम्ही नोंद घेतली आणि पुन्हा ती पायरी चढलो नाही. म्हणजे पुन्हा ह्या मद्राशाचे पाय धरणे आले.

''सादा के मसाला–''

''मसाला.''

''कडक भाजना हं.'' सोन्याने वेटरला जाता जाता बजावले. ''बोला.''

''तर मी काय म्हणत होतो? आपला बंडू–''

''बंडू?''

''उदाहरणार्थमधला–''

''तर बंडू मराठी असल्यामुळं शिकतोय तीनतीन भाषा–''

''वेट्–''

''चार!''

''चार कशा?''

''कशा काय? मातृभाषा, राष्ट्रभाषा, प्लस इंग्लिश, प्लस सेकंड लँग्वेज. व्हेअर आर यू माय फ्रेंड?''–विजयी सोन्या.

''खरंच, संस्कृत!''-पराजयी मी.

''डोसाको टायम् लगेगा साब.''

''दो उप्पीटम् लाव...म्हणजे आपल्या मुलांना चार आणि हिंदी मुलांना तीन.''

''त्याला उपाय आहे.'' भाषा ह्या विषयावर माझे विचार इतके परिपक्व झाले असतील अशी मलाही कल्पना नव्हती.

''सांग उपाय.''–सोन्या.

''उत्तर हिंदुस्थानातल्या मुलांना एक साउथ इंडियन् लँग्वेज कंपल्सरी. कानडी, तेलगु किंवा तामीळ.''

''शहाणा आहेस! म्हणजे उत्तर हिंदुस्थानातल्या प्रत्येक शाळेत तीन मद्राशी नेमावे लागतील. म्हणजे मद्राशांना आणखी जॉब्ज.''–सोन्या बागलाणकर 'मद्राशी' हा शब्द फारच व्यापक अर्थाने वापरतो. ''आणि पोरांना चारचार भाषा शिकायच्या म्हणजे क्रुएल्टी

आहे. शिवाय गणित असतं.'' सोन्याला एखाद्याला ब्रह्मांड आठवावे तसे शालेय जीवनातले गणित आठवते. ''शिवाय इतक्या लांब मद्राशी जाईल कशाला?''

''सोन्या, मद्रासी म्हणजे मराठी नव्हे, गिरगावातून दादर ब्रँचला ट्रान्सफर झाल्यावर ठणाणा करणारे! ती धाडसी जात आहे–''

''बरं समज, उत्तर हिंदुस्थानातल्या 'अ' गावचा 'ब' हा मुलगा मद्रासी भाषा शिकला.'' अब ही जित्याची खोड आहे म्हणून मी सोडून दिली. ''तर तो ती भाषा बोलणार कोणाकडे? आणि जर बोलला नाही तर मॅट्रिक झाल्यावर विसरणार. आपण संस्कृत शिकून विसरलो नाही का?''

हा सोन्याचा मुद्दा विचारात घेण्यासारखा होता. शाळा सोडल्यानंतर लग्नात एकदा भटजी 'मम म्हणा' म्हणाले त्या वेळी मी चुकून 'मम मे अस्मान् नौ अस्माकम् नः' असे ओरडलो होतो. भटजी भेदरून लाजाहोमात पडत होते. जानव्याला धरून खेचले.

''मला वाटतं सोन्या, संस्कृत ड्रॉप करावं. आफ्टर ऑल मराठी कंपल्सरी पाहिजे. कारण आपल्या मदरटंगमधून आपले थॉट्स जितके क्लिअरली एक्सप्रेस करता येतात तितके फॉरिन लँग्वेजमधून करणं डिफिकल्ट जातं. इंग्लिश मात्र मस्ट बी कंपल्सरी...उप्पीट थंडा क्यूं लाया?''

''गरम नही साब–'' वेटरने संपर्काधिकारी करतात तितक्या अलिप्तपणाने आणि उप्पीटाइतक्याच थंडपणाने खुलासा केला.

''पण संस्कृत काढून कसं चालेल? आपलं इंडियन कल्चर संस्कृतमधे आहे. सेकंड लँग्वेज पाहिजेच.''

''त्याला उपाय आहे. स्स्स स्सस्स! (दाढेखाली उप्पीट, सांजा अगर पोहे खाताना खडा सापडला की होणारा आवाज यापेक्षा वेगळ्या रीतीने लिहून काढता येत नाही याबद्दल दिलगीर आहे. असो.)...ही मद्राशी हॉटेलं आपण पंजाब्यांना कॅप्चर करायला सांगितलं पाहिजे. तंदुरी चिकनमधे खडा तरी नसतो.''

''सहा रुपये पडतात. इथं तीस पैसे. सहा रुपयांपेक्षा खडा बरा...मरू दे. सेकंड लँग्वेजचं बोल.''

''फ्रेंच ठेवावी.''

''त्यापेक्षा जर्मन बरी.''

''मग रशियन कां नको? काय प्रोग्रेस झालाय. उद्या चंद्रावर जातील रशियन्स– आपल्याला सालं डोंबिवलीला जायचं तर गर्दीत जीव हैराण! खरं म्हणजे सायन्सवर जोर पाहिजे. आर्ट्स कॉलजेस बंद केली पाहिजेत. काय करायचंय संस्कृत, अर्धमागधी, लॉजिकबिजिक.''–मी.

''मग मराठी तरी कशाला? सध्याचं एज सायन्सचं आहे.''

''पण मातृभाषा पाहिजे.''–मी. तेवढ्यात मसाला डोशा आला. मी वेटरला उप्पीट दाखवीत म्हटले, ''इसमें खडा है सब.''

''कौन खडा है?'' हा वेटर गेल्या जन्मी एस्किमो असावा इतका थंड आहे.

''हमारा काका खडा है!'' मी उखडलो.

''उसको कॉफी पिलाव.'' वेटर निर्लज्जपणाने बशा उचलून घेऊन गेला.

''काय माजले आहेत. नॉनमराठी लोकांना हाकलून दिलं पाहिजे मुंबईतून. मुंबईत तरी मराठीच बोललं पाहिजे.'' एवढे बोलून मी जीभ चावली. सोडा मराठीत मागवता येत नाही हे आठवले. ''तर भाषाविषयक धोरणाचं काय आहे सोन्या, ती एक समस्या आहे.''

''पण ती सोडवायची कशी?''

''सेकंड लँग्वेज रशियन करावी–''

''मग अमेरिकेला काय वाटेल?–आपल्या अलिप्ततेच्या धोरणाला बाधा येते. वास्तविक आपण आशियाई.''

''कोण?''

''आशियाई–आशियातले. आपल्याला एक तरी आशियाई भाषा यायला नको?''–सोन्या.

''पण आशियाई भाषा कुठली?''–मी.

''तिबेटी किंवा ब्रह्मी. शिवाय आता आफ्रो-आशिया एक होतोय. म्हणजे अरेबिक किंवा पर्शियन् आलं पाहिजे.''

''म्हणजे एकूण काय झालं?''–मी.

''तूच सांग.''–तो.

''म्हणजे मराठी, इंग्लिश, हिंदी, रशियन–'' मी.

''मला वाटतं, संस्कृत हवीच.''–तो.

''ठीक आहे. मराठी, इंग्लिश, हिंदी, रशियन्, संस्कृत, आफ्रो-आशियाईपैकी एक भाषा.''–मी.

''मद्राशी राहिली.''–तो.

''हो. मराठी, इंग्लिश, हिंदी, तामीळ, तेलगु किंवा कानडी, रशियन, संस्कृत, अरेबिक किंवा पर्शियन किंवा ब्रह्मी–थोडक्यात म्हणजे फ्रूट सॉल्टच्या बाटलीबरोबरच्या कागदावर असतात तेवढ्या भाषा एका मुलाला किंवा मुलीला यायला हव्यात. मला वाटतं सोन्या, ह्यापेक्षा माझं भाषाविषयक धोरण जास्त चांगलं आहे.''

''कुठलं?''

''गप्प बसण्याचं.''

''कां म्हणून?'' सोन्याने टेबलावर मूठ आपटली.

''सांगतो. तू मूठबीठ आपटू नकोस. तो मॅनेजर बघतोय.''

''मग इथं काय फुकट घालतोय काय खायला?''

''म्हणजे काय टेबलावर मुठी हापटायच्या?–ते जाऊ दे. हे भाषाविषयक धोरण अंगाशी कसं येतं याचं उदाहरण सांगतो. तुला शांत्या दिघे ठाऊक आहे?''

''हो. सेंट्रल टेलिग्राफमधे त्याची कझिन् होती तोच ना?–लग्न झालं का रे तिचं?''
''झालं.''
''कुणाशी?''
''शांत्याशीच.''
''पाजी!'' समोरचा डोशा चिरडीत सोन्याने हा शब्द दाताच्या आत उच्चारला.
''कां रे?''
''मी तिच्यासाठी शांत्याला कितीतरी चांगलं स्थळ सुचवलं होतं–''
''कुणाचं?''
''शांत्या दिघ्यात तिनं माझ्यापेक्षा काय जास्त पाहिलं?''
''म्हणजे तू स्वत:चं स्थळ सुचवायचं?''
''कां नाही?'' सोन्याच्या चेहऱ्यावर अपार खिन्नता होती.
''सॉरी!...तर हा शांत्या दिघे मराठीशिवाय बोलायचं नाही अशी प्रतिज्ञा करून बसला. कां?''
''कुमुदवर इंप्रेशन मारायला.''
''कोण कुमुद?''
''तीच ती त्याची कझिन्.''
''असेल. तसं असेल. तिला घेऊन मेट्रोला गेला. आणि तिथल्या तिकिटाच्या खिडकीतल्या माणसाला म्हणाला, 'अडीच रुपये शुल्काच्या दोन प्रवेशपत्रिका द्या.' खिडकीमागल्या माणसानं दहा वेळा इंग्लिशमधून विचारले. ह्याचे आपले एकच–'अडीच रुपये शुल्काच्या दोन प्रवेशपत्रिका द्या.' मागले लोक ओरडायला लागले. मॅनेजर आला. हा क्यू सोडायला तयार नाही. मॅनेजर म्हणाला, 'एक्स्क्यूज मी सर.' शांत्या पेटलेला. तो म्हणाला, 'सर गेला खड्ड्यात!' मॅनेजरनं पोलिसला बोलावलं. हा त्या सब्इन्स्पेक्टरला म्हणतो, 'तुम्ही कोण?'
'सब्इन्स्पेक्टर ऑफ पोलिस.'
'मराठीत बोला. उपपर्यवेक्षक म्हणता येत नाही तुम्हांला?' तेवढ्यात कुणीतरी म्हणालं, 'पियेला आदमी है.' लोक हसले. पो० स० इन्स० भडकला. 'दात क्या निकालता है?' मग लोकांनी निकाललेले दात लपवले. इकडे शांत्याची कझिन घाबरली. तिने त्या सब्इन्स०ला सांगितले की, टू-एट्‌ची दोन तिकिटं पाहिजे आहेत.' स० इ० मॅनेजरला म्हणाला, 'इसको तिकिट कायकू नय देता?'
'किसको?'–मॅनेजर.
'इसकू–और इसके इसकू–'
'हम किधर नही देता? वेल् जंटलमन, हॅव् आय रिफ्यूज्ड?'
'मराठीत बोल. आता यापुढं इये मराठीचिये नगरी इंग्रजीची ऐट नको. पौरुषासि अटक गमे जेथ दुस्सहा–'

मग त्या सबइन्स्पेक्टरच्या डोक्यात प्रकाश पडला. तो म्हणाला, 'साहेब, अस्सल मराठी असून इंग्लिश सिनेमा बघता. मग इंग्लिश सिनेमाचं तिकिट इंग्लिशमधे का नाही मागत? व्हेन इन् रोम, रोम लाइक रोमन्स रोम, अशी म्हण आहे'...शांत्याला पटलं. तेव्हापासून शांत्या मराठी सिनेमाला मराठीत तिकिट मागतो. हिंदीला हिंदीत. सत्यजित रायचे सिनेमे बघत नाही.''

''कां?''

''त्याला बंगालीत तिकिट मागता येत नाही. तेव्हा आपण बोध काय घ्यायचा?''

''शांत्याचं शेवटी कुमुदशीच लग्न झालं. क्क्क्याय्?''

–सोन्याने हा बोध घेतला.

''हा बोध नव्हे सोन्या. बोध असा, की भाषाविषयक धोरण कडक ठेवणे हे आपले काम नव्हे.''

''हे बाकी पटलं. माझीच गोष्ट घे.''

''सोन्या, हे आपलं पंचतंत्रांतल्या गोष्टीसारखं चाललंय. कोल्हा सिंहाला म्हणाला, दमनकाची गोष्ट ठाऊक आहे का?–मग दमनकाची गोष्ट. त्याचं तात्पर्य सांगताना दमनक कर्कोटकाची सांगतो. मग कर्कोटक उंदराची सांगतो. उंदीर मांजराची–''

''नाही. माझी गोष्ट लहान आहे. नंदिनी चौबळ ठाऊक आहे तुला?''

''नाही.''

''खारला आठ बावनच्या लोकलला चढते ती–''

''अरे, आठ बावनच्या लोकलला खारला काय एकच बाई असते?''

''बाई काय म्हणतोस? शी इज स्वीट ट्वेंटिसेवन!''

''ठीक आहे. तिचं काय?''

''तिचं आणि आमचं गेल्या रविवारी भाषेवरून मोडलं.''

''म्हणजे?''

''तेच ऐक. गेल्या रविवारी तिला घेऊन 'तांबे आरोग्यभुवना'त गेलो.''

''भटं लेको तुम्ही!''

''एक्झाक्टली हेच वाक्य.''

''कुणाचं?''

''नंदिनी चौबळचं–ती सी०के०पी० आहे.''

मघाशी सोन्याने सी०के०पी० म्हणून इडली का चिरडली ते आत्ता कळले.

''मग? तिला काय इंग्लिशमधून प्रेमपत्र लिहिलंस की काय?''

''प्रेमपत्र काय लिहिता? तेच तेच लिहून कंटाळा आलाय मला. मी सरळ वधूवरसूचकमंडळातून पत्ता घेऊन भेटलो होतो. जवळजवळ सगळं ठरलं होतं. तिचा बापसुद्धा इंटरकास्ट मॅरेजला तयार होता.''

''किती मुली त्याला?''

''सेवन्.''

''मग तो इंटरनॅशनल मॅरेजलासुद्धा तयार असेल.''

''ऐक. तिला घेऊन 'तांबे आरोग्यभुवना'त गेलो. म्हटलं, टु नो ईच अदर ऑफ मोअर म्हणजे मोअर ऑफ...''

''समजलं.–अधिक परिचय वाढावा.''

''राइट! आमचं हेच होतं. नको त्या ठिकाणी नको ती भाषा येते. तर–''

''नंदिनी चौबळ.''

''हो. तर मी म्हटलं, 'आपण दोन ताटं मागवू या.' तशी ती पिचकन हसली.''

''कां?''

''मलाही कळेना. मी विचारलं, 'हसलात कां मिस् चौबळ?' तर म्हणते, 'अय्या! ताट काय म्हणता?' ''

हे वाक्य म्हणताना सोन्या बागलाणकराने तिच्यासारखे म्हणून दाखवण्याचा जो काही अभिनय करून दाखवला आणि चेहराबिहरा फुगवला त्यावरून मिस् नंदिनी चौबळ ही बागलाणकरऐवजी महाबळ व्हायला अधिक योग्य असावी, अशी माझी खात्री झाली. सोन्या बिचारा लग्नाला भलता पिकलाय. ते एक असू दे.

''अरे पण सोन्या, ताट म्हणालास ह्यात चूक काय आहे?''

''तूच पाहा! मी हेच विचारलं. तर मला म्हणाली, 'डिनर म्हणा.' मी म्हटलं, 'आल् राइट्! डिनर.' वास्तविक दुपारची वेळ. म्हणायचंच तर 'लंच' म्हणायला हवं. पण मनात म्हटलं, आपली वेळ बरी नाही. मी त्या वेटरला म्हटलं, 'दोन डिनर.'–तर तो वेटर दीडशहाणा निघाला. मला म्हणतो, 'साहेब, सरळ दोन ताटं म्हणा ना!' मी तिथल्या तिथं थोतरणार होतो त्याला. पण म्हटलं जाऊं दे. सीन नको. वर मला विचारतो, 'साधं ताट की स्पेशल?' मग मी तडकलो. म्हटलं, 'स्पेशल हा काय मराठी शब्द आहे? साधं की विशेष म्हण...आज गोड काय आहे?'

'श्रीखंड.'

'मला श्रीखंड नको.' नंदिनी चौबळ म्हणाली.

'कां? श्रीखंड आवडत नाही?'

'कालच आमच्या ऑफिसची पार्टी झाली होती. त्यात श्रीखंडच केला होता.'

'केला होता?–केलं होतं म्हणायचं.'

'केला होता हेच बरोबर.'

'कसं शक्य आहे? बासुंदी ती, श्रीखंड ते, लाडू तो–'

'भटांत म्हणत असतील.' नंदिनी म्हणाली.

'मग परभटांत काय म्हणतात?' कुठल्या मृत पूर्वजाचं रक्त माझ्या अंगात भलत्या वेळी उसळलं देव जाणे. वास्तविक माझ्यात कम्यूनल स्पिरिट अजिबात नाही. मी चिकनसुद्धा खातो. 'परभट' म्हटल्यावर ती भडकली.

'आय् ॲम् सॉरी मिस्टर बागलाणकर, पण आपलं लग्न होणं शक्य नाही. मला संकुचित मनाच्या माणसाशी संसार करता येणार नाही. ज्यालात्याला आपल्या मातृभाषेचा अभिमान असतो. माझं मराठीवर प्रेम आहे.'

'अहो, पण माझंही आहे...तू काय इथं करतो आहेस?' मी वेटरला कचकावला. तो पळाला. 'मिस् चौबळ, माझंही मराठीवर प्रेम आहे.'

'दिसतंय. मला परभट म्हणून–'

'तुम्ही मला भट नाही म्हणालात?'

'मग तुम्ही आहांतच भट!'

'मग तुम्ही–'

'आम्ही सी० के० पी० आहोत.'

'आम्हीसुद्धा डी०आर०बी० आहोत.'

'डी०आर०बी०–ही काय जात आहे की मोटारचा नंबर?'.

'देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हण–'

'आय् ॲम् सॉरी.–आपलं जमणार नाही. एखादी ताट वाढणारी काकू शोधा.'

'थांबा मिस् चौबळ. निदान जेवून तरी जा. मी दोन डिनर्स मागवली आहेत.'

'तुम्हीच गिळा!'–असं म्हणून गेलीसुद्धा.'' असे म्हणून सोन्या बागलाणकर स्तब्ध झाला आणि हातरुमालाने कपाळ घासायला लागला.

''मग तू काय केलंस?''

''काय करणार? दोन ताटं पुढ्यात घेऊन जेवलो.''

सोन्या बागलाणकराचे एक बरे आहे. दर प्रेमभंगाला त्याला दुप्पट जेवायलाखायला मिळते.

''तूच सांग, श्रीखंड तो, ती का ते, याच्यावर कुणाचं लग्न मोडलेलं तू ऐकलं आहेस?''

''प्रश्न श्रीखंडाचा नाही, सोन्या. मराठी माणूस तत्त्वासाठी काय वाटेल ते मोडेल. हा भाषेच्या अभिमानाचा प्रश्न आहे.''

''अरे, पण मी काय कानडी आहे?''

''तेही खरंच.''

''मग आता सांग, आपल्यासारख्यांनी भाषाविषयक धोरण काय ठेवायचं?''

मला वाटले होते, सोन्या इडली, उप्पीट आणि डोशा यानंतर मूळ प्रश्न विसरला असेल. पण नाही. भलता चिवट.

''माझं भाषाविषयक धोरण एकच आहे, सोन्या.''

''कुठलं?''

''नरमाईचं.''

''कां म्हणून?''

''आपल्याला दुसरं कसलंही धोरण परवडत नाही म्हणून. हे बघ, आपण एका विशिष्ट वर्गाचे प्रतिनिधी आहो.''

''कुठला वर्ग?''

''धक्के खाणारा! सोन्या, हापिसला जाताना आपण लोकलमधे म्हण किंवा बसमधे म्हण, धक्के देणारे की खाणारे?''

''खाणारेच.''

''आपण क्यू मोडून घुसणारे का?''

''छे.''

''कंडक्टर 'जगा नही, उतरो' हे नेमकं आपल्यालाच सांगतो की नाही?''

''आपल्यालाच.''

''देवळांत चपला कुणाच्या चोरीला जातात?''

''आपल्याच. आणि कुठंही गेलं तरी छत्र्यासुद्धा आपल्याच.''–सोन्या.

''सगळ्या चांगल्या पोरी कुणाचे हात धरून पळतात?''–मी.

''दुसऱ्यांचे.''–तो.

''आपल्या संडासाच्या टाकीला पाणी असतं?''–मी.

''नाही.''–तो.

''शब्दकोडं आपल्याला फुटतं?''–मी.

''नाही.''–तो.

''मराठी शाळेपासून मॅट्रिकपर्यंत पहिले नंबर कोणाचे आले?''–मी.

''दुसऱ्यांचे.''–तो.

''आपल्या सख्ख्या, चुलत अगर मातुल घराण्यांतल्या एका तरी माणसाला इंग्लंडला जायची स्कॉलरशिप् मिळते?''–मी.

''नाही.''–तो.

''पानवालाच घे. दोन गिऱ्हाइकं एकदम आली. त्यांपैकी एक आपण. तर पान प्रथम कोणाला देतो?''–मी.

''दुसऱ्याला.''–तो.

''प्रमोशन कुणाला मिळतं?''–मी.

''दुसऱ्याला.''–तो.

''हापिसात दांड्या कोण मारतं?'' मी म्हणालो.

''दुसरे.'' तो उत्तरला.

''म्हणजे हे जग आपलं की दुसऱ्याचं?''

''आपलं काय आहे सालं ह्या जगात?''

''मग भाषाविषयकच काय, कसलंही धोरण ठरवणारे आपण कोण सांग? आपल्या इच्छेला मान देऊन आजवर कुणी वागलंय का?''

''कोणी नाही. अरे, आम्ही रेडिओ लावतो त्या वेळी नेमका कुटुंबनियोजनावर परिसंवाद. लोकांनी लावला की मात्र 'बोल राधा बोल संगम होगा के नही.'–तात्पर्य, जग लोकांचं.''

''मोठ्यानं गाऊ नकोस.''

''तर मग कॉफी मागव.''

''रंड कप कॉफी.''

सोन्या ओरडला.

''काऽऽय?''

''मद्राशाच्या भाषेतलं एवढंच येतं मला.''

सोन्या बागलाणकरानं भाषाविषयक धोरण बदलले होते आणि मीही!

# एकेकाचं मराठी

## [मी आणि सोन्या बागलाणकर]

''...यापुढे बायाबापड्यांच्या मराठीत लिहिलं पाहिजे.'' मराठी साहित्य संमेलनातील एक अध्यक्षीय आदेश.

''काही झालं तरी जातीय अहंकारापासून मुक्त नाही लेको तुम्ही!''

''सोन्या, तुला काय किंवा मला काय, जो काही पगार मिळतो त्यात जातीयबितीय तर सोड, पण कसला चिमूटभर तरी अहंकार परवडतो का? लेका, परवा ठाकूरद्वारचा भिकारी खेकसला माझ्या अंगावर! 'मधी मधी काय उभे राहता? साली भीक नाही घालायची ऐपत तर निदान आमच्या धंद्याच्या आड तरी नका येऊ...' सोन्या, हे भिकाऱ्याचे शब्द आहेत! मी अक्षर न बोलता बाजूला झालो–समोरच्या फूटपाथवर तुम्ही त्या होमेपाथीवाल्या डाक्टरकडे साबुदाणे घ्यायला गेला होता तेव्हा.''

''साबुदाणे घ्यायला नव्हतो गेलो. स्वागतसमितीचा सभासद नोंदवला त्याला.''

''कसली स्वागतसमिती?''

''हीच. लामणगाव मराठी साहित्य संमेलन.''

''असल्या नावाचं गाव आहे आपल्या देशात?''

''तुला काय वाटलं, तुझ्या देशात फक्त पुणं आणि मुंबई ही दोनच गावं आहेत? जातीय अहंकार म्हणतो मी तो हाच! तिथे आहे ती संस्कृती! तिथे बोलता ती भाषा.''

पुष्कळ वेळा सोन्या बागलाणकर काय बोलतो ते त्याचे त्याला तरी कळते की नाही देव जाणे. सुमारे एक डोसा संपवून दुसरा यायला लागतो तितका वेळ सोन्या बडबडत होता. त्यावरून मला एवढेच उमगले की, हल्ली जी काही मराठी म्हणून भाषा लिहिली जाते ती बहुजनसमाजाची नाही.

''ती फार तर तुझ्या पुण्या-मुंबईची असेल.'' सोन्या.

''सोन्या पुण्याची आणि मुंबईची मराठी फारच निराळी. पुण्याच्या मराठीत मस्त ठसका असतो लेका. आपल्या अंतू रानड्याची मेव्हणी आली होती चाळीत, आठव. मुंबईची एक तरी पोरगी तसलं मराठी बोलेल काय? उगीच पुण्या-मुंबईची मराठी एकाच गाठोड्यात बांधू नकोस.''

अंतू रानड्याची मेहुणी हा उल्लेख सोन्याला जिथे लागला त्या जागेला मराठीत 'जिव्हार' म्हणतात. कारण त्यानंतर समोरचा डोसा तो क्षणभर नुसताच निरखून पाहू लागला. धनाजीला (की संताजीला) कोणाचा तरी घोडा पाण्यात दिसत होता किंवा कोणाच्या तरी घोड्याला कोणीतरी पाण्यात दिसत होतं तशी अंतू रानड्याची मेहुणी त्याला डोशात दिसत असावी. घारे डोळे आणि पिंगट केस. सोन्या पंधरवडाभर आउट होता. रविवारचा आमचा ठरलेला मद्राशी चुकवून तिला 'मॅजिस्टिक'ला मॉर्निंग शो दाखवायला घेऊन गेला होता. असो.

''तू भलतीकडे भलते विषय काढतोस!'' (डोशात दिसणारी अंतूची मेहुणी पुनरपी गुप्त जाहली.) ''हे संमेलन गाजणार आमचं. तुमच्या पुण्या-मुंबईच्या–''

''पुन्हा पुण्या-मुंबई–''

''अरे, बाय् पुण्या-मुंबई आय् मीन् तुम्ही हे जे तुमच्या तथाकथित सुसंस्कृत समाजाच्या–''

''तथा कसले थित म्हणालास?''

''कथित–म्हणजे ज्याला आपण मराठीत सो कॉल्ड् सभ्य किंवा कल्चर्ड समाज म्हणतो त्याच्या मराठीला जे तुम्ही स्टँडर्ड म्हणता–त्यालाच आमचे अध्यक्ष सुरुंग लावणार आहेत! म्हणून तर आम्ही संमेलन लामणगावला घेतलं आहे.''

''तुम्ही म्हणजे?''

''म्हणजे आज ज्यांना, मराठी भाषेला संस्कृत भाषेच्या सोवळ्यात गुंडाळून ठेवली आहे याची खात्री पटली आहे त्यांनी!''

''मजाच आहे की च्यामारी! मराठी संस्कृतच्या सोवळ्यात गुंडाळली आहे हे माहितीच नव्हतं मला.''

''तुला कशाला माहिती असेल!''

''खरंच आहे. आपली तर सेकंड लँग्वेज पाली होती. तुम्ही संस्कृतवाले.''

''खा, ते उप्पीट खा!'' असहाय झाल्यासारखा चेहरा करून सोन्या म्हणाला.

मद्राशाचं रुपया दीड रुपयाचं साप्ताहिक ऋण चुकवून आम्ही हाटेलाबाहेर आलो.

त्यानंतर सोन्या विजेसारखा अधूनमधून चमकायचा. हातात एक पावतीपुस्तक. सभासद-नोंदणी, प्रतिनिधींची सोय, असल्या वादळात नुसता भिरभिरत होता. थोडक्यात म्हणजे, सोन्या बागलाणकर लामणगाव मराठी साहित्य संमेलनात अथपासून इतिपर्यंत गढला होता. बाकी सोन्या बागलाणकरचा मला एका बाबतीत फार हेवा वाटतो. ज्या नोकरीतून त्याला त्याचे अन्नोदक मिळते तेवढे सोडून दरवेळी अथपासून इतिपर्यंत गढण्यासारखं काही ना काही तरी सार्वजनिक काम त्याला मिळत असते. अर्थात साहित्य आणि राजकारण ही मात्र त्याची विशेष आवडती क्षेत्रे! आता हे कुठले तरी लामणगाव साहित्यसंमेलन त्याने लावून घेतले होते. म्हणजे जळी-स्थळी-काष्ठी-पाषाणी त्याला फक्त अध्यक्ष, उपाध्यक्ष, स्वागताध्यक्ष, विषयनियामक-समिती ह्याखेरीज काही म्हणजे काहीही

दिसणे शक्य नव्हते. बाकी तसे बघायला गेले तर सोन्या बागलाणकर म्हणजे काही कोणी मोठा लेखक किंवा वक्ता-बिक्ताही नव्हे. पण कशाने तरी त्याचे चार लोकांत नाव आहे एवढे निश्चित! वर्तमानपत्रांतदेखील एखाद्या पत्राखाली 'असे संस्थेचे कार्यवाह श्री० एस० व्ही० बागलाणकर कळवतात' असे दहापाच वेळा मी वाचलेय! सोन्या म्हणजे साधारणत: ज्याला 'एवंगुणविशिष्ट' म्हणावे त्यातला आहे.

आणि एके दिवशी वर्तमानपत्रात सोन्याच्या लामणगाव साहित्य संमेलनाचा वृत्तांत प्रकटला. अध्यक्ष भाषण करत आहेत असा फोटोही होता. स्टेजवरच्या कोपऱ्यात एक चष्मेवाला ठिपका दिसत होता तो सोन्या असावा असे मला वाटले. 'शुद्धलेखनाची अडगळ दूर करा' असा अध्यक्षीय संदेशही होता. माझे वर्तमानपत्री वाचन साधारणत: मथळ्यावरच संपते. अगदीच तसे विशेष असल्याखेरीज मी मजकुरात तोंड घालत नाही. पण 'शुद्धलेखनाची अडगळ दूर करा.' हे वाचून उत्साह वाढला. मराठी शुद्धलेखन आणि इंग्रजी स्पेलिंग ह्या मुलांच्या प्रगतीच्या मार्गावरच्या धोंडी आहेत हे माझे जुने मत. त्याला आता मराठी–लामणगावच्या का असेना–साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षाकडून पुष्टी मिळाली म्हटल्यावर आपण खूष. आणि सोन्याची माझी त्यानंतर पहिली भेट आमच्या मद्राशाच्या हाटेलात झाली त्या वेळी मी सोन्यापुढे तावातावाने ही खुषी व्यक्त केली.

''आपण खूष हं सोन्या तुझ्या अध्यक्षावर! हवंय कशाला शुद्धलेखन! विचार शुद्ध पाहिजेत. काय? हे ऱ्हस्व लिहा ते दीर्घ लिहा. करायचं काय! अध्यक्ष भलता भारी निवडलात लेको तुम्ही. मास्तर लोक खूष असतील. अरे, वह्या तपासायचा त्रास केवढा चुकला. खरं म्हणजे मराठी ही आपली मायबोली. काय? म्हणजे ज्याची माय जशी बोलते तशी बोलायची भाषा. तिच्यावर संस्कृताचा सासुरवास कां म्हणून? बोले तैसा चाले त्याची जर वंदावी पाउले, तर बोले तसा लिहे त्याची कां नाही वंदावी पाउले?''

मी इतका बोलत होतो आणि सोन्या बागलाणकर जणू काय मद्राशाच्या रेडियोवरून कोणीतरी तामीळ भाषेत 'खोबरेल तेल शुद्ध करण्याच्या क्रिया' ह्या विषयावर बोलत असावे अशा निर्विकार मनाने समोरचा डोसा कुरतडून खाऽत बसला होता. सोन्याची ही एक अत्यंत इरिटेटिंग सवय आहे. आपण एखाद्या विषयावर आतडे किंवा जे काही पिळवटून बोलता येण्यासारखे असेल ते बोलावे. सोन्याला जर इंट्रेस्ट नसेल तर तो जन्मजात बहिरा असल्यासारखा बसतो. बोलणे हा केवळ त्याचा एकट्याचा जन्मसिद्ध हक्क आहे आणि आम्ही मात्र त्याचे नुसते श्रोते! तो बोलत असताना आमच्या समोरचे उप्पीट थंड होऊन त्याच्या गारगोट्या झाल्या तरी आम्ही ह्यांची विद्वत्ता ऐकताना इकडले तिकडे करायचे नाही. आणि इथे मी चांगला हर्ष म्हणावा असला आनंद व्यक्त करतोय तर सोन्या संथपणाने डोसा स्वंथ करतोय. शेवटी एकदाची त्याला वाचा फुटली.

''बोबू मंमी वावांटो'' तोंडात मसाला डोसा कोंबलेल्या अवस्थेत सोन्या बागलाणकर म्हणाला.

त्याच्या एकूण आविर्भावावरून त्या स्वरव्यंजनयुक्त ध्वनीचा अर्थ 'बोल तू. मग मी

सांगतो' असा असावा हे मी ताडले. नशीब, उप्पीट खात नव्हता. सोन्या उप्पीट तोंडात ठेवून बोलतो त्या वेळी नुसते थूत्कार असतात.

"झालं तुझं एकदाचं खाऊन?"

"साले काजू म्हणून जळके शेंगदाणे घालतात. ए, कॉफी लाव दो."

"सोन्या, माझा मुद्दा राहिला–"

"काय तुझा मुद्दा?" सोन्या संथपणाने पुसता झाला.

बाकी इतकी चिंचोळी एंट्री असलेला मेंदू मी तरी पाहिला नाही. मराठीचे शुद्धलेखन ह्या विषयावर मी त्याच्याशी दोन डोसे आणि एक उप्पीट इतका वेळ बोलत होतो, पण त्याच्या मज्जातंतूवर फक्त 'उप्पिटात जळके शेंगदाणे कां?" ह्याखेरीज दुसरी रहदारी नव्हती.

"सोन्या, तुमच्यासारखे आम्ही साहित्यवाले नाही, मंजूर. म्हणून काय शुद्धलेखन म्हणजे काय हेही आम्हांला कळत नाही?"

"काय झालं शुद्धलेखनाचं–" सोन्याच्या आवाजात चक्क गारठा होता.

"श्राद्ध!! अरे, मराठीचे अभिमानी वगैरे बिल्ले लावून हिंडता लेको. मराठी लेखनात एवढी क्रांती झाली–तुम्हांला पत्ता नाही?"

"क्रांती काय, रोज होते! तो पेपर उघड. कुठल्यातरी पानावर कसली तरी क्रांती झाली असेल. कालपरवात कुणाची एकसष्टी वगैरे झाली असली तर बघ. त्याने कसली तरी केली असणारच! अरे, क्रांती काय विमाव्यवसायातसुद्धा होते आताशा–"

सोन्याचे हे बोलणे ऐकून मी थक्क झालो. हा आज असा इतका तिरका कां चालतोय मला कळेना. क्रांतीबिंती ही सोन्याची मनमुराद बागडायची कुरणं. वास्तविक मी आपला चारचौघं वागतात तसे वागणारा. सोन्या म्हणजे त्याच्याच भाषेत सांगायचे तर मूर्तिभंजक! आंतर्जातीय विवाहबिवाह प्रकरणात सोन्या बागलाणकर बँडवाल्याच्याही पुढे. लाल बावटे धरून दुकानापुढे माणसेबिणसे दिसली की सोन्या खूष. एकदा असल्या उत्साहाने स्वत:वर बिलामत ओढवून घेतली होती. कुठल्याशा कापड-दुकानांच्या नोकरांचा वाटते संप होता. संपावर एकदोन नोकर लाल बावटे धरून उभे होते. कुठे काही असले दिसले की सोन्या धावलाच. किंबहुना, रस्त्यात जरा गर्दी दिसली की सोन्या घुसलाच. संपवाल्यांतल्या दोघांपैकी एक बावटा धरून होता आणि दुसऱ्याने बोर्ड धरला होता. सोन्याने बोर्डावरचा तो 'हलकट मालकाच्या कुटिल कारवाया. कामगारांचे रक्त पिणारा नराधम' वगैरे मजकूर नेहमीप्रमाणे मोठ्याने वाचला. सोन्याला रस्त्यातली कुठलीही पाटी हळू वाचताच येत नाही. भिंतीवर चिकटवलेल्या नाटका-सिनेमांच्या जाहिरातीदेखील मोठमोठ्याने वाचतो. इथे 'हलकट मालकाच्या कुटिल कारवाया' हे जोरात वाचल्यावर चार लोक जमले. सोन्याला आवेश चढला. बोर्डावरचा सगळा मजकूर त्याने ठणकावला. बावटेवालाही खूष. सोन्याने त्याची चौकशी सुरू केली. सकाळपासून बिचारा चहासुद्धा न घेता उभा होता. संपावरचे बाकीचे दोनचार लोक होते ते बावटा धरायची डूटी करायला आलेच नाहीत. सोन्याला

दया आली. त्याला आणि त्याच्या बोर्डवाल्या सोबत्याला चहापाणी करायला पाठवले आणि स्वत: बावटा घेऊन उभा राहिला. आणि पुढला तपशील गाळून मुद्दा सांगायचा म्हणजे तो तिथे चहा पीत राहिला आणि पोलिसांनी सोन्याला उचलला. पोलिसला चूक उमगली की काय झाले, देव जाणे. सोन्या लगेच सुटला. पण दुसरे दिवशी ऑफिसात लालबावटा आणि क्रांती याखेरीज विषय नव्हता. असला हा सोन्या मला 'क्रांती काय रोज होते' म्हणून सांगतो. म्हणजे दुसरीकडे क्रांती करता करता सोन्याने स्वत:चीच क्रांती केली होती. कदाचित मला अगदीच 'हा' समजून तो विषय टाळत असावा असे मला वाटले आणि मी थोडेसे चिडूनच म्हटले–

''सोन्या–लेको तुम्ही आम्हांला प्रश्न विचारता त्या वेळी आम्ही आमच्या अकलेच्या गंजिफ्राकाची सगळी फाटकी भोकं अख्खा शर्ट वर करून तुम्हांला दाखवायची आणि तुम्ही मात्र आमचे प्रश्न शिशुवर्गातल्या कारट्याचे असल्यासारखी ट्रीटमेंट देऊन दुर्लक्ष करायचं काय? साला झकास न्याय आहे! बरोबर आहे–तुमची प्रोफेसरबिफेसर लोकांत ये-जा, आम्ही कारकुंडे–''

कसा कोण जाणे, पण हा बाण सोन्याला लागला आणि तो झटक्यात रिंगणात आला.

''हे बघ, मानवाला सर्वांत जर–''

मी ओळखले की सोन्या आता सीरिअस आहे. सोन्याने माणसासारख्या माणसाला एकदा का 'मानव' म्हटले म्हणजे ओळखावे की सोन्याची गाडी निघाली. त्यानंतर मग त्याच्यापुढे नुसता डोसाच काय अख्खा उडपी आणून सहस्र डोसे चर्र चर्र करत बसवा, सोन्याची गाडी विषय सोडून जरा इकडेतिकडे जायची नाही.

''हे बघ, मानवाला जर काही कबूल करायला सर्वांत मोठी लाज वाटत असेल तर ते म्हणजे आपला पार बूर्जा कसा उडाला हे–''

''कबूल. पण आपला विषय मराठी भाषेचं नवं शुद्धलेखन हा आहे. त्याचा तुझा बूर्जा उडण्याशी काय संबंध?''

सर्व विषयांत नापास झालेल्या मुलाचं प्रगतिपुस्तक हातात धरून त्याचा बाप ज्या चेहऱ्याने आपल्या त्या कुलदीपकाकडे पाहतो तस्से सोन्या बागलाणकराने माझ्याकडे पाहिले. आत तव्याच्या काळजातदेखील डोशाने चर्र करून सोन्याच्या विकलावस्थेतल्या चेहऱ्याला सिनेमात 'ढूम ढूम डीम ह्यं ई' करतात तसा ब्याकग्राउंड म्युझिकचा इफेक्ट दिला. क्षणभर स्तब्धता झाली. खिडकीपलिकडून कावळ्याचं 'काव'देखील ऐकू आले. आणि मग 'भगवान् उवाच'–

''गेल्या महिन्यात मी भयंकर बिझी होतो तुला ठाऊक आहे. लामणगाव साहित्यसंमेलनात आम्ही स्वत:ला पुरून घेतलं होतं. गाढवच आम्ही!''

सोन्या आत्मनिर्भर्त्सनादेखील कडक शब्दांत करतो. हा एक त्याचा गुण मला आवडतो. मागे अशाच एका प्रसंगात 'तुला जगातल्या सर्वश्रेष्ठ गधड्याचं नाव ठाऊक आहे का?' असा प्रश्न विचारून लगेच 'त्याला सोन्या बागलाणकर म्हणतात' असे उत्तरही

आपले आपणच दिले होते.

“फुक्कट एक महिन्याची लीव्ह नासून टाकली.”

“पण संयुक्त चिटणीस झालास तो?” मी विचारलो.

“झालो!–पण कां? तर ह्या साहित्यसंमेलनांना येत असलेलं जत्रेचं स्वरूप जाऊन काहीतरी सॉलिड व्हावं ही इच्छा.”

इथे मी सोन्याला छेडणार होतो, पण म्हटलं जाऊ द्या. लामणगावसारख्या रेल्वेपासून सत्तरबहात्तर मैल दूर असलेल्या आणि एस०टी०च्या रस्त्यापासून पुन्हा दोनअडीच मैल जिथे वन् टू करत जावे लागते असल्या गावात साहित्यसंमेलन भरवण्यात साहित्य जनतासन्मुख करणे वगैरे हेतू असले तरी सोन्याचा हेतू तेवढाच नव्हता. सर्व कार्यात सोन्याची प्रेरकशक्ती ही पाचवारीत गुंडाळलेली कुठली तरी कन्याकुमारीच असते. ऑफिसमध्ये सोन्या 'लामणगाव' म्हणाला तेव्हा सुशा कोरफडे (तथा पॅकिंग सेक्शनची साधना) म्हणाली होती, “म्हणजे अय्या! आमच्या गावात आहे संमेलऽऽन?” आणि पुढला कथाभाग सोन्याच्याच शब्दात सांगायचा म्हणजे “लाइक ए फूल ह्या कोरफडीचे पंचवीस रुपये मी भरून तिला प्रतिनिधी करून घेतलं. आणि इथे ही वेस्ट इंडीजची टेस्ट म्याच बघायला थांबली. सोबर्सचा गेम पाहते. स्वत:ला अगदी ती इंद्रू नरेंद्रू की कोण समजते. आणि वर लामणगावला माझ्या आजीला भेटायला विसरू नका हं बागलाणकर हे! हिच्या आजीला भेटा!!”

“जाऊ दे सोन्या. संमेलनाचं बोल.”

सोन्याने एकदा हातरुमालाचा बोळा करून कपाळ घासले. नको असलेले विचार पुसायची त्याची आपली ही एक पद्धत आहे.

“...तर लामणगावचं हे संमेलन गाजलं हे तर तू पेपरात वाचलंच असशील.”

“सोन्या, न गाजलेलं असं एखादं संमेलन असतं का रे तुमच्यात?”

सोन्याच्या कानी माझा प्रश्न गेला नसावा. कारण माझ्या प्रश्नाला उत्तर न देता सोन्याने आख्यान चालू ठेवलं.

“तू हे जे शुद्धलेखनाचं म्हणतोस ते तिथेच निघालं. आणि अध्यक्षांनी 'जे मुखी ते लेखी' हा नारा दिला.

“काय दिला?”

“नारा.”

“नारा?”

“म्हणजे मिरवणुकीत ओरडायला एखादी लाईन लागते त्याला नारा म्हणतात. उदाहरणार्थ...” त्याला आठवेना.

“इन्किलाब झिंदाबाद!” मी सोन्याची सुटका केली.

“राइट. तसं जे मुखी ते लेखी!”

“म्हणजे?” मी.

''म्हणजे बोलावे तसे लिहावे.'' सो० बा०.

''पूर्वी आम्हांला एक 'करावे तसे भरावे' नावाचा धडा होता.'' मी थोडेसे विषयाला सोडून बोललो हे लक्षात आलं माझ्या. म्हणून लगेच सावरून म्हटले, ''वा, हे चांगलं झालं. म्हणजे आपण जसं बोलतो तसं लिहायचं. म्हणजे वा! म्हणजे शुद्धलेखनाची भानगड मिटली. वा! माझ्यातर्फे अध्यक्षाचं अभिनंदन कर. तू एक झकास लेटर ड्राफ्ट कर तुझ्या जरा हाय मराठीत. मी सही ठोकतो. असा अध्यक्ष पाहिजे. सोन्या, ह्या अध्यक्षाला त्याच्या मास्तरनी पिटलेला असणार–हे ऱ्हस्वच कां? ते दीर्घच कां? इथला अनुस्वार कुठे नि तिथला स्वल्पविराम कुठे? असं छळून. बस. अध्यक्षमहाराजांचा विजय असो!''

मला वाटले, सोन्या गाल वाकडा होण्याइतपत तरी हसेल. पण कुठले काय?

''हे पाहा, हुरळून जाऊ नकोस. मी स्वत: अभिनंदनाचं भाषण तिथे लामणगावलाच ठोकलं. वेस्टिंडीजच्या मॅचिस बघताहेत साल्या!''

सोन्याच्या बोलण्यात पुष्कळदा प्रकटच्या मागचं स्वगत मुंबई 'ब'च्या मराठी गाण्यामागून कुठल्यातरी इंग्रजी बातम्या ऐकू येतात तसे येते.

''मी...मी अध्यक्षांचे हे विचार क्रांतिकारक कसे आहेत ते सांगितलं. एवढंच काय, यापुढे 'शुद्धलेखन मुर्दाबाद', 'बोलू तैसे लिहू' वगैरे हेदेखील दिले–''

''नारे?''

''यस्! लोकांकडून जाहीर प्रतिज्ञा घेतली की, यापुढे सगळी पुस्तकंबिस्तकं बायाबापड्यांच्या मराठीत–''

''कुणाच्या?''

''बायाबापड्यांच्या–''

''म्हणजे?''

''म्हणजे काय ऐक. आपलं साहित्य आहे ना? ते लोकाभिमुख पाहिजे.''

''अच्छा.'' लोकाभिमुखाची भानगड खरे तर मला कळली नव्हती. पण म्हटले मरू दे.

''तेव्हा भाषा कशी पाहिजे? जशी आपण बोलतो तशी. हा संस्कृतचा सासुरवास कां म्हणून? तर मराठी भाषेवरचं संस्कृतचं बेगड उडवून द्या हा ठराव माझ्या आधी अंबुजादेवी आजरे यानी मांडला. आणि मी ठरावाला पाठिंबा द्यायला उभा राहिलो.''

''सोन्या, ठराव सौ० की कु०?''

''कु०'' सोन्याचा सुस्कारा काउंटरपर्यंत ऐकू गेला असेल.

''म्हणजे तू काय सांगितलंस? की संस्कृतसारखं हे ऱ्हस्व-दीर्घ वगैरे लफडं नको म्हणून?''

''होय!''

''अंबुजादेवी काय करते रे?''

''तिला कशाला काय करायला हवंय? बापाचा विड्यांचा कारखाना आहे लेका! धो

धो पैसा–डोळे काय–वा!''

''बाकी विडी-कारखानदारांच्या घरातून सोन्याचा धूर निघतो नाही?''

मी आपला सुचलेला विनोद बोलून टाकला. सोन्या थोडासा अंबुजा-लोचन-स्मरणात गढला असावा. गप्प होता. त्याला जाग आणली. ''ते मरू दे–तुझं भाषण सांग.''

''अंबुजा आजरेच्या विचारांनाच मी दुजोरा दिला.''

मी मनात म्हणत होतो की त्या विडीवाल्याच्या लेकीने ह्या सोन्याला कसल्या तरी धाग्याने त्या लामणगावात आवळले असणार. सोन्याला काय स्त्री-स्वरात ''अय्या! इथे चपला कुठे ठेवायच्या?'' हा प्रश्नदेखील शिरशिरी आणतो. अंबुजादेवीने मराठी भाषा तामीळ कडबोळी काढून लिहावी म्हटले असते तरी ह्या येड्याने ठरावाला पाठिंबा दिला असता. उपजतच घायाळ माणूस हा!

''मी स्वच्छ सांगितलं–'' सोन्या अंबुजेच्या नयनांबुजस्मरणातून बाहेर आला. ''की शुद्धलेखन हा एका विशिष्ट संस्कृतीच्या लोकांनी लादलेला विचार आहे.''

''पण सोन्या, हे विशिष्ट संस्कृतीतल्या असं आडवळणी कशाला बोललास? सरळ सांगायचं की शुद्धलेखन हा भटाबामणांचा कावा आहे.''

''हे पाहा–मी एका विशिष्ट पातळीवरून बोलत होतो. अंबुजा आजरे! (सोन्याच्या मेंदूतल्या रेडियोतली स्टेशने एकमेकांत घुसली.) मी सरळ सवाल केला–'शुद्ध म्हणजे काय?' सगळे चूप! हिंदीत जर 'पानी' शुद्ध तर मराठीत तेच पानी अशुद्ध कां? 'नव्हतं' हे शुद्ध तर 'व्हतं' हे अशुद्ध कां?''

''साली आयडिया! शुद्धवाले बेशुद्ध झाले असतील.'' माझा हा विनोद सोन्याने दुर्लक्षण्याइतका वाईट नव्हता.

''अरे, स्पष्ट विचारलं! 'कोणासाठी लिहिता? आज तुमचा सगळा वाचक खेड्यापाड्यांत विखुरला आहे. शेताच्या बांधावर आहे, मोटेवर आहे, खळ्यात आहे–मळ्यात आहे. त्यांना काही कळेल अशा भाषेत लिहा. अंबुजा आजरेच्या टाळ्या ह्या कानांत आहेत!''

पुराव्यादाखल सोन्याने दोन्ही कान इकडून तिकडे फिरवले.

''हे खरं हां सोन्या. अरे, काय लिहितात अक्षर कळत नाही. अरे, कालच गोष्ट वाचत होतो. निम्मे शब्द हाताबाहेरचे. तिच्या हुर्यांत करारल्यागत झाल. बैलं दिकून कसनुसं करायल्ली. अस्सं लिहिलं होतं. आपल्या माहितीचा 'बैल' हा शब्द निघाला फक्त. काही कळेल असं लिहा लेको.''

सोन्या क्षणभर गप्प झाला. माझ्या बोलण्यात काहीतरी गफलत झाली असावी.

''अरे, हेच ते बायाबापड्यांचं मराठी–''

''पण सोन्या, बाया-बायांत आणि बापड्या-बापड्यांत जाम फरक असतो की–''

''मित्रा, हे तुला कळतं–ते त्या वेळी मला कळतं तर–''

''म्हणजे?''

''म्हणजे काय ते वाच. जसं बोलतो तसंच लिहिलं पाहिजे हा ठराव पास झाला आणि लामणगाव मराठी साहित्यसंमेलनाचा संपूर्ण अहवाल तिकडल्या लोकांनी छापून प्रसिद्ध केला तो वाच. तरी मला पहिल्यापासून शंका होती–''

''कसली?''

''तिथल्या शाळामास्तरला ह्या अहवाल लिहायच्या कामावर बसवलं होतं–तो काहीतरी घोळ करणार याची.''

''तो कशाला कडमडायला आला लामणगाव साहित्यसंमेलनात?''

''वा! तांबडेगुरुजी लामणगावचे भूषण ना? इमानी माणूस. व्यासपीठावरून येणारा प्रत्येक शब्द सरपंचाच्या थुंकीसारखा झेलणारा. 'बोलावे तसे लिहावे'चे बोर्ड घेऊन पोरांची मिरवणूक काढली त्याने! त्यातच जिल्हा परिषदेचे अध्यक्ष आलेले बघून दोनचार बोर्ड 'बिना सहकार नही उद्धार', 'तीनच मुले तर सौख्य फुले'चे बोर्डही त्यातच घुसवले.''

''म्हणजे साहित्यसंमेलनात मिरवणूक वगैरे होती–''

''लेझीमबिझीम लावून! मरू दे ते. तो अहवाल वाच. आमचा जो बूर्जा उडाला त्याचा पूर्वार्ध त्यात आहे. उत्तरार्ध नंतर ऐक.''

आणि मग मी तांबडेगुरुजींनी लिहिलेला अहवाल वाचायला सुरुवात केली. हे सगळे गुरुजी लोक जांभळ्या शाईत कां लिहितात, देव जाणे. अक्षर सुवाच्य होतं. पण पहिल्याच वाक्यावर ठेच लागली.

'' 'बाझ्या बित्रांनो आडि बराठी भाषेवर प्रेव करडारांनो–' कुठल्या भाषेत आहे रे हे?''

''सर्दीने नाक चोंदलेल्या मराठीत! तो तांबडेगुरुजी इतका इरसाल असेल अशी कल्पना नव्हती.''

'' '...आज आपल्या लाबडगावात ही बोठी बोठी बुकं लेहदारी बादसं आली...' अरे, भानगड काय ही सोन्या!''

''अरे, त्या स्वागताध्यक्षाला झाली होती ज्याम सर्दी. तो जसं बोलत होता तस्सं 'जे मुखी ते लेखी' ह्या न्यायाने तांबडेगुरुजींनी आणि त्यांनी ताकीद दिल्यामुळे त्यांच्या हाताखालच्या इतर चिल्लर गुर्जी आणि गुर्जिणींनी लिहून काढलं.''

'' '...ह्या सगड्याच बी स्वा आ आ आ छी : (इथे स्वागताध्यक्षाला आलेली शिंकही-तांबडेगुरुजींनी लेहून कहाडली होती.)''

सोन्या माझ्यापुढे कधी नाही तो हताश होऊन बसला होता. मधूनच 'अंबुजादेवी-अंबुजादेवी...लंबुजादेवी...' असे प्रासही जुळवत होता. सोन्या वास्तविक भलता संस्कृतवाला. पण अंबुजादेवी आजरेनामक कन्येपुढे आमचा हा 'यति वेडाउनी गेला!' (खरे म्हणजे तीच ह्याला वेडावून गेली.) थोडक्यात म्हणजे भलत्या घोड्यावर खेळला. मी तो 'बोलावे तसे लिहावे' तत्त्वाबरहुकूम बनवलेला अहवाल वाचून ओळी-ओळींत ठेचकाळत होतो.

''हे रे काय सोनबा?–'स्वाआज्य मिळाल्या नंतअ भाअतात निन्निआळ्या पकाअच्या

सुधाअणा कआयच्या ठौवून–'अरे, हे आमच्या पालीसारखं वाटतं-''

''ते प्रोफेसर गुंडगोळकराचं भाषण असेल. याला र म्हणता येत नाही–''

मग मी त्या मराठी साहित्यसंमेलनाच्या वृत्तांतातून, आल्यागेल्याचे, बायाबापड्यांचे, शेजाऱ्यापाजाऱ्यांचे, असे नाना तऱ्हेचे मराठी शोधायला लागलो. मराठी भाषा जर इतक्या प्रकारांनी नटायला लागली तर तिचा अवतार हजार धांदोट्यांचा परकर नेसलेल्या कडकलक्ष्मीसारखा दिसेल याची खात्रीच पटली. बाया-बापड्यांच्या मराठीत झालेला मराठी नाट्यावरचा परिसंवाद तर भलताच नामी होता. आमच्या विद्वान मंडळींनी हे लोकाभिमुख मराठी इतक्या झटक्यात पचवले असेल अशी कल्पनाही नव्हती. म्हणजे वर्षापूर्वी 'आत्माविष्करण, अभिव्यक्ती, आकृतिबंध, गोचर, आगळे, प्रकटीकरण' असल्या खडकाळ वाटेने जाणारी माणसे एकदम भलती देशी होऊन गेली होती. एका प्राध्यापकाने तर मराठी नाट्याचा सगळा इतिहास चावडीवर बसून तंबाकू चोळत सांगितल्यासारखा सहजी सांगितला होता.

''म्हणजे बरं का भिडूंनो–किर्लोस्कराचा अन्ना होता बरं का! मुलकी खात्यात. साहेबाच्या जमान्यात त्यानं राव दुष्यंतराजानं शकुंतलेशी गंधर्व लावला का कणवबाबाच्या फारिष्टातल्या आशर्मात त्याच्यावर जाम शेदीडशे गाणी-बिणी घालून नाटक केलं. त्याचा धंदा जमला तशी साहजिकच चार छंदीफंदी धावले. म्हणाले असतील, लाईन बरी आहे. किर्लोस्कराचा अण्णा चांगला उच्चापुरा. देखणा. गोरापीट. आपल्यासारखे धा गाण्या-बजावण्यातले पोरं न् बाप्ये जमवले. दुसरं नाटक काढलं. सुभद्रेच्या लग्नाचं. धो धो चाललं राव. गाणी तर एकावर एक फायनबाज. अजूनदेखील पापिलर. मग देवलमास्तर आले. त्यानं एक नाटक काढलं वहिमी स्वभावाच्या नवऱ्याचं. ही मजा. 'सौशयकल्होळ.' म्हणजे हिचा त्याला न् त्याचा ह्याला नुसता वहीम. सगळी मज्जा नुसत्या फोटूवर बरं का–गड्यांनो. त्यातली गाणीसुद्धा हिट् गेली. म्हणतानी म्हाताऱ्या नवरदेवाचा फार्स काढला. न् नाव ठेवलं 'शारदा.' एवदुश्या न्हात्याधुत्या पोरीचं लगीन जमवलं म्हाताऱ्याशी. भटं पैशाची लोभी न् म्हातारा लग्नाच्या घाईला आलेला. मग एक कोदंड असतो तो त्या म्हाताऱ्याचा करतो बावचा...अशी मजेमजेची नाटकं. आन् मग गडकरीमास्तर झाले. वरेरकरमास्तर झाले. हे मूळ पोष्टमास्तर. मागून नाटकांत तालीममास्तर झाले. आन् मग अत्रेमास्तर आले. हे आधी मास्तर, मग नाटकात आले. त्यानी जी नाटकं लिहिली–माणसाच्या हासून हासून भुक्ना पडायचा.''

मी पानं उलटली अहवाल चालूच होता. प्राध्यापक गरुडांनी नाटकाचे मूळ भांडणात असते असे सांगितले. ''म्हणजे काय सांगू माझ्या दोस्ताहो–नाटक होतं कशातून. संघर्ष म्हणजे काय दोन पार्ट्यांत जुपली पाहिजे. बापलेक म्हणा. नवराबायको म्हणा–कुणाची तरी लेक आन् कुणाचा तरी ल्योक म्हणा, पण आधी त्यांची झडवायची आणि हाळू हाळू बेताबेतानं गमतीगमतीनं मिटवायची आणि लगीन लावायचं. असल्या नाटकाला पूर्वीची, उगीचच स्वताला शाह्मणी समजणारी माणसं 'सुखांतिका' म्हणायची आणि समजा, लगीन

नाही जमलं किंवा त्यातलं कुणी तरी मयत झालं तर 'दु:खांतिका' म्हणायचे. आता हे सुखांतिका न् दु:खांतिका कुणाला कळायचं? आपल्या बायाबापड्यांच्या मराठीत जिथं सगळ्यांचं भलं होऊन नाटक संपतं त्याला आपण सगळ्यांना कळेल अशा भाषेत गोड नाटक म्हणू आणि दुसरं असतं त्याला खारं नाटक म्हणू. म्हणजे खारं जेवण जसं जरा मिरची जास्त झाली आणि नाकाडोळ्यांतून पाणी आलं तरी आपल्याला आवडतं तसं-स्टेजावरचे दुसऱ्या लोकांचे हाल बघणं आवडतं. आणि गोडं तर सगळ्यांनाच आवडतं. आज आपल्या भाषेत गोडी नाटकं फार. अधूनमधून थोडी खारी नाटकंही हवीत.''

बाकी 'गोडी नाटकं–खारी नाटकं' असल्या भाषेत मराठीतले विद्वान लिहायला लागले की, माजघरातलं मराठी, सैपाकघरातलं मराठी असल्या मराठीत लिहिलेल्या पुस्तकांनी वाचनाची भूक वाढली न वाढली तरी साधी भूक वाढेल याची मला तरी खात्रीच पटली. आणि तेवढ्यात सोन्या म्हणाला–

''आता सांग. हे लेखक विचारतील की नाही? मराठी गोष्ट पाहिजे? नाटक पाहिजे– कविता पाहिजे? ठीक आहे. कुठल्या मराठीतली बनवून देऊ? थांब.'' असे म्हणून सोन्याने पिशवीतून एक वर्तमानपत्राचा अंक काढला. ''वाचा आता हा बायाबापड्यांच्या मराठीतला अग्रलेख.''

मी वाचायला सुरवात केली. 'व्हेटनामची हाणामारी आणि जान्सनसाहेब' असा मथळा होता. आणि पहिलं वाक्यच ऐशा ठसक्यात होतं : ''आता हा अमेरिकेचा जानसन! आता लेका कुठं तुझं गाव आन् कुठे व्हेटनाम. सांगा बर पेपर वाचनारांनो. गप पडाव आपली पावभिस्कुट खात का नाही? नाही त्या उचापती करायची गरज आहे का बाबा? बरं, तुला काय कमी आहे? दाबजोर पैसा लेकाहो तुमच्याकडं. चड झाला असला तर आमच्या देशाला धाडा. बांबगोळ्यापायी उगच लुसकानी करायची. ज्येचं ते आपल्या कर्मानी चढतंय न् पडतंय. तेव्हा आमचं आयका न् ही हाणामारी आणि बांबफेक आवरा. आणि गहू धाडताय आम्हांला. आम्ही काय नाही म्हणत नाही. पण जानसनसाहेब, तुमचं ध्यान लढाईत गुंतलेलं पाहून तुमचे कोठाबळे कसला कंडम गहू धाडतायत आम्हांला काही ठावकी आहे का आपणांला? दुसऱ्याला द्यायचं ते नीट सडूनपाखडून द्यावं–''

''सोन्या, अरे आंतर्राष्ट्रीय विषयदेखील बायाबापड्यांच्या मराठीत आले. वा! तुझा अध्यक्ष भलता जोरदार निघाला मित्रा. खरं पण त्याचं भाषण कुठं?''

''हे वाच!'' सोन्याने एक चोपडं पुढे टाकलं.

''माझ्या लंगोटियारांनो–मैतरमैतर्णींनो आणि पोट्टेपाट्टे हो–''

''वा! सोन्या, तू काही म्हण, पण बंधुभगिनींनोपेक्षा ह्यात नक्कीच जास्त सलगी आहे.''

''पुढचं वाच.''

''ह्या साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष ह्या भूमिकेतून मी आपणांसमोर भाषाविषयक मूलभूत सिद्धान्ताचं विवेचन करणार आहे. माझ्या सौंगड्यानो, मानवी संस्कृतीच्या विकासात

भाषेला परम महत्त्वाचं स्थान आहे. मानवी प्रगतीचा आलेख काढू गेल्यास, गड्यांनो, विकासान्तर्गत विरोधाचे आणि विरोधान्तर्गत विकासाचे अद्‌भुत ताण कधी बरं का यार, काही विशिष्ट रीतीने प्रगत अथवा परागत अथवा उर्ध्वगत अथवा काय सांगू–गडे हो, अधोगतसुद्धा झालेले दृग्गोचर होतात...''

''सोन्या, अरे हे रे कुठल्या बायाबापड्यांचं मराठी? ह्यात कुठे आहे जे मुखी ते लेखी? ह्या मद्राशाच्या उप्पिटात मधूनमधून शेंगदाण्याचे तुकडे सापडतात तसे 'गडे हो' आणि 'सौंगड्यांनो' पेरले आहेत की–हे कोणाचं मराठी म्हणायचं?''

''ह्याला अध्यक्षाचं मराठी म्हणतात!'' सोन्या शांतपणाने म्हणाला आणि कॉफी आली. ''त्यांचं ठीक आहे रे. अध्यक्षाला हार झाले. टाळ्या झाल्या. आम्ही मोरू. बोलावे तसे लिहावे म्हणून हे लिहिलं आणि त्याला हे उत्तर!''

एका टाचणीने जोडलेली दोन पत्रे सोन्याने माझ्यापुढे टाकली. बोली मराठीत. सोन्याने अंबुजादेवीपुढे खिसा उलटा करावा तसे आपले अंत:करण उलटे केले होते.

''बास्. आपण तुमच्यावर जाम खूष. लग्नाबाबत वाटाघाटी कराव्या म्हंटो, तेव्हा बोला!''

सोन्या ह्या माणसाला चक्कल अ चव्हा के चणार ये, देव जाणे. मुखी ते लेखी म्हणून असले पत्र लिहायचे? अंबुजादेवींनी चार ओळींत सोन्याला हा-हाणला होता!

''मिष्टर बागलाणकर, आपण इतके आचरट असाल अशी कल्पना नव्हती. साहित्यसंमेलनाला इतकी असंस्कृत माणसे येत असतील हे माहीत नव्हते. आपल्यासारख्यांनी एखाद्या मुंबईच्या मवाल्याला शोभेल असल्या भाषेत पत्र लिहिलेले पाहून प्रथम संताप आला आणि नंतर कीव आली. माझा विवाह ठरला आहे. योग्य वेळी निमंत्रणपत्रिका येईलच.''

''तुला सांगू, सोन्या–'' मी शोकसभेचा प्रस्ताव मांडायला सुरुवात केली.

''काही सांगू नकोस–ही तिची निमंत्रणपत्रिका!'' सोन्या पिशवीतून जादूगार जसा गोट्या, अंडी, ससे वगैरे काढतो तशा एकेक वस्तू काढत होता.

''ती तरी बायाबापड्यांच्या मराठीत आहे का?''

''इंग्लिशमध्ये आहे!'' सोन्या.

''सोन्या, तू आमचं ऐकणार नाहीस, पण सांगू का? मराठी, कानडी, मद्रासी, गुजराती–कुठलीही भाषा असो, सगळ्यांना कळणारी भाषा एकच?''

''कुठली?''

''स्वत:च्या मतलबाची! काय?''

''यू आर राइट!''

''अरे, आपण बूर्जा उडवणारांतले नव्हे. ज्यांचा उडतो त्यांतले. कितीदा सांगायचं तुला? कॉफी थंड होतेय! घे!''

सोन्याला तसे ते निमूट कॉफी पिताना पाहून, खरं सांगतो, माझा कंठ दाटला.

# मी : एक मराठी माणूस

[इति सोन्या बागलाणकर आणि इति वश्या काळुसकरसुद्धा!]

वेळ : रविवार सकाळची. आणि स्थळ : आमचे ठरावीक उडपी हॉटेल.

सोन्या गेल्या काही दिवसांत महाराष्ट्राच्या प्रेमाने उसळलेला.

"काही झालं तरी मी एक मराठी माणूस आहे. आपला महाराष्ट्रीय बाणा. एक घाव आणि दोन तुकडे! मराठी माणूस एकदा मनात आलं की मागंपुढं पाहणार नाही. मी कां म्हणून ऐकून घेईन?"

एवढं बोलून सोन्याने खिशातल्या हातरुमालाने त्याच्या बालप्रदेशाची पीछेहाट करणारा भालप्रदेश खसाखसा घासायला सुरुवात केली. सोन्या इतक्या जोरजोरात स्वत:चे कपाळ घासतो की, त्याच्या ललाटीच्या रेषा पुसल्या जाऊन तो एखाददिवशी ब्रह्मदेवाला बुचकळ्यात टाकणार आहे याची मला खात्री आहे. घासून घासून अस्पष्ट झालेली तिथली विधिलिखितं वाचायला ब्रह्मदेवाला पुराणवस्तुसंशोधनखात्यातून एखाद्या शिलालेख वगैरे वाचणाऱ्या स्वर्गीय इतिहाससंशोधकाला मदतीला घ्यावे लागणार यांत संशय नाही.

"जाऊ दे रे. इडली थंड झाली बघ."

"हे बघ, तुला स्वाभिमान नसेल; पण मला आहे. ह्या नसानसांतून मराठी रक्त वाहतंय. मी अपमान गिळणार नाही."

असे म्हणून त्याने दोन घासात अख्खी इडली गिळली. 'नसानसांतून'सारखे ऐतिहासिक शब्द सोन्या सामाजिक संभाषणातदेखील वापरतो.

"सोन्या, उगीच तापू नकोस. अरे, कसलं रक्तबिक्त घेऊन बसलायस? सगळ्यांच्या रक्तांत सारख्याच रक्तपेशी असतात. काही पांढऱ्या, काही लाल."

"रक्तपेशी नाही म्हणत त्याला. रक्तगोलक." तसल्या भडकलेल्या अवस्थेत सोन्याने माझे मराठी सुधरवले.

"जाऊ दे रे. गोलक काय आणि पेशी काय!"

"हेच ते!–ढोशा बोला तो उप्पीटम् कायकू लाया?"

"उप्पीटम् बोला तो चष्मेवाला साब." वेटरच्या वेषातला जन्मजन्मांतरीचा सॉक्रेटिस म्हणाला. चष्मेवाला साब म्हणजे मी!

"अच्छा! उप्पीटम् रखो और थोडा टाइमके पीछे ढोशा लाव.–कडक भाजना." सोन्याची उपसूचना. सॉक्रेटिस गेला.

"हां! तर मी काय म्हणत होतो?"–सोन्या.

"तू काहीतरी म्हणालास आणि मी म्हणालो, 'जाऊ दे.' "–मी.

"यस्! जाऊ दे.–काय जाऊ दे? असं 'जाऊ दे, जाऊ दे' करून तुम्ही दुसऱ्या लोकांची दादागिरी सहन करत आलात."

"कोण दुसरे लोक?"

"अमराठी."

"सोन्या, तू जर पुन्हा अबकच्या भाषेत बोलणार असलास तर लेट् अस् स्टॉप्!"

"मी कधी अच्या भाषेत बोललो?"

"मग अ मराठी काय म्हणालास? अ मराठी, ब मराठी, क मराठी हा काय फाजिलपणा आहे?"

ह्या सोन्याची ही 'अबक'ची खोड केव्हा सुटणार कोण जाणे. तरी बरे, तारा बेलसरेचं आणि ह्याचे ह्या 'अबक'मुळं जमत आलेले फिस्कटले होते. स्वतःच्या आईला 'क' म्हटलेले कुणाला आवडेल? आणि बापाला 'अ'?

"मूर्ख आहेस!" सुमारे एकचतुर्थांश मसालाडोसा घशाखाली घालायला जितका वेळ लागतो तितका वेळ सोन्याने माझ्याकडे अतीव म्हणतात तसल्या तुच्छतेने पाहिले आणि 'मूर्ख आहेस!' असे म्हणून टाकले. "अरे, अमराठी म्हणजे जो मराठी नाही तो!"

"म्हणजे गुजराथी असं सरळ म्हण."–मी.

"फक्त गुजराथीच? तुझी मला दया येते."

ह्यांतलं नंबर दोनचं वाक्य माझ्या आणि सोन्याच्या मैतरशाहीच्या कारकीर्दीत मी अब्ज वेळा ऐकलं आहे. ते म्हणतानासुद्धा त्याचा चेहरा दर वेळी पाद्रीबाबासारखा होतो. वास्तविक त्याने हे वाक्य 'टुझी माला डया येटे' असे म्हटले तर त्याच्या चेहऱ्यावरच्या त्या करुणा वगैरे स्पंदतेला ते साजून दिसेल. माझी त्याला दया येते हे त्याच्या तोंडून ऐकून मला काहीसुद्धा वाटत नाही.

"जो मराठी नाही तो गुजराथी नसेल?" मी पुन्हा कापूस पिंजायला सुरुवात केली.

"केवळ गुजराथीच नाही. अमराठी म्हणजे मद्राशीही असेल, बंगालीही असेल–"

"खरंच की! हे लक्षातच नाही आलं." मी डिफेट मान्य केला.

"तुमच्यासारख्या घाण्याच्या बैलांच्या काहीच लक्षात येणार नाही. हरामजादे शेंगदाणे घालतात काजू म्हणून!"

"कुणाला? बैलांना?"

"बैलांना नाही–तुला आणि मला! हा काय काजू आहे?" उप्पीटममधून एक काळसर पांढरा तुकडा चमच्यावर घेत सोन्या म्हणाला.

"तुझ्या बरं लक्षात येतं हां, सोन्या. मी एवढं उप्पीट चेपलं–आपल्या लक्षात डिफरन्स

नाही आला.'' मीही माझ्या बशीतून एक तत्सम तुकडा उचलून पुढल्या दातांनी चावला.

खरे तर तो काजू की शेंगदाणा हे माझ्या नीटसे ध्यानात आले नाही. पण सोन्याच्या सॅटिसफ्याक्शनसाठी मीही उडपीवाल्या मद्राशाला हलक्या आवाजात दोन हाणल्या.

''बरं, ते मरू दे, सोन्या!''

''हेच ते! अरे, हे मरू दे, ते मरू दे–हे ते कुणी मरत नाही. मरतोय आपण!''

''आपण?''–मी.

''आपण–म्हणजे वैयक्तिक दृष्ट्या तू किंवा मी नव्हे.–सारा महाराष्ट्र!''

''सारा महाराष्ट्र मरतोय? सोन्या, मला हल्ली शंका यायला लागली आहे.''

''कसली?''–सोन्या.

''हा मद्राशी हल्ली तुझ्या इडलीसांबारात थोडीथोडी भांग घालत असावा.''

''तुम्ही फक्त विनोद करा आणि मरा!''

''सोन्या, सारा महाराष्ट्र कशाला मरेल? पाच वर्षांपूर्वी आपल्या पिंजणकरवाडीत दिग्या शिरमळकराची ग्रँडमदर-इन्-लॉ चचली, त्यानंतर टचवुड, पण एक तरी महाराष्ट्राचा सुपुत्र अगर सुकन्या मेली आहे आपल्या शिरमळकरवाडी बाँबे नंबर ट्वेंटीएटमधली? आणि ही सारा महाराष्ट्र मरायला घातल्याची बातमी कुठं वाचलीस?''

मी अशी एकदम प्रतिपक्षावर चढाई म्हणतात ती केल्यावर सोन्या उरलेल्या उप्पीटभर गऽप बसला. दहा वेळा समजावूनदेखील एखादे त्रैराशिक किंवा त्या जातीतले गणित लक्षात आले नाही तर मग छड्या, धपके, कानफटीत मारणे इत्यादी सुलभ उपाययोजना होते, तरीही ते गणित एखाद्या चिमुकल्या डोक्यात शिरत नाही, आणि मग अशा वेळी बाप किंवा मास्तर भयंकर रागापोटी निपजलेला तो विशेष प्रकारचा थंडपणा धारण करून बोलतात. माझ्याशी सोन्याने तश्शी संतापजन्य थंडपणाने बोलायला सुरुवात केली.

''हे बघ, आज मराठी माणसाची काय परिस्थिती आहे?''

''काय आहे म्हणजे? काहींची बरी आहे, काहींची वाईट आहे.''

''आपल्याकडे मोटारी आहेत?''

''आपल्या ताटकेसाह्यबाकडे आहे की.''

''त्याला काय मराठी म्हणायचं?''

''म्हणजे ताटकेसाहेब मराठी नाही?''

''माणूस मराठी आडनावाचा असला की झाला मराठी? त्याचं मन मराठी पाहिजे.''

सोन्या बागलाणकर हा शिवाजी पार्क, कुठलेकुठले साहित्यसंघ, मंडळं, चर्चा ह्यांचा रेग्युलर व्हिजिटर. त्याने ही स्पेशल भाषा सुरू केली. पण मी त्याच्या असल्या भाषेला दबत नाही. पूर्वी दबायचा.

''ताटकेसाह्यबाचं मन मराठी नाही हे तुला कसं कळलं?''

''त्याला महाराष्ट्राचा अभिमान आहे?''–सोन्या.

''पण आपल्या ऑफिसच्या महाराष्ट्रमंडळाच्या ग्यादिंगला कसा आला मग?''

''त्याच्या वाइफच्या गाण्याचा प्रोग्राम ठेवला म्हणून आला.''

''मग? तुमच्या मंडळाचे तेवढे पैशे नाही वाचले? धिस् इज्...'' आयत्या वेळी सुचणारे इंग्लिश शिकवणाऱ्या शाळा आमच्या लहानपणी असत्या तर काय पाहिजे होते!

''ऑफिसच्या महाराष्ट्रमंडळात बायकोचं गाणं ठेवलं हे काय मराठी मनाचं लक्षण आहे?''—सोन्या.

''मग हे पहा, मिस्टर बागलाणकर, आम्हांला एकदा मराठी मनाची लक्षणं सांगा.''

''और क्या साब?''—रेडियोवर मराठी श्रुतिका ऐकताना पुटकन मधेच हिंदी बातम्या ऐकू येतात तसा वेटरचा आवाज उमटला.

''दो ढोशा बोला तो विसर गया?''

''सादा मसाला?''

''हमकू मसाला. सोन्या, तुमकू?''

''मसालाच.'' चप्पलमधल्या 'च्य'सारखा उच्चार करत सोन्यानं सांगितलं.

वेटररूपी हॅम्लेटच्या बापाचं भूत टेबलाजवळून नष्ट झालं. आसमंतात 'यर्डि मेस्साल्ये' असे ध्वनी उमटले आणि सोन्या बागलाणकराने मला मराठी मनाची लक्षणे सांगायला सुरुवात केली.

''मुख्य म्हणजे स्वाभिमान. जे काही करायचं ते सरळ. एक घाव, दोन तुकडे. 'बाप दाखव, नाहीतर श्राद्ध कर' हा आपला बाणा.''

''काय?''

''बाणा.''

''सोन्या, बाणा म्हणजे काय रे?''—मी. मला खरोखरीच बाणा म्हणजे काय ते नक्की ठाऊक नव्हते म्हणून विचारले.

''अरे बाणा म्हणजे...आता उदाहरणार्थ, रामशास्त्री-बाणा...किंवा छत्रपतीच घे. तसं कशाला? शंभुराजे औरंगझेबाला काय म्हणाले?''

खरे म्हणजे नक्की काय म्हणाले ते मला आठवत नव्हते. म्हणून मी नुसतेच 'खरं आहे तुझं म्हणणं' असे म्हणून वेळ मारून नेली.

''मराठी माणूस एक वेळ उपाशी मरेल; पण स्वाभिमान सोडणार नाही.'' सोन्याला चेव येत चालला होता. ''हे मराठी रक्त कुणाची लाचारी करणार नाही.''

''कुठलं?'' मी घाबरून विचारले. मला कुणी एकदम रक्ताबिक्ताची भाषा करायला लागला की मळमळायलाच लागते.

''कुठलं रक्त? तुझ्या-माझ्या नसानसांतून वाहणारं...अरे, हाडाचा मराठी माणूस...''

शी! सोन्याचे हे चांगले काही खायला बसलेलो असताना हाडे, रक्तबिक्त ह्याच्यावर येणे मला काही पटत नाही. पण सोन्याला आता वरणासारखी उकळी आली होती आणि तोंडातून वाक्ये उतू जात होती.

''ह्या सह्याद्रीच्या कुशीतल्या...''

सोन्या बोलत होता. मी समोरच्या भिंतीवर ओळीने लावलेल्या नट्यांच्या चित्रांकडे पाहून घेतले. सोन्याचे एक बरे आहे. तो बोलायच्या रंगात आला की, समोरचा ऐकण्याच्या मन:स्थितीत आहे की नाही याची चिंता करत नाही.

''...मराठी माणूस काय वाटेल ते सहन करील, पण कुणाची लाचारी करणार नाही. अपमान करणाऱ्या माणसाचं पुन्हा तोंड पाहणार नाही!''

''पण मग आपले ऑफिस-सुपरिंटेंडंट श्रीयुत राजमान्य राजश्री हरचेकर हे ताटकेसाहेबांपुढं इतकी लाचारी कशी करतात?''

''त्या हरच्याचं नाव काढू नकोस! तो काय माणूस आहे?''

''माणूस? लेका चांगला मराठी माणूस आहे. ताटकेसाहेबांच्या शिव्या खाऊन येतो आणि आपल्यावर पास् ऑन् करतो. तरीही आपण हरचेकराचं आणि हरचेकर ताटक्याचं तोंड पाहतो--आणि यापुढंही पाहणार. तरीही आपण सर्व मराठी आहोत.''

सोन्याला इतकं ठणकावून मी उरलेले उप्पीट खायला सिद्ध झालो. सोन्याने कपाळ पुसायला सुरुवात केली. याचा अर्थ सोन्या बुचकळ्यात पडला.

''तू म्हणतोस त्याच्यात पॉइंट आहे.'' सोन्याने पहिले लोण चढल्याची कबुली दिली. ''म्हणजे तुझं म्हणणं--महाराष्ट्राला अस्मिता नाही? आगळेपण नाही?'' सोन्याची इनिंग पुन्हा सुरू.

''कोण नाही?''--मी.

''अस्मिता.''--सोन्या.

''अ स्मिता? मघाशी अ मराठी म्हणालास. आता ही अ स्मिता कुठली काढलीस?''

''अरे अस्मिता--आगळेपण.''

''काय गळेपण?''

''आगळेपण.''

''म्हणजे?''

''मराठी माणूस हा इतरांच्यापेक्षा काही निराळा आहे असं तुला नाही वाटत?''

''अर्थात निराळा आहे. गुजराथ्यापेक्षा किंवा मद्राशापेक्षा नक्की निराळा आहे.''

''मग माझ्या परममित्रा, मी तेच म्हणतोय.'' सोन्या, 'हॉर्लिक्स' पिण्यापूर्वीच्या माणसाचा चेहरा, प्याल्यानंतर जसा होतो, तसल्या त्या जाहिरातीतल्या माणसासारखा चेहरा फुलवून म्हणाला.

अशा वेळी तो 'परममित्रा', 'सुहृदा' असली 'कृष्णसुदामा', 'वीर बभ्रुवाहन' वगैरे टाइपच्या नाटकांतली भाषा खुषीत येऊन वापरतो. ही असली भाषा एकदा त्याच्या गळ्याशी आली होती. म्हणजे नमा ओकच्या संदर्भात.

तो संदर्भ असा : कुमारी नमा ओक ही आमच्या कचेरीत सहासातच महिने बागडून गेली. पण तिने तेवढ्यात सोन्या बागलाणकरापासून तो खुद्द (प्लीज कुठे बोलू नका) ताटकेसाहेबापर्यंत सगळ्यांना पावसकराच्या भाषेत 'शेंड्या लावल्या'. तिच्या प्रेमपत्रात--

म्हणजे बालके सोन्या बागलाणकराचे चि० सौ० कां० नर्मदाकुमारी ईस–सोन्याने 'स्पंदन', 'विभ्रम', 'तनुलतिका', 'कार्मुक' असले हाय मराठी लिहिले. माझ्यापुढे त्यानं त्या प्रेमपत्राचा ड्राफ्ट पुटप् केला होता. मी ड्राफ्टमधे चेंजेस सुचवून ' ''आपल्याशी विवाह करावा अशी इच्छा आहे' असा सरळ ॲप्रोच घे'' म्हणून त्याला सांगितले होते. पण सोन्या त्या काळात 'संतोषावस्थेच्या उत्तुंग शिखरावर' (अवतरण चिन्हांतले शब्द सोन्याचेच) असल्यामुळे अगदी 'ऐक्कत' नव्हता. वास्तविक ही नमा ओक शास्त्री हॉल, गोरेगावकराची चाळ अगर आंग्रेवाडी असल्याच परिसरांतली. पण 'इंग्लिश-शिवाय-बात-नाहीं'पैकी होती. दारात उभी राहिली तर जशी काही कुठल्यातरी मिलच्या पातळातली जाहिरात जिवंत होऊन उभी राहिलीय अशी दिसायची. ती पातळ तर इतकी तंग नेसायची की तिने अंगभर त्या तलम पातळाचे बँडेज बांधलंय असं वाटायचं! असली ही ललना, स्वत:ला नमा म्हणवणारी, 'बेबंदशाही' नाटकातले मुकर्रबखान वगैरे जसली पगडी घालतात तसल्या वळणाचं दहापंधरा सापांनी एकदम वेटोळं घातल्यासारखा केसांचा ढीग डोक्यावर वागवणारी–तिनं सोन्याच्या पत्रांतल्या 'स्पंदन', 'विभ्रम', 'तनुलतिका', 'कार्मुक', 'जीवनसोपान', 'विलोल' असल्या शब्दांखाली तांबड्या पेन्सिलीने रेषा मारून मार्जिनमधे 'स्टुपिड' असा एक वळणदार अक्षरातला शेरा ठोकून ते पत्र सोन्याला साभार परत पाठवले. सोन्या संतोषावस्थेच्या उत्तुंग शिखरावरून थेट खाली! नमा ओकच्या सेंडॉफ-पार्टीला घुम्म होऊन बसला होता. शेवटी नमा त्याला म्हणाली, ''कम् ऑन् बॅगी.'' (ह्या युवतीने ऑफिसातल्या लोकांच्या देशी नावांना विलायती रूपे देऊन बागलाणकराचा 'बॅगी', खुद्द हरचेकराचा 'हॅरी' आणि ताटके साहेबाचा 'टॅट्' केला होता. आपण आपले पहिल्यापासून लांब होतो.) तर सांगायची गोष्ट, ती सोन्याला ''कम् ऑन बॅगी, बी अ स्पोर्ट!'' म्हणाली आणि तिने सोन्याच्या बशीत स्वत:च्या बशीतले दोनच्या दोन सामोसे टाकले. सोन्याच्या प्रत्येक प्रेमभंगाचा समारंभ हा गॅदरिंगसारखा 'अल्पोपाहार' किंवा भोजन होऊन संपतो. असो. तर हे निघाले कशावरून?...हां! सोन्या मला 'परममित्रा' म्हणाला त्यावरून.

''म्हणजे निदान तुला हे कबूल आहे की, मराठी माणूस इतरांच्यापेक्षा निराळा आहे.''

''सोन्या, ह्यात तू नवीन काय सांगितलंस? ढोशा आणि उपमा ह्यांत फरक असायचाच, तसा मराठी आणि गुजराथी ह्यांतही असायचा.'' उपमेला उपमा मिळणे हा केवळ योगायोग.

''ठीक आहे. आता मला हे सांग, की हे आगळेपण कशात आहे?''

''कसलेपण?''

''आगळेपण.''

''आगळेपण?''

''म्हणजे निराळेपण किंवा पृथगात्मता.''

''मरा साल्यो!''–मी.

''काय झालं रे?'' सोन्या फटाक्याच्या आवाजाने व्हिक्टोरियाचा घोडा बिचकतो तस्सा बिचकला.

''कसली गात्मता म्हणालास?''—मी.

''पृथगात्मता—म्हणजे वेगळेपण.''

''मग च्यढवागा! च्यरळस च्यलबो! वेगळेपणा म्हणायला इतक्या आडवळणात कशाला शिरता लेको?''

''चिडू नकोस.''—सोन्या.

''चिडू काय नकोस? साला आठवड्यातून एक संडे मिळतो. दोन घटका चांगली एखादी इडली उडवून दुपारच्या जेवणापर्यंत पोटाला आधार देऊन जावं, तर तुम्ही आम्हांला पेटवत बसा! आता मराठी माणूस निराळा आहे हे सांगायला तुला इतक्या गल्लीबोळांतून घुमवत न्यायची काय गरज होती? महाराष्ट्र मेला काय...आगळे काय...वागळे काय...स्मिता काय...''

''अस्मिता—''

''तीच कोण ती! तुमची 'लफडी आणि आम्हांला काव! ढोशा कडक बोला तो मऊच लाया! कडक करनेकू हात क्या तवेपर भाजता है क्या?'' आता मीदेखील' वैतागलो होतो.

पण वेटर म्हणजे साक्षात बर्फाच्छादित असल्यामुळे त्याने कहर थंडपणाने विचारले,

''और क्या लावू?''

''विष लाव विष.''—मी.

''फिश् इदर नही मिलता. अमारा वेजटेरयन आटेल अै.''

त्यानं विषाचं 'फिश्' करून माझा काटा मोडला आणि आपल्या त्या हॅम्लेटच्या बाच्या भुताच्या संथ चरणचालीने रिकाम्या बशा घेऊन तो अंतर्धान पावला, आणि माझा कोप शांत होण्यापूर्वी सोन्याने आपला चेंगटपणा चालू केला.

''मराठी मनाचं निराळेपण कशात आहे सांग.''

''तूच सांग.''

''ऐक. आपण शिवप्रभूचे वंशज.''

''शिवप्रभूचं आडनाव बागलाणकर होतं हे मी आजच ऐकतोय.''

''अरे, रक्ताचे नसू. पण ह्या नसानसांत ते चैतन्य खेळतं आहे. अपमानाचा बदला घेऊ!''

''असं का? मग नंदिनी चौबळनं त्या हॉटेलात तुला 'भटुरडा' म्हटलं आणि तिच्यासाठी मागवलेलं आणि तुझं अशी दोन्ही ताटं तुला गिळायला लावून ती तिथून चालती झाली त्या वेळी वाटीतल्या श्रीखंडाला पुरीऐवजी अपमान गिळून बसला होतास, तेव्हा गेला होता कुठं राधासुता तुझा धर्म?'' शाळेत पाठ केलेली ती आर्या अशी कामाला येईल याची कल्पना नव्हती. ''त्या वेळी शंभुराजासारखा तिच्या बापासमोर तुझ्या सगळ्या

नसानसा घेऊन त्याला खडसावून विचारलंस का नाही?–'मिस्टर चौबळ, तुमची चि० सौ० कां० आज सहा महिने माझ्या खर्चानं सिनेमे पाहते आहे. हापिसात तिच्या टॅपल्या मी टाकतो. गेल्या सहा महिन्यांत महिना एक ह्या रेटनं तिला सहा साड्या घेऊन दिल्या. रीगल सिनेमाच्या दारात तिची चप्पल तुटली ती हातात घेऊन कुलाब्यापर्यंत चांभार शोधत एकटा हिंडलो–''

''हे तुला काय ठाऊक?''

'' 'अपोलो बंदरावर जीव द्यायला जातो' असं सांगून मला बरोबर घेऊन गेलास त्या वेळी तूच ना मला ह्या साऱ्या कथा सांगितल्या होत्यास?''

''पण हा एक आत्मनिष्ठ दृष्टिकोण झाला.''

''कोण झाला?''

''आत्मनिष्ठ–म्हणजे वैयक्तिक बाब झाली.''–सोन्या.

''म्हणजे पर्सनल?''–मी.

''हो. मी म्हणतो ते महाराष्ट्राचं सामाजिक मन–''

''सामाजिक मन?''

''म्हणजे जे घडवण्यात शिवाजीमहाराज किंवा...''

''राणा प्रताप–''

''राणा प्रताप मराठी नव्हता.''–सोन्या.

''बाजी प्रभू देशपांडे चालेल?''

''कां नाही चालणार?''

''सी० के० पी० होता म्हणून म्हणतो. नंदिनी चौबळ ह्या संदर्भात तू सी० के० पी० लोकांविषयी काय बोलला होतास ते आठव.''

''तू वैयक्तिक ह्याच्यावर येतोस. सामाजिक उदाहरण घे.''

''टिळक?''–मी.

''चालेल. आता शिवाजीमहाराज किंवा लोकमान्य टिळक ही जी काहीएक विशिष्ट परंपरा आहे–''

''पण सोन्या, शिवाजी म्हणजे सोळाशेसत्तावीस किंवा तीस आणि टिळक म्हणजे एकोणीसशे...'' मला नक्की सन आठवेना.

''पण नि:स्पृहतेची किंवा राष्ट्रासाठी प्राण देण्याची जी परंपरा आहे–''

''म्हणजे भगतसिंग, सुभाषबाबू वगैरे.''

''हो...म्हणजे...नाही म्हणजे...'' सोन्या एकदम कां गडबडला, कुणाला ठाऊक.

''पण सोन्या, ही सगळी माणसं अचाट होती. त्यांना मस्टरवर सही करायला लागत नव्हती. हेडक्लार्क दिवसभर तिरकं बोलून पिदवीत नव्हता. टिळकांनी हायकोर्ट-जज्जाला ठणकावलं. तुला-मला चपराशाला ठणकावता येत नाही. अरे, परवा मी आपल्या प्यूनला साधी 'पिवळा हत्ती' आणायला सांगितली, तर त्यानं मला 'आय् ॲम् नॉट युवर सर्व्हंट'

असं इंग्लिशमधे उत्तर दिलं! नाइट स्कूलमधे जातो मिष्टर आपला यस्० वाय्० गिरमे, क्लास फोर.''

''त्यानं कां आणावी सिगरेट? मी मराठी स्वाभिमान म्हणतो तो हाच!''

''मग दिवाळीला पोस्त कशाला मागतो? त्या वेळी मराठी स्वाभिमान काय 'प्लीज फाइल' केलेला असतो?''

''म्हणजे तुझं म्हणणं, महाराष्ट्राला स्वतंत्र अस्मिता नाही?''

''मी कशाला महाराष्ट्राच्या भानगडीत पडू?''

''म्हणूनच बाहेरचे लोक तुमच्या उरावर बसतात. सगळी प्रमोशन त्यांना!''

''मग जयकरला कसं प्रमोशन मिळालं?''

''एच० ओ० डी० त्याचा जातवाला आला. त्यांच्या जातीत युनिटी आहे.''

''पण जयकर मराठीच आहे ना?''

''पण सगळेच मराठी सारखे नसतात.''

''मग मला प्लीज हे सांग, की सारखे मराठी कुठले आणि ब-सारखे मराठी कुठले?''

सोन्याचा हातरुमाल कपाळाकडे गेला.

''तुझा प्रश्न मूलभूत आहे. हे पाहा, महाराष्ट्राची काही वैशिष्ट्यं आहेत. उदाहरणार्थ, आपल्यात गुजराती किंवा मारवाडी लोकांसारखी व्यापाराची हौस नाही; कारण आपण मराठी लोक पैशाच्या मागं नाही.''

''आता माझं ऐक. तुझी बहीण शांता–''

''तिचा काय संबंध?''

''सांगतो. तिच्या लग्नात तू तीन हजार रुपये हुंडा दिलास. तो थेरडा ऊर्फ तिचा सासरा 'संपूर्ण रक्कम हाती आल्याशिवाय देवक ठेवणार नाही,' असं म्हणून अडला होता ना? तो काय गुजराती आहे की मारवाडी?''

सोन्या क्षणभर खिन्न झाला हे माझ्या ध्यानात आले. कारण अशा वेळी तो बोटाने टेबलावर उगीचच अक्षरे गिरवल्यासारखे करतो. सोन्याचं काय, पण मांडवातल्या त्या प्रसंगाच्या आठवणीने कुणीही खिन्न झाला असता. तीन हजारांतले फक्त अडीचशे रुपये द्यायचे राहिले होते. शांतेचा सासरा तेवढ्यासाठी अडला. रविवारचा दिवस. पोष्ट बंद. नाहीतर मी माझ्या सेव्हिंगमधून दिले असते. उभ्या शिरमळकर वाडीत अखंड अडीचशे रुपये नगद रोख घरात असलेला एक मराठी माणूस नाही–किंवा असले तर 'आहेत' म्हणून सांगणारा नाही. अडीचशे रुपयांसाठी लग्न मोडायच्या घाईला आलं होतं. एरवी डरकाळ्या फोडणारा सोन्या लहान पोरासारखा रडायला लागला होता. इतकं नंदिनी चौबळ किंवा तारा बेलसरे वगैरे अप्सरांनी त्याला झिडकारलं तरी सोन्याच्या डोळ्यांत कधी पाणी नव्हतं. पण शांतेच्या त्या शायलॉक सासऱ्यानं सोन्याला रडवलं.

''शेवटी मदतीला कोण आलं? आठवतं ना, सोन्या? आपल्या वाडीच्या बाहेरचा रॉकेलवाला भय्या! तू काकूंच्या पाटल्या त्याच्याकडे गहाण ठेवायला लागलास तेव्हा काय

म्हणाला? 'अरे बाबूजी, हम का साहुकारी करत भैय्या? हरेक पर टाइम आता है.'- असलं काहीतरी बोलला ना? आणि अडीचशे रुपयांच्या नोटा ठेवल्या तुझ्या हातात. आणि आता नाबर काय म्हणाला? 'मिष्टर बागलाणकर, अडीच्छे रुपये म्हंजे काय वाटेवर पडले आहेत काय हो?' आता तो मराठीच ना?''

माझे हे बोलणे चालू असताना सोन्या शांतपणाने टेबलावर बोटांनी गिरवत बसला होता.

''मग तुझं काय म्हणणं? महाराष्ट्रात त्यागाची परंपरा नाही?''

''असेल. पण तुझ्यामाझ्या वाट्याला ती येते का? महाराष्ट्रात एखादी सोन्याची खाणसुद्धा असेल. पण त्यातलं गुंजभर सोनं आपल्या घरी जोवर येत नाही तोवर महाराष्ट्रात सोन्याची खाण आहे म्हणून आपण कशाला उड्या मारायच्या? अरे, सोनं जाऊ दे. रत्नागिरीच्या हापूसचा महाराष्ट्राला अभिमान आहे ना? चालू भाव बारा रुपये डझन आहे! येणार आहे हा आंबा आपल्या वाट्याला? आपल्या वाट्याला नुसता अभिमान. आमरस ताटकेसाहेबाच्या घरी!''

''म्हणजे तुझं म्हणणं काय? महाराष्ट्रात त्यागाची, निःस्पृहतेची, शौर्याची परंपरा नाही?''

''मी कुठं म्हणतो 'नाही' म्हणून. मी तर उलट म्हणतो, महाराष्ट्रात चिक्कार काहीकाही आहे. महाराष्ट्रात महाबळेश्वर आहे. थंड हवेचं ठिकाण. पण आपल्याला त्या थंड हवेच्या ठिकाणाचा काय उपयोग? तिथं म्हणे दिवसाला पस्तीसपस्तीस रुपये खर्च पर पर्सन. मुलांना हाफ रेट नाही. म्हणजे माझ्यासारख्यानं जायचं ठरवलं तर बघ–मी, ही, आणि...जाऊ दे! थोडक्यात म्हणजे महाराष्ट्रात असून ही थंड हवेची ठिकाणं आपल्याला गरमच पडणार.''

''आता तुला कसं समजावून सांगू?'' सोन्या असहायपणाने म्हणाला.

''कसंही सांग. पण तुझ्या त्या हाय् मराठीत बोलू नकोस.''

ह्या सोन्याची मराठी दर महिन्याला इतके नवे शब्द कसे निपजवते देव जाणे. बाराखडीतली एकएक अक्षरे अशी काही जुळवतो की पत्ता नाही लागत!

''आता असं बघ, आगरकरच घे.''

''खुशाल घे. जे घेण्याबद्दल आपल्याला बिल् भरावं लागत नाही तोपर्यंत इथं काहीही घ्यायला हरकत नाही माझी.''

''प्लीज विनोद करू नकोस. आता आगरकरांनी महाराष्ट्रात एक वैचारिक परंपरा सुरू केली. बुद्धिनिष्ठेची. ही बुद्धिनिष्ठा हे महाराष्ट्राचं वैशिष्ट्य आहे. सत्य असेल ते बोलणार–''

''कोण?''–मी.

''मराठी माणूस.''–सोन्या.

''प्लीज वेट. मला वगळ मराठी माणसांतून.''

''कां?''

''आणि तुलाही.''

''मला?''

''यस्! सत्य असेल ते बोलणार काऽऽय? आजवर आपण सिकनोट्स पाठवल्या त्यांत खरे सिक् कितीदा होतो? परवाचीच गोष्ट घे. सत्यसाईबाबाला पाहायला दांडी नाही मारली? आता एका अर्थानं तू असशील शीक–''

''एका अर्थानं?'' सोन्या सिनेमांतल्या हीरोचे नुसते तोंडच्या तोंड पडद्यावर दिसते त्या वेळी बोलतात तशी भिवई वगैरे उंचावून म्हणाला, ''एका अर्थानं शीक? म्हणजे?''

''म्हणजे–बेबी वसगडेकर.''

''नाव काढू नकोस तिचं!''

''कां?''

'' 'अगदी नक्की तुमच्यॅचबरोबर येते' म्हणून त्या वश्या काळुसकराबरोबर गेली!''

''मग काय बिघडलं?''

''काय बिघडलं? हिच्या आईला नरसोबाच्या वाडीला जायचं होतं, तर बोरीबंदरला रात्रभर थर्डक्लासच्या क्यूमधे तिकीट काढायला आम्ही; आणि सत्यसाईबाबा वश्याबरोबर!''

''पण वश्या काही अमराठी नाही. आणि सत्यसाईबाबा कुठल्या बुद्धिनिष्ठेत बसतो हो, महाराज? लेको! देवाच्या कामात तरी सत्य बोला! त्याच्या नावावर सिकनोटी धाडता?''

''साब कॉफी?'' हॅ०च्या बा०चे भूत बोलले.

''एक काजूकी प्लेट लाव.''

महिन्याच्या तिसऱ्या तारखेपर्यंत आम्हांला ही ऐट परवडते. ऑर्डर घेऊन तो त्रस्त समंध गेला. क्षणभर भयानक शांततेत गेला. ही वादळापूर्वीची शांतता होती हे त्यानंतर झालेल्या वादळामुळे माझ्या चांगलेच लक्षात राहिले आहे. आणि एकदम सोन्याच्या चेहऱ्यावर एखाद्याने खरे भूत पाहिले–म्हणजे ऐकीव नव्हे, खरे–उलट्या पायांचे वगैरे–तर जसा भाव उमटेल, तस्सा भयंकर भाव उमटला. हॉटेलात सोन्याला जबरदस्त धक्का देणारे कुणीतरी शिरले होते. मी त्या दिशेला पाहिले.

हेड रंगाऱ्याच्या गैरहजेरीत उमेदवार रंगाऱ्यांनी हाती येतील ते रंग जर समोरच्या पाच वार कापडावर उधळले तर ते कापड जसे दिसेल तसल्या रंगाच्या उधळपट्टीचे पातळ नेसून आणि डोक्यावरच्या केसात उलटा कमंडलू लपेटल्यासारखी केशभूषा, डोळ्याला गॉगल, लिपस्टिक आदीकरोन सारा तपशील धारण करून बेबी वसगडेकर सोबत वश्या काळुसकर ही जोडी ह्या अफाट मुंबई शहरातली तमाम हॉटेले सोडून आमच्या मद्राशाची पायरी चढून बाजूच्या फ्यामिलीरूममधे लोप पावली. सोन्याचे डोळे संतापाने चष्म्याची काच फोडून बाहेर येतील की काय, असे मला वाटायला लागले. काही क्षण भीषण शांततेत गेले.

''अनग्रेटफुल!'' सोन्यानेच त्या भीषण शांततेचा भंग केला आणि नुसते चिडून नव्हे,

तर क्रोधा-म्हणतात तसले-विष्ट होऊन चिमटीत दोन काजू धरून चुरगाळले.

मी बशी माझ्या बाजूला ओढली. सोन्याचा क्रोध महागात लागत होता. असे चार काजू चुरगाळले असते तर दहा पैशांचा निष्कारणी भुगा झाला असता. चार आण्याला मोजून सोळा काजू घालतो बशीत हा मद्राशी. सोन्या म्हणतो ते खोटे नाही. अमराठी म्हणतात ते माजले आहेत यांत शंका नाही. मी विषयाला कलाटणी द्यावी म्हणून सोन्याला म्हटले, ''तुझं एक मला पटतं. मराठी माणूस स्वाभिमानी यांत शंका नाही.''

सोन्याचे माझ्या बोलण्याकडे अजिबात लक्ष नव्हते. त्या फ्यामिलीरूमच्या दिशेने तो अशा काही डोळ्यांनी पाहत होता की, कलियुगात ब्राह्मणांच्या डोळ्यांतली ती भस्म करण्याची पॉवर गेली म्हणून. नाहीतर आमच्या मद्राशाची फ्यामिली-रूम त्या दिवशी पेटलीच असती.

''कृतघ्न!'' सोन्याने मघाच्या 'अनग्रेटफुल'चं मराठी भाषांतर केले. ''तिचे पातळ पाहिलंस?''

''ते काय पातळ आहे? रंगाऱ्याचं हात पुसायचं फडकं गुंडाळलंय.'' सोन्याला बरे वाटावे म्हणून मीही माफक निंदा केली.

''मूर्ख आहेस!'' सोन्या माझ्यावरच उलटला. ''मी सिलेक्ट करून घेऊन दिलं तिला. बटीक म्हणतात त्याला.''

''कुणाची बटीक?''

''तुला काय कळणार? लेटेस्ट डिझाइन! बटीक डिझाइन! मी चार तास हिंडून शोधून काढलं. गेले दोन महिने रोज पिडत होती, 'दोन तारखेला माझ्या बर्थड्डेला विस्रूं नाक्का हँ!' ''

सोन्या चिडला की उगीचच दुसऱ्यांच्या नकला करतो. वास्तविक नकला हे त्याचे काम नाही. मागे एकदा मिस् नंदिनी चौबळसारखे गालबील फुगवून बोलला त्या वेळी माझी कल्पना, त्या कन्यकेच्या ठायी ढाब्य वसत असेल अशी होती. पण ती तर अगदीच खोकल्याने हैराण झालेल्या 'कास्फो' वगैरेच्या जाहिरातीतल्या बाईसारखी निघाली. असल्या हाडकुळ्या, नाकावरच्या चष्म्याचे वजन न पेलणाऱ्या कन्येने सोन्याला 'भट' म्हणून हिणवावे आणि त्याला ठणकावून त्या कुठल्याशा आरोग्यभुवनात तिच्या आणि ह्याच्यासाठी मागवलेली दोनच्या दोन ताटे सोन्याला एकट्याला गिळायला लावून निघून जावे, हादेखील एक माफकपैकी चमत्कारच होता. सोन्याचा मंगळ अनिष्ट, एवढाच ह्या साऱ्या घटनेचा अर्थ.

''...फॉर्टीएट रुपीजची साडी मी हिला काल दिली. 'सोमवारी हीच्च शाडी नेस्सून येण्णार ह्यां' म्हणाली होती. (शी:! पुन्हा नक्कल!) आणि हिचा सोमवार इथं–ह्या मद्राशाच्या हॉटेलात वश्याबरोबर!''

''जाऊ दे रे. चांगलं आपण महाराष्ट्राबद्दल बोलत होतो...''–मी.

''मी साडी काय महाराष्ट्राला दिली नव्हती.''–सोन्या.

''अरे, पण मिस् वसगडेकर तरी मराठी भगिनीच ना?''

''भगिनी! सख्ख्या भगिनींना पाच रुपयांवर पैसा टिकवत नाही मी भाऊबिजेला. सालं जगात सत्य नाही हेच खरं!''

''आता कसं बोललास, सोन्या! जगातलं सोड, आपल्या जगात तर सत्य मुळीच नाही. वश्या काळुसकर, ताटकेसाहेब ह्यांच्या जगात सगळं आहे. आपला आणि महाराष्ट्राचा भूगोलाच्या पेपरात आला तेवढा संबंध. अय्यरसाहेब निदान इंग्लिशमधे दम द्यायचा. ताटक्या इंग्लिशमधे तर दम देतोच; वर पुन्हा मराठीतून आपली अक्कल काढतो. अय्यर निदान रिलीजस् तरी होता. शिरमळकरवाडीच्या आपल्या सार्वजनिक सत्यनारायणाला आला. ताटके लेकाचा लिफ्टमधे नमस्कार केला तर ओळख नाही दाखवत.''

माझ्या बोलण्याकडे सोन्याचे अजिबात लक्ष नव्हते. त्या बंद फ्यामिलीरूमकडे चष्म्याला एक्सरेच्या काचा असल्यासारखा पाहत होता. पाहता पाहता तो एकदम दचकला. त्या रूममधून वश्या काळुसकर चक्क आमच्या टेबलापर्यंत आला.

''हॅलो! अरे लेको तुम्ही कुठं इथं?'' वश्या आम्हांलाच विचारत होता. हे म्हणजे खूप झाले. ''काय सोन्याबापू?''

''ठीक आहे.'' सोन्याने ज्या आवाजात हे 'ठीक आहे' म्हटले तसे यापूर्वी अमृताते पैजा जिंकणाऱ्या मराठीत कुणीही म्हटले नसेल. वश्याने माझ्या पाठीत उगीच धपका घातला अन् म्हणाला, ''लेको! बेबी म्हणाली, तुमच्यासारखे कुणीतरी दिसताहेत. म्हटलं, बघून येतो.–तर साल्यो तुम्हीच!''

जणू काय निरनिराळ्या फ्यामिलीरूममधे मी आणि सोन्या निरनिराळ्या बेब्यांना घेऊन बसलो आहोत आणि 'कसं पकडलं गुलामांनो' असे त्याने आम्हांला विचारावे अशा थाटात वश्या बोलत होता. बाकी वश्यामधे हा एक विलक्षण गुण आहे. तो मन चाहेल तेव्हा दांड्या मारतो. वर बिनदिक्कतपणानं साहेबाच्या खोलीत जातो. साहेबाला एक्स्प्लनेशन विचारायची ताकद होत नाही. खुद्द सुपरिंटेंडेंट हरचेकरापुढे फायली टाकून ''हे लफडं तुम्हीच निस्तरा बुवा!'' म्हणतो. आणि आश्चर्य म्हणजे हरचेकर निस्तरतात. आमचा क्लास फोर गिरमे वश्याला सिगरेटी, पानं, चहा–सगळं आणून देतो. डिपार्टमेंटच्या गॅदरिंगला मिनिस्टर आले तर त्यांच्या मोटारीचं दार उघडून पहिला शेकहँड ह्याचा! फोटोत हा! कंट्रोलरसाहेब आडवा! मराठी तर सोडाच, पण ख्रिश्चन–पारशी पोरींशीसुद्धा ह्याची दोस्ती. त्या कार्ट्या आमच्याकडे ढुंकून नाही पाहत. आणि वश्या खुश्शाल त्यांना 'हाय जेनी–हलो रोशन' करत असतो.

''लेको इथं काय बसलाहांत? कम ऑन्!''

''कुठं?'' मी भेदरून विचारले.

''मी नेईन तिथं.''

मला वाटले होते, असली वाक्यं नाटकांतच असतात. वश्याने चक्क कॉलर धरून सोन्याला वर उचलला. मागल्या बाजूने सोन्याचा शर्ट प्यांटीमधून बाहेर आला. तेवढ्यात

वेटर अवतरला.

"और क्या साब–बिल लावू?"

"ए जंगली!" चक्क वेटरला हा 'जंगली' म्हणाला. "हम क्या तुमारा पैसा लेकर भागता है?–बेवकूफ! साबलोकका बिल हमारे बिलमें जमाव."

आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो बर्फावगुंठित माणूस वश्यापुढे पार वितळला आणि लाचारीने हसत–हो, ह–स–त-'अच्चा साब, अच्चा साब' म्हणून निघून गेला.

थोडक्यात म्हणजे वश्या काळुसकर आम्हांला चक्क बेबी वसगडेकर इजसमोर नेऊन बसविता झाला आणि आम्ही बसते झालो.

"सोन्या, आय मस्ट् थँक्यू."–वश्या भलत्या खुषीत.

"कशाबद्दल?"–सोन्या. हॉर्लिक्स घेण्यापूर्वीचा चेहरा करून.

"हिला इतकी सुरेख साडी दिल्याबद्दल. लेका लग्न कर! (माझ्या हृदयाचा एक ठोका थांबून परत सुरू झाला.) ए! अरे, ह्याचा फ्रेंड म्हणवतोस–चांगलीशी बायको शोधून दे ह्या सोन्याला. हा नुसत्या साड्याच चांगल्या निवडतो. बायको नाही अजून निवडता येत. (माझे एक क्षीण हास्य. सोन्या नॉनप्लस्!) सोन्या, आमचं लग्न झाल्यावर हिच्या साड्या घ्यायला मी तुला बरोबर नेणार हं!–काय बेबे?"

"इश्श!" बेबी वसगडेकर.

त्यानंतर वश्याकडे एक भलता प्रेमळ कटाक्ष. हनुवटी जराशी वर उचलून तिरक्या नजरेने पाहून मान राइट् टु लेफ्ट उडवण्याला मुरका म्हणत असतील तर कटाक्षाच्या जोडीला तेही. म्हणजे काळुसकर-वसगडेकर-विवाह ठरलाही होता?...सोन्याचा आणखी एका आघाडीवर पराजय. आणि पूर्वपरंपरेला अनुसरून ती बातमी हॉटेलातच फुटली. सोन्याला प्रत्येक पराजयानंतर हॉटेलात बसून खावे लागते, हीही एक परंपरा. तारा बेलसरेचे आणि त्याचे बिनसले त्या वेळी तिच्यासाठी मागवलेला ट्रे भरून चहा त्याला एकट्याला ढोसावा लागला होता. नंदिनी चौबळच्या वेळी दोन ताटे गिळावी लागली होती. नमा ओकने स्वत:च्या नकारसमारंभाला हापिसच्या कँटीनमधे सामोसे चारले होते. आणि आज वश्या काळुसकराच्या आग्रहामुळे, सकाळपासून मद्राशाकडे आम्ही जे जे खाल्ले तेच त्या पराजयाच्या क्षणी त्या जेत्यांपुढे बसून खावे लागत होते. शेवटी मी भीत भीत बेबी वसगडेकरला–थ्रू प्रॉपर चॅनल–म्हणजे वश्याला विचारतोय असे दाखवून–विचारले, "पण हे ठरलं केव्हा?"

"अरे, काल!"

"काल?" पराजित राष्ट्राने विचारले.

"काल. सोन्या, काल हिच्या बर्थडेपार्टीला तूही होतास की लेका!"–जेता ऊर्फ वश्या काळुसकर.

"पण मी जरा लवकर गेलो." पराजित राष्ट्र पुन्हा बोलण्याच्या अवस्थेत येत चालले होते. "नऊ वाजता परिसंवाद होता–'महाराष्ट्र मागे का' ह्या विषयावर."

''तू त्या संवादाला की कशाला गेलास. बाकीचेही हळूहळू गेले. आणि मग मी हिला सरळ विचारलं, 'बेबे, करतेस माझ्याशी लग्न?' ''

''इश्श!''–पुन्हा तोच सगळा अभिनय.

''इश्श काय? नाही विचारलं? ही म्हणाली, 'हो'–आणि दॅट वॉज, म्हणालो, द एण्ड ऑफ् इट्. आपला महाराष्ट्रियन बाणा आहे. एक घाव, दोन तुकडे. मराठी माणूस एकदा मनात आलं की मागंपुढं पाहणार नाही. काय सोन्या?''

हे ऐकल्यावर सोन्याचा जो चेहरा झाला त्याचे वर्णन येणेप्रमाणे : मांडवात मंगलकार्याच्या निमित्तानं पंचवीसएक तरुणी जमल्या आहेत. त्यांतल्या अत्यंत सुंदर नगाच्या हाती आइस्क्रीमची बशी देण्याची संधी आपल्याला मिळाली आहे. अशा वेळी आपल्याला जोरदार शिंक येऊन त्या ताणाने लेंग्याची नाडी तुटली आणि हातातली बशी कोचावर बसलेल्या त्या त्रैलोक्यसुंदरीच्या केशरचनेवर उपडी झाली, तर आपला चेहरा होईल तसा. सोन्याच्या चेहऱ्याचे वर्णन समाप्त.

वश्याची वटवट चालू होती : ''...आणि मग तडक आम्ही दोघंही गेलो आणि हिच्या बुढ्ढीच्या पायावर डोकं ठेवून नमस्कार केला. बुढ्ढी खूष!''

वश्याची छाती सह्याद्रीची यात शंका नाही. खरा मर्द मराठा. लग्न होण्यापूर्वी स्वतःच्या सासूला वाग्दत्त वधूपुढे 'बुढ्ढी' म्हणायची ताकद आहे बेट्याला. वाः! नाहीतर आम्ही!

''...त्यांतून काल पौर्णिमा–हिचा बर्थडे. म्हटलं, 'बेबे, लेट्स गो टु जुहू'...'' वश्या बोलत होता.

''सॉरी हं! मला एका मीटिंगला जायचंय.'' सोन्या उठला.

त्याला पुढले संवाद ऐकायला 'थांब' म्हणणे म्हणजे खाटिकखान्याचे उद्घाटन बघायला बकऱ्याला पुढे नेऊन बसवण्यापैकी होते.

हल्ली सोन्या बागलाणकर महाराष्ट्राचा अभिमान, शिवाजी, टिळक, आगरकर, परंपरा, आत्मनिष्ठा, कसलीशी-ती-गात्मता वगैरे सोडून, राहूची महादशा, शनिमंगळांची युती, स्वगृहीचा अमका वगैरे बोलायला लागला आहे.

# माझा एक अकारण वैरी

माझ्याविषयी समाजात तसे कुठेही गैरसमज नाहीत. कचेरीत मी अजातशत्रू आहे. घरात बालपणीचे जन्मदाता आणि मास्तर ह्या दोघांचे एकतर्फी वैर सोडले तर सालस मुलगा म्हणूनच माझा लौकिक. 'कुणाच्या अध्यात ना मध्यात' एवढ्या चार शब्दांत माझे स्वभावचित्र संपावे. घरात तर सदैव दुय्यम नागरिकत्व! चि० शंकर (ज्येष्ठ पुत्र) आतापासूनच माझे आज्ञापालन करतो. हिची पार्ल्याची मावशी मी घरात नाही असे समजून, ''बाकी तुझ्या नवऱ्याला वेव्हार नसला तरी हाडाचा मऊ आहे बरं का तो!'' हे ऐकवताना माझ्या कानी पडले होते. माझे एक ब्रह्मचारी काका मला न चुकता ''अगदीच कसा रे मेंगळ्या तू!'' म्हणत आले आहेत. हापिसातला नानू सरंजामे समोर आला की, इतर सारे जण पिसाळलेले कुत्रे आल्यासारखे पळतात. पण मी त्याच्याकडून यथेच्छ चावून घेतो. हूं का चूं करत नाही.

''जन्मभर साहेबाचे बूट चाटा साल्याहो! तुमच्यात अस्मिता नाही. स्फुल्लिंग विझले तुमचे...'' असे काही काही तो मला बोलतो. त्यांतले निम्म्याहून अधिक शब्द मला कळत नाहीत. पण हा आपल्याविरुद्ध काहीतरी बोलतो आहे एवढे मला कळते. पण त्याचे माझे वैर नाही. आपले नवे पुस्तक प्रसिद्ध झाले की तो मला 'स्नेहादरपूर्वक' असे काहीतरी लिहून फुकट देतो. साऱ्या जगात कुणाशीही माझे वैर नसताना 'वेटर' नावाची जी जमात आहे तिला माझ्याविषयी इतका तिटकारा कां, हे मात्र मला अजूनही कळले नाही. इतरांसाठी पंखा, टुकडापाणी, माचिस ह्या फुकट्या गोष्टीदेखील तत्परतेने देणारे वेटर मला दमड्या मोजून मिळणारे पदार्थ देतानासुद्धा असा सुतकी चेहरा करून कां यावेत?

मोठमोठ्या साहेबी हॉटेलांतले वेटर हे पाद्री होण्याऐवजी वेटर होऊन येतात हे मला मान्य आहे. पण कुळकर्णी-काणे-नेने-जोगळेकर-वीरकर असल्या शुद्ध देशी हॉटेलांतल्या वेटर लोकांचे मी काय घोडे मारले आहे कळत नाही. चांगले हसत खेळत उभे असलेले वेटर मी टेबलाशी जाऊन जुळल्याबरोबर एकदम गंभीर होतात. त्यांच्या डोळ्यांत मेलेल्या माशाच्या डोळ्यासारखा निर्विकारपणा येतो. इराण्याच्या हॉटेलातले वेटर तर अर्धाअर्धा तास माझ्याकडे पाहतही नाहीत. पूर्वी वाटे की आपल्या धोतरछाप वेषामुळे आपल्याकडे

दुर्लक्ष होते. पण गेली काही वर्षे मी बराच अद्ययावत झालो होतो. नेकटायदेखील बांधतो. सुरवातीला टायची गाठ वाटाण्याएवढी येत होती, तिथून आता चांगली समोशासारखी गाठ मला बांधता येते. पूर्वी नाकाखाली सुरवंट आडवा पडल्यासारखी मिशांची लागवड होती. तीदेखील एके दिवशी नांगरून आता रस्ता मोकळा केला आहे. ऑफिसातली रिसेप्शनिस्ट हल्ली माझ्याशी दोन अक्षरे सलगीच्या स्वरात बोलते. पण वेटर हा प्राणिविशेष मात्र माझ्यातला फरक मानायला तयार नाही.

तसे पाहिले तर आता माझ्यात तसा मागासलेपणा मुळीच राहिला नाही. माझा ज्येष्ठ पुत्र चि० शंकर याचे ह्या कार्यात मला अतोनात साहाय्य झाले, हे मला इथे कृतज्ञतेने नमूद करून ठेवले पाहिजे. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्' म्हटले आहे, ते खोटे नसावे. त्याच्याकडूनच मला टायची वाटाण्याएवढी गाठ सामोशाएवढी कशी होते ते कळले. शेखरकुमार आणि निरूपमा यांचे लव्हमॅरेज झाले आहे, नयनाचे खरे नाव मेहेरुन्नसा आहे आणि टॉमी टिनमेकर हा कामेडियन् पूर्वी बेकरीत पावाचे पीठ तुडवत होता इत्यादी माणसाला अपटुडेट करणारी सिनेमासृष्टीतली माहिती मला तो वेळोवेळी पुरवत आला आहे. ही माहिती मी एकदा आमच्या बेनसन् जॉनसन् अँड मंगळदास कंपनीतल्या केशर मडगावकरवर वापरून तिच्या तोंडावरच्या पावडरला घाम फोडला होता. ''अय्या, मी तर तुम्हांला अगदीच भट समजलेली. पण सीनेमावर्ल्डमधे तुम्हांला ईतकं ईंट्रेस्ट आहे ह्याची स्वऽऽप्नात सूऽऽधा आयडिया नसलेली हं मला...'' असे तिने मला शिफारसपत्रसुद्धा दिले होते.

एवंगुणविशिष्ट अद्ययावत माणसाला वेटर ह्या जमातीने अगदीच अनाथाश्रमाची वर्गणी मागायला आलेल्या माणसासारखे कां वागवावे हे मला कोडे आहे. अर्थात तशी मला अनेक कोडी आहेत! आमच्या हापिसांतल्या मानकाम्याला मला त्याचे गाणे आवडते असे कां वाटते, तेही मला कोडे आहे! वेळीअवेळी मला गाठून तो आपल्या चिजा ऐकवत असतो. कुशाभाऊंच्या मुलीच्या लग्नाची त्यांच्यापेक्षाही मला काळजी आहे, असे एक आपले त्यांना वाटते. गोन्साल्वीसचे एकदा डोके दुखत होते, त्याला घरून आल्याची वडी आणून दिल्यापासून मला 'हर्बल' मेडिसिनची खूप माहिती आहे असा त्याचा एक गैरसमज आहे. पण ह्या गैरसमजांचा मला फारसा त्रास नाही. किंबहुना, त्यांतून माझ्याविषयी आदर वाढला आहे. पण वेटर लोक मात्र झुरळाकडे वाघाने पहावे तसे माझ्याकडे पाहतात. मी धोतर नेसून गेलो, कोटटोपी घातली, गळ्याला टाय बांधला, सूट घातला, नेहरू शर्ट घातला, हरून अल रशीदाने केले नसेल इतके वेषान्तर केले, पण वेटरच्या दृष्टीत फरक पडत नव्हता. बोक्याला उंदराचा वास येतो तसा त्यांना माझा वास येत असावा.

मी पूर्वीपेक्षा जरा तरतरीत दिसायला लागलो आहे हे हीदेखील एकदा एकान्तात म्हणाली होती.

पण सारी वेटर जमात माझ्यातला हा बदल मानायला तयार नव्हती. हपिसात आप्पा प्रधानचे भटाचे बिल दोन दोन महिने थकते, पण त्याला गरम बटाटावडा आणि मला मात्र

गार! वर विचारले की ''नको पायजे तर वापीस देऊन ज्या. खालीपिली खटखट नको!'' हे वाक्य! ह्या बाबतीत आप्पा प्रधानाचा मला हेवा वाटतो. वास्तविक माझ्यापेक्षा त्याला सोळा रुपये कमी मिळतात. पण तो हॉटेलात गेला की गल्लेवाला त्याला सलाम करतो. बिल मी देतो आणि आप्पा सलाम घेतो. तो सरळ वेटरना तडकावतो. अर्थात आप्पाचे हिंदी जरा बरे आहे, हा त्याला ॲड्व्हांटेज आहे. ''साला काम करता है की मोफत का पगार खाता है? अच्छा फडका मारो'' असे तो सफाईने बोलतो. त्याला वेटर ''हो साब'' म्हणतो. आणि मी एके दिवशी हेच वाक्य म्हणालो तशी वेटर ''ज्यादा बकबक नही चाहिये'' म्हणाला. माझ्या ''गरम क्या है?'' ह्या प्रश्नाला वेटरचे उत्तर ''सब कुछ गरम है– इधर हम थंडा खाली कोकाकोला रखता है'' हे! आणि आप्पा जेव्हा विचारतो तेव्हा ''पॅटिस गरम है साब, लावू?'' ही अजिजी!

मराठी हॉटेलात तर मी गेलो की माधुकरी मागायला आलो अशीच सर्वांची समजूत होत असावी. आधी दहा दहा मिनिटे माझ्याकडे कोणी ढुंकूनही पाहत नाही. माझ्या नंतर माझ्यापुढे टेबलाला भिडलेले लोक गिळून जातात.

''अरे, आमची ऑर्डर कां नाही घेत?''

''बोला ना! आम्ही काय मनातले ओळखणारे अंतर्ज्ञानी आहोत की काय?''




''आम्ही काय मनातले ओळखणारे अंतर्ज्ञानी आहोत की काय?''

आरोग्यमंदिरछाप हॉटेलात मला हा जबाब मिळाला होता. मी सहसा ह्या आरोग्यवाल्या हॉटेलात जातच नाही. तिथल्या मालकापासून फडकी मारणाऱ्या पोरापर्यंत सगळ्यांच्या चेहऱ्यावर एक विलक्षण घमेंड असते. आपण वास्तविक पत्रकारच व्हायचे, पण केवळ देशाचे आरोग्य सुधारायचे म्हणून पत्रावळी गोळा करतोय असा काहीसा भाव! एकतर पदार्थांची नावे निघंटु किंवा तत्सम आयुर्वेदिक ग्रंथातल्या नावासारखी चमत्कारिक!

'खदिरखाद्य' हे नाव वाचून मी भेदरलो होतो. श्रीखंडाचे पातेले विसळून 'पीयूष' करणारी ही जमात सर्वोदयकेंद्राची वाट चुकून आरोग्यमंदिरात आली आहे. ''हे 'खदिरखाद्य' म्हणजे काय हो?'' मी जरा हसत विचारले. तो 'ठोठावा म्हणजे उघडेल' या पाद्री चालीवर म्हणाला, ''खाऊन पाहा म्हणजे कळेल.'' एकूण वेटरजातीने आणि तिकिटकलेक्टरांच्या जमातीने हसायचे नाही अशी प्रतिज्ञा केलेली असावी. आतापर्यंत बटाटापुरीबरोबरची चटणी माझ्या धोतरावर सांडलेला एक वेटर तेवढा हसताना मी पाहिलाय. हसणारा तिकिटकलेक्टर दिसायचा आहे. पट्टीचे पानवाले हसतात. गादीचा पानवाला नाही हसत. पोष्टाच्या खिडकीतला माणूस कधीमधी हसतो. तारेच्या खिडकीतला सगळ्या जगाशी 'कडकट्ट' करता करता 'गट्टी फू' करून बसलेला! कदाचित दिवसातून बऱ्याच वेळा 'काका एक्सपायर्ड', 'तात्या एक्सपायर्ड' असल्याच तारा करायला लागल्यामुळे त्याला सारे जगच सुतकात असते असे वाटत असेल. काही काही धंद्याचे आणि हसण्याचे इतके कां वावडे? की हे प्राणिमात्र माझ्याच नशिबाला येते? बहुधा माझ्याच नशिबाला असावे. पूर्वी शाळामास्तर हसताना आढळला तर दिपोटी त्याला आंगठे धरून उभे करत असावे. पण ज्येष्ठ पुत्र चि० शंकर तथा गिरीश याची हेडमास्तरीण माझ्याशी बोलताना विप्रलंभशृंगार केल्यासारखी रंगवलेल्या ओठातून सारखी हसली होती. विप्रलंभशृंगारातच मला वाटते तसे काहीतरी हसतात. कदाचित दुसऱ्या कुठल्यातरी शृंगारात असेल–मुद्दा आहे हसण्याचा. सारांश, वेटर ह्या किटाणूचे आणि माझे कां जमत नाही, हा मला प्रश्न आहे. असल्या प्रश्नाला यक्षप्रश्न म्हणतात. पण विषय वेटर हा असल्यामुळे 'भक्ष्यप्रश्न' हा शब्द अधिक योग्य ठरावा.

अर्थात वेटर आणि मी ह्यांतील अहिनकुलत्वाला (वेटर अही–मी नकुळ.) केवळ वेटरच जिम्मेदार नसावा. हॉटेलात जाऊन भजी खाणे हे माझ्या बालपणी गोहत्येच्या जोडीचे पातक मानण्यात येत असे. घरातला तीर्थरूप म्हणवून घेणारा वैरी, शाळेतला मास्तर नामक गनीम आणि वयाने वडील असणारी तीर्थरूपांचे स्नेही नावाची कौरवसेना गावातल्या हाटेलांच्या पायऱ्यांवर सदैव टेहेळणी करत बसल्यासारखी असे. आल्या गेल्या पाहुण्यांनी खाऊसाठी म्हणून दिलेले पैसे लगेच जप्त होत. ते पैसे बोरू घोरपडे शाईची पुडी, कित्ते वगैरे आणण्यासाठी खर्च होत. इतिहासातल्या औरंगझेबाबद्दल साऱ्या दुनियेला चीड असेल; पण बापाला स्वत:च्या हातांनी नजरकैदेच्या बेड्या घालणारा औरंगझेब हा माझा आदर्श होता. असली पुत्ररत्ने जन्माला आल्याखेरीज 'बाप' नावाचे हिंस्त्र श्वापद वठणीवर येणे शक्य नाही, याची मला खात्री होती. ह्या जमातीच्या असल्या क्रूर

वागणुकीमुळेच हॉटेल ही एक चोरून जाण्याची जागा अशी मानसशास्त्रीय प्रतिक्रिया किंवा असे होण्याला जे काही म्हणतात ते झाले. म्हणून आजदेखील हॉटेलची पायरी चढताना काही कारण नसताना चेहऱ्यावर एक चोरटेपणाची छाया किंवा छटा पसरते. आणि तरबेज वेटर ही छाया किंवा छटा नेमकी हेरतो. आणि त्याचा आत्मा ह्या गिऱ्हाइकात दम नाही, त्याच्याकडे दुर्लक्ष कर, त्याने दहा वेळा पाणी मागितले तरी देऊ नकोस, चहाचा कप त्याच्यापुढे आदळ, त्याच्या टेबलावर फडका मारू नकोस, असे बजावत सुटतो.

'कांदेपोहे गरम आहेत' ही पाटीवर खडूने लिहिलेली अक्षरे वाचून आत शिरावे. वर्तमानपत्राचा आपल्या वाट्याला आलेला तुकडा उलटूनपालटून दहा वेळा वाचून व्हावा (हॉटेलांत असलेल्या वर्तमानपत्राचे पहिले पान माझ्या वाट्याला अजून कधी आले नाही. किंबहुना, हॉटेलवाले वर्तमानपत्राचे फक्त एक इंची जाहिराती, नोटिसा, बाजारभाव आणि अन्य फालतू कॉलम भरती असलेले ते सुटे पानच विकत घेतात की काय, न कळे!) आणि सुमारे दहा मिनिटांनी आपल्याला वेटरचे दर्शन झाल्यावर ''कांदापोहे आणा'' अशी आपण आर्डर द्यावी. वेटर विजारीत झुरळ शिरल्यासारखा त्या पाटीकडे धावत जातो आणि फडक्याने 'कांदापोहे गरम आहेत' ही अक्षरे पुसून येतो.

''कांदापोहे खलास आहेत.''

''मग आणखी काय गरम आहे?''

वास्तविक तडक उठून जावे असे वाटलेले असते. पण वेटर समोर उभा असताना इष्ट मिष्ट शिल्लक नाही हे कळल्यावर हाटेलातून वाक औट करायला सिंहाची किंवा आप्पा प्रधानाची छाती लागते.—माझ्या जागी आप्पा प्रधान असता तर नुसत्या एका डरकाळीने त्याने गल्ल्यावरच्या मालकाला टेबलाशी खेचत आणले असते.

एकदा असेच ''बटाटेवडे संपले'' हे वेटरच्या तोंडून वाक्य पडले. आणि आप्पा प्रधान अशा आवाजात गर्जू लागला की, फळीवरचा रेडिओ ऐकू येईना.

''हाटेलं चालवता की कोळशाच्या वखारी? तिथे मग त्या बोर्डावर 'बटाटेवडा तयार आहे हे काय फडकीवाल्या पोरांना पुस्ती काढायला शिकवता म्हणून लिहिलंय काय?'' अशा वेळी त्याच्या जिभेचा पट्टा मुरारबाजीच्या पट्ट्यासारखा चालतो. जिभेवर रणचंडी नाचते. ''त्यांच्या बापान्ही हाटेलं चालवली होती—पाट्या लिहितात साले!''

मला हे जमत नाही. 'कांदेपोहे खलास' असे एक उर्मट उत्तर ऐकल्यावर मी निमूटपणे विचारले, ''गरम काय आहे?''

''चहा!'' वेटर थंडपणाने म्हणाला.

हॉटेल ह्या विषयाचा आणि तिथे नांदणाऱ्या ह्या प्रजेचा तसा मी सूक्ष्म विचार केला आहे. अगदी गल्लेवाल्यापासून ते निळी अर्धी चड्डी, काळे मिचकूट गंजीफ्रॉक आणि चड्डीवर गुंडाळलेले कोळशाच्या रंगाचे आडवे फडके लावलेला भटारखान्यातला आशिष्टंट इथपर्यंत सारे नमुने मी बारकाईने पाहिले आहेत. त्या समस्त सृष्टीविषयी मला अपार

कौतुक आहे. बाळपणी संध्याकाळी पाचाच्या सुमाराला जेव्हा कढईत पहिली भजी पडत तेव्हा आसमंतात घमघमाट सुटे! हल्ली मद्रासकडून येणाऱ्या सिनेमाचे नायक दिसतात तसा दिसणारा तो भजी तळणारा इसम पाचाच्या सुमाराला, आमच्या गल्लीच्या नाक्याशी असलेल्या 'न्यू रामांजनेय क्षुधाशांती गृहा'च्या दर्शनी भागातच मांडलेल्या कढईपुढे ठाण मांडून बसत असे. तेल सळसळले की नाही हे पाहण्यासाठी बोटांनी प्रोक्षण केल्यासारखे पाणी शिंपडी. मग चर्रर्र असा आवाज झाला की, तंबोरे जुळल्यावर गवयाचा होतो तसा त्याचा चेहरा होई–आणि मग पडघमवर टिपरी पडते तशी कढईत भजी पडत. हे आणि ह्यासारखी अनेक दृश्ये त्याच्या वासासकट मी मनात साठवली आहेत. हॉटेल ही संस्कृती, ते वातावरण, गल्लेवाल्याच्या मागे असलेले सिद्धारूढस्वामींपासून ते भयानक चेहऱ्यांच्या आणि छातीच्या हाडांच्या फासळ्या दिसणाऱ्या इतर सत्पुरुषांच्या तसबिरी, भिंतींवर नाना प्रकारची चित्रे, एवढेच काय, पण 'आज रोख उद्या उधार'पासून ते 'दया क्षमा शांति तेथे देवाची वसती'पर्यंत अनेक वचने–हे सगळे मला पाठ आहे. पण हॉटेल ह्या संस्थेने माझ्यावर काही प्रेम केले नाही. कुणावरच केले नसते तर मला दु:ख नव्हते. माझ्या डोळ्यांदेखत मी आप्पा प्रधानाचे चरित्र पाहतो आहे. तो गल्लेवाल्याला 'आज रोख उद्या उधार'च्या पाटीसमोर उभे राहून, "काल पैसा देगा" म्हणतो. आणि त्याचा ना जातीचा ना पातीचा, ना वर्णाचा (आप्पा करपलेल्या आंबोळीच्या चेहऱ्याचा आहे!) असा इराणी 'कुछ वांधा नहीं साब' म्हणतो. आणि मला एका आरोग्यमंदिरात एक् पीयूष आणि एक चिकूचा चिखल केल्यासारखा दिसणाऱ्या चिकू जॅम नावाचा पदार्थ गिळल्यानंतर दीड आणा कमी पडला म्हणून कोट काढून ठेवावा लागला होता. आप्पा प्रधानाने त्या आरोग्यमंदिराच्या मालकाला किसून त्याच्याच दुकानात त्याला चिकू जाम म्हणून विकला असता. मी नुसत्या सद्र्यानिशी हापिसात जाऊन मानकाम्याकडून दीड आणा आणून कोट सोडवला.

हा माझ्या नशिबाचा गुण आहे की चेहऱ्याचा, कळत नाही. बसमधून जाताना इन्स्पेक्टर सगळ्या उतारूंना सोडून आधी माझे तिकीट तपासतो. भाजीवालीला टोपलीखाली दडवलेली ताजी कोथिंबीर दे म्हटले की "वाट धर" म्हणते. कोळणीच्या टोपलीतला पापलेट ताजा आहे की नाही हे पाहण्यासाठी जरा दाबून पाहिला की "झेनार तर झे. नायतर पाय उचल!" असा चारचौघांत दम देते. लाँड्रीवालाही शर्टाला दरवेळी नवे डाग घालून देतो आणि "हे कां बाबा असं केलंस?" असे अत्यंत गयावया करून विचारले तरी "डाग काय मुद्दाम घातले?" असा उद्धट प्रतिप्रश्न करतो. हे असले अपमान करून घेणे माझ्या व्यक्तित्वातच असावे. एरवी आजन्म उधारीवर जगणारा आप्पा प्रधान सदैव ताणात आणि मी क्षणाक्षणाला उताणा असे का व्हावे?

# काही (बे)ताल चित्रे

झपताल, त्रिताल, एकताल इत्यादी भारतीय संगीतातील ताल ठरावीक मात्रांमध्ये बसवले आहेत. त्यामुळे त्या तालांतल्या तालचित्रांना काही तरी चौकट आहे. प्रस्तुत बेताल-चित्रांना कुठलीच मात्रा लागू पडत नाही. परंतु बेताल चित्रांतदेखील एक सूक्ष्म ताल आणि तंत्र दडलेले आहे. शोधून काढणारास सापडेल; सापडून दाखवणारास बक्षीस मात्र नाही. कारण ही चित्रे आसपासचीच आहेत तेव्हा सापडणे अवघड नाही. तालचित्रांत ते कार्य कठीण आहे. बेताल-चित्रांत सम सापडणे मात्र बिकट आहे. नाही तरी मी मी म्हणणाऱ्या गवयांना ती कधी वेळेवर सापडते?

**केरवा** (हा सर्वांत छोटा ताल)
पार्श्वभूमी : गॅलरी

"ज्या ज्या–पाह्यलेयत पुष्कळ."

"बघ बाबांना सांगीन. देतोस की नाही–"

"छप्पन बाबा पाहिले आहेत तुझ्यासारखे! गोप्या–ढोप्या कुठला–"

"पांड्या लांड्या दुकान मांड्या–"

"ए, भांडता काय?"

"चूप् बस! चोंबडा कुठला. आम्ही भांडू नाही तर वाटेल ते करू–तू कोण बोलणार? शऱ्या फुऱ्या–"

"दात पाडीन–"

"पाडून दाखव!"

"उद्या गोट्या खेळायला ये म्हणजे सांगतो–"

"ऐटी नको–आमच्याकडेसुद्धा गोट्या आहेत–शिशाचीसुद्धा आहे."

"पण तुमची जीभ कुठं नाकाच्या शेंड्याला लागते?"

"ही ही बघ–"

"कुठं लागली, कुठं लागली–"



केरवा

"तू लावून दाखव–"
"तू कोण सांगणार?"
"मग तू कशाला मला सांगितलंस?"
"मग तू ऐकलंस कशाला?"
"तू कोण मला नको ऐकू म्हणणार? मी ऐकीन. (दुग्गण) पांड्या लांड्या उसाच्या कांड्या–"
"शऱ्या फुऱ्या–मणमण तुऱ्या–"
"गोप्या ढोप्या–शेणाच्या थाप्या–"
"मारीन!"
"अरे, ज्या–ज्या! पाहिले आहेत पुष्कळ."
"रडिखाऊ–"
"तू रडिखाऊ–"
"मग काल कसं खोटं खोटं औट दिलंस?"
"नाहीच्च मुळी! क्रीज आऊट होतास तू–"
"चिकिखाऊ अंपायर!"
"कोमडीखाऊ प्लेअर!"
"आम्ही कोमडी खाऊ नायतर बोंबिल खाऊ–"
"शीऽऽ"
"शी म्हणशील तर मारीन हं शुभडे!"
"आहाहा! मॅरिन्! दातकिडका कुठला!"
"शुभडी शेंबडी–डबक्यातली कोंबडी–"
(लग्गी चाट) "आईऽऽभ्यॅऽऽऽआईऽऽभ्यॅऽऽआईऽऽ भ्यॅऽऽऽ"



दादरा
''जात नाय काढशील–''

## दादरा

पार्श्वभूमी : चाळीतला दादर! [इथे अनेक बेतालचित्रे होतात. त्यांतली काही टिपली आहेत]

''डोळे फुटले का?''
''संभाळून बोला!''
''तुम्ही संभाळून चाला–''.
''संभाळूनच चालतोय.''
''मग मीदेखील संभाळूनच बोलतोय!''
''इतकी कसली मस्ती आलीय तुम्हांला?''
''मग मस्ती काय तुम्हांलाच यावी? रेडियो घेतला म्हणजे काय विमान नाही घेतलं–''
''तुम्ही घेऊन दाखवा!''
''पानवालेसुद्धा घेतात रेडियो–''
''मग पानाचं दुकान काढा! तरी बरं–''
''काय बरं?''
''कंपौंडर तो कंपौंडर!''
''खर्डेघाशापेक्षा बरा!''
''बाटल्याभरू कंपौंडर–''
''वेळकाढू कारकुंडा!''
''हातातलं हे तूप सांडलं–तुझा बाप भरून देणार का?''
''तूप? खोबरेल तेलाला तूप म्हणतात का तुझ्या जातीत?''
''जात नाय काढशील–''

''काढीन!''

''काढ काढ–माझी काढता येईल; तुझी कशी काढणार?''

''कां? काढून बघ–''

''असली तर काढायची ना–''

''फाट्!''

''खल्ल्!–चष्मा फोडलास? भरून दे–''

''बापाकडून भरून घे माझ्या!''

'',फाट्!''

''फट्''

''ओऽऽय्!''

## **दादरा :** आणखी एक बेतालचित्र

''इतकं काही नको ओळख नसल्यासारखं तोंड चुकवून जायला–''

''इश्श! तोंड चुकवायला काय कर्ज नाही घेतलं!''

''पण ब्लाउज घेतला होतास तो? बहुतेक हरवला असेल लाँड्रीत! जॉर्जेटच्या साडीसारखा–''

''तीन दमडीचा ब्लाउज!''

''म्हणजे तुला महागच!''

''पन्नास ब्लाउज आणून देईन–''

''शेवटी मधूला सोडून लाँड्रीवाल्याशीच जमवलंस वाटतं?''

''कां म्हणून–''

''त्याशिवाय पन्नास ब्लाउज कुठून देणार? मधूनं दिली वाटतं चाट!''

''अशी चाट खायला मी म्हणजे तू नव्हे! तरी बरं अरविंदा गेला त्या मंदेच्या मागं–''

''हो जातोय! डोळे नाही फुटले त्याचे चकणीच्या मागं जायला–''

''तुला पाहताना फुटले होते वाटतं?''

''कां, तुझ्याकडे ढुंकून पाहिलं नाही म्हणून?''

''असल्या छप्पन अरविंदांना पातळं धुवायला ठेवीन मी?''

''हो क्का? चाळीतली पात्तळं धुवायचं कंत्राट घेतलंय का तुझ्या पोष्टमन बाबांनी?''

''आहाहा! तरीच एसेस्सीत गचकलीस तीनदा! पोष्टमास्तरला पोष्टमन म्हणत नाहीत इंग्रजीत!''

''तुझी आई तर त्यांना पोष्टमन म्हणते रात्रंदिवस!''

''चोरून ऐकायची सवय जात नाही म्हणायची!''

''आईला जरा आवाज हलका करायला सांगा–आगीचा बंब गेल्यासारखी ठणठणते!

चोरून नाही ऐकावं लागत–''

''हो. तुझी आई म्हणजे कोकिळाच की नाही! तरी बरं, परवा सगळी चाळ जमा झाली–''

''आणि तुझ्या आईच्या झिंज्या पकडल्या तेव्हा टाळ्या वाजवल्या ते कां नाही सांगत?''

''ह्यॅ ह्यॅ ह्यॅऽऽ!''

''वेडावतेस काय माकडासारखी–''

''तुझा अरविंदा एक माकड आहे–म्हणून सगळीच माकडं वाटली वाटतं तुला? राधेला म्हणे सगळीकडे कृष्ण दिसत होता–''

''ही ही ही ही! गणपति-उत्सवात चोरून दुसऱ्यांच्या कविता आपल्या नावावर म्हटल्या म्हणजे काय सगळीकडे काव्य नको–''

''चोरायला काय तुझे बाबा नाही मी–पुरुषासारखा पुरुष असून कोळसे चोरतो!''

''बाबांचं नको हं नाव घेऊ!''

''मम्मीला सांग तुझ्या–मला कशाला सांगतेस? दिवसभर तर नाव घेते. गोपाळ गोपाळ गोपाळ करून. माडर्न मम्मी तुझी–लिपष्टिक लावली म्हणून काय अक्कल नाही आली!''

''मग तुम्ही फासा तोंडाला–तुमचे कोणी ओठ धरले आहेत?''

''तुझी मम्मी ओठाला लावते का लिपस्टिऽऽक? मला वाटलं, समोर आलेल्या दाताला–''

''खरे दात आहेत–कवळी नाही तुझ्या आईसारखी!''

''चप्पल मारीन, सांगते.''

''आहे का पायात?–वा वा! आहे की! तरीच हल्ली रोज देवळात जातेस–रोज नवी चप्पल!''

''बघायचीय का?''

''बघू–माझीच असेल!''

''ही बघ...फाट्!''

''आई ग !''

## झपताल

पार्श्वभूमी : चाळीतली खोली.

''मेलं शंभरदा ओरडा–फुटलेयत कान!''

''जरा गप्प बसाल का?''

''मुकी बायको करायची होतीत–''

''तेच चुकलं!''

''मग पुन्हा बांधा बाशिंग–नाहीतरी दिवसभर खिडकीतून पलिकडच्या बिऱ्हाडात पाहत

असताच कॉलेजवालीकडे!''

''मग भीती आहे की काय कुणाच्या बापाची.''

''त्या पोरीच्या बापाची तरी बाळगा! पोलिसांत आहे तो! जरा वयाची ठेवा!''

''उगीच बडबडू नकोस—भांडखोर बायको म्हणजे पाप आहे–''

''काय?''

''नाही, शाप आहे–शापच बरोबर!''

''दिवसभर मेले चौकोन भरतात–दोन रुपड्यांचं तरी बक्षीस लागेल तर शपथ!''

''पंचवीस हजार मिळतील तेव्हा पाटल्या मागायला येऊ नकोस!''

''पाटल्या घालताहेत! होत्या त्या विकल्या!''

''विकेन नाहीतर समुद्रात फेकून देईन–''

''मलाही द्या फेकून –''

''चल ऊठ!''

''ट्यॅं–''

''काय कारटी आहेत! लोकांची पोरं कशी हसत असतात. आमची कारटी बाप मरत नाही म्हणून रडतात–''

''फार लवकर समज आलीय त्यांना–''

''बाबा, मास्तरनी वही आणायला सांगितलंय!''



''ओय ओय मेलो! अग, हे आंघोळीचं पाणी आहे की चहाचं आधण?–ओय ओय ओय–''

**झपताल**

''मास्तरना म्हणावं–वहीबिही काही मिळणार नाही! किती वह्या लागतात तुझ्या मास्तराला?''

''मास्तरना नाही–मला लागतात.''

''मिळणार नाहीत! हा आणा घे. विड्या घेऊन ये लालधागा–''

''आणि वह्या?''

''थोबाड फोडीन! अहो, जरा शिस्त लावा पोरांना–''

''आधी अंग घ्या जरा विसळून! दीड मिंटाची मेली आंघोळ–तीन तास पेटतोय बंब!''

''पंचा आण! एकदा शेवटली आंघोळ करतो तुझ्या नावाने–तांब्या कुठाय?''

''तो काय समोर? घ्या आतून–''

''ते तू नको सांगायला.''

बुडबुडबुडूक–

''ओय ओय मेलो! अग, हे आंघोळीचं पाणी आहे की चहाचं आधण?–ओय ओय ओय–''

## **झपताल** : आणखी एक बेतालचित्र

झपतालाचा आणखी एक प्रकार आहे. दहा मात्रांचा हा ताल. कचेरीत दहाच्या ठोक्याला सुरू होतो. तिथून पुढे ह्याला 'झोपताल' असेदेखील म्हणतात. चिडलेला हेडक्लार्क टणाटणा उड्या मारतो, म्हणून त्याला 'झंपा'ही म्हणतात. कुणीही काहीही म्हटले तरी हा आहे झपताल.

पार्श्वभूमी : कचेरी. दहाचा सुमार केव्हाच टळला आहे.



आणखी एक
**झपताल**
(सरकारमान्य)



''पेंडशे, स्टेटमेंट आणा लवकर–साहेबाच्या टाळूवर घालायचं आहे!''
''गुर्र गुर्र–फूऽऽस गुर्र–खर्रं–''
''पेंडसे–काय म्हणतोय मी! इथं तुम्ही डोकी उठवा–आणि आम्ही हेडक्लार्क!''
''हॅ हॅ हॅ!''
''हॅ हॅ काय रे नेन्या? हेडक्लार्कच्या प्रत्येक विनोदाला काय हसलंच पाहिजे? पेंडशाची झोप मोडेल ना!''
''हापिसात काय झोपायला येतो?''
''चूप! रात्री नाटकात काम केलं होतं त्यानं–जाग्रण नाही होत?''
''काय कुजबूज आहे ही तिकडे, नेने?''
''मी कशाला कुजबुजीन? हा रानडे–''
''का हो महादेव गोविंद?''
''माझ्या वडलांचं नाव बदलायचं कारण नाही हं अभ्यंकरसाहेब–''
''तणतणू नका–''
''मला उलट बोलता?–इन्सबॉर्डिनेशन? साहेबाला सांगून चामडी लोळवीन.''
''साहेबाचा काका उतरला पाहिजे–युनियनचा सेक्रेटरी आहे–संप पुकारीन!''
''पेंडशे–''
''गुर्रर्र–''
''अरे, हा पेंडसे कुठं मेला? पेंडसे?''
''खामोष!! काफिर! तुला कुत्त्याच्या मोतीनं मरावं लागेल!''
''पेंडशा–दारू प्याला आहेस काय?''
''थेरडा झोपू देईल तर शपथ–''
''काय?''
''झोपेत बोलतोय तो!''
''कोण? पेंडशा? लाथ मारून उठव त्याला!''
''झोपेत बोललेलं एवढं मनाला काय लावून घेता, अभ्यंकरसाहेब?''
''अरे, इथं झोपा घ्यायला पगार घेता?''
''नाहीतर काय तुमच्यासारखा दात कोरायला घ्यायचा?''
''मुस्काट फोडीन हं, रानडे!''
''मनगट लचकेल–शारीरिक शिक्षण मंडळाचा ट्रेझरर आहे मी!''
''तेच धंदे करा–युनियन आणि मंडळ! इथं कशाला येता?''
''सरकारी हपीस आहे. इथं येण्याचा प्रत्येक भारतीय नागरिकाला हक्क आहे!''
''नोकर म्हणून नव्हे!''
''सर्विसला आलो म्हणून काय नोकर झालो काय? उद्या बूट पुसायला सांगाल.''
''आम्ही पुसले! म्हणून हे दिवस आले. तुम्ही आजन्म राहा एल०डी०सी०''

''शट अप–आम्ही लोअर डिव्हिजनमध्ये राहू नाही तर अपरमध्ये जाऊ–''

''मग करा ऐंशी एके ऐंशी–''

''करू! तुमच्यासारखे हातउसने घेत हिंडत नाही ना? माझे पाच रुपये घेऊन सहा महिने झाले–''

''पाच रुपड्यांसाठी किती तोंड वाजवाल? पळून नाही जात कुठं–''

''पेन्शनीत जाल ना पण पुढल्या महिन्यात! मग कुठं पकडायचं?''

''घाबरू नका–दोन वर्षांचं एक्स्टेन्शन मिळालंय! आत्ताच साहेबानं सांगितलं–''

''ओय ओय ओय! मेलोऽऽ''

## एकताल

एकताल हा एक बारा मात्रांचा ताल आहे. ह्या तालातली बेतालचित्रे पोर्ट्रेटच्या स्वरूपाची आहेत. एका चित्रात एकच माणूस बसवला आहे. प्रत्येकाची पार्श्वभूमी निराळी. एकतालातली बेतालचित्रे अन्य चित्रांहून निराळी निघणे अपरिहार्य आहे.

**एकताल १ :** पार्श्वभूमी : किराणाभुसार मालाचे दुकान.

छ्या : एकजण लेकाचा सरळ बोलेल तर शपथ! साला किराणाभुसार मालाचा व्यापारी म्हणजे ह्यांचा नोकर! तांदळात खडे सापडले. आता तांदळात खडे नाय सापडायचे तर काय हिरे सापडायचे! म्हणे पूर्वीचे दाणेवाले चांगले होते! मग जा त्या दाणेवाल्यांच्याकडे!



**एकताल : १**

''साली माणुसकीच राहिली नाही!''

साल्या आजकाल खटखटी काय कमी आहेत? गवर्मेंटवाले तर हात धुऊन मागे लागलेत. शापइनिस्पेक्टर म्हणजे घरजावयाच्या वर! नोकर लोक तर वा!! जरा दुकान सोडून गेलो की घातला गल्ल्यात हात. पुन्हा भेसळप्रतिबंधक साहेब आहेच. नुसता हात दाबून भागत नाही; वर पुन्हा ह्याच्या घरी आपल्या हाताने नेऊन शुद्ध तूप पोहोचवा. साधं सालं खोबरेल उद्या देतो म्हटल्यावर तेलाचं पिंप शील करून, पंचनामा करून गेला! ही काय माणुसकी आहे? पूर्वीचे इनिस्पेक्टर राहिले नाहीत. आपला दरमहा काय पाचपन्नास रुपयाचा माल घरपोच केला की खाल्ल्या मिठाला जागायचे. हे पैसे खाऊन वर बेमान! घ्या. माणुसकीच राहिली नाही!!

**एकताल २** : पार्श्वभूमी : बिऱ्हाड.

बोलू नका! पोरांना शाळेतून काढून बुटपालिशचा धंदा शिकवावा असं वाटायला लागलंय! अरे, काय शिक्षण आहे की चेष्टा? दोन इंग्लिश वाक्यं नाही सरळ लिहिता येत. व्हेन आय वॉज ए स्टूडंट–आम्ही म्हणजे विदाउट स्टॉप फाड फाड युज्ड टु टॉकिंग इंग्लिश! एज्युकेशन हॅज, तुम्हांला सांगतो, म्हणजे बिकम्...बिकेम...बिकमिंग नुस्ता फार्स! वर वह्या! एक बुवा इंग्लिश कॉंपेटिशनला वही–ठीक आहे–म्हणजे हे हो–इंग्लिशमधून 'अवर स्कूल' वगैरे सब्जेक्टवर लिहायचे आपण शाळेत–ते. त्याला–हो–कांपिटिशन...काय? हो, मग मी काय म्हणालो–कांपोझीशनच! वा, कांपिटिशन कसं म्हणेन? इंग्लिशमधे दि हायेस्ट नंबर सोडला नाही मी स्कूलमधे!

**एकताल : २**

''व्हेन आय वॉज ए स्टूडंट–आम्ही म्हणजे विदाउट स्टॉप फाड फाड युज्ड टु टॉकिंग इंग्लिश..''



हापिसमधी इंग्लिश साहेब होता, त्यानी कधी ड्राफ्ट नाय चेंज केला आणि आता हा नवा मद्राशी आलाय तो मला म्हणतो–युवर इंग्लिश इज बॅड! हा मला इंग्लिश शिकवतो! मी सरळ ठणकावला. व्हाय शुड वन केअर व्हेन वन इज नॉट इन द रॉंग? मी म्हटलं, साहेब, माय इंग्लिश इज फेमस फ्रॉम द डेज ऑफ जॉन्सन! आपला जॉन्सनसाहेब आठवतो ना?

साहेब असावा तर असा. पंधरा वर्षं त्याच्याबरोबर काम केलं, कधी वर मान करून पाह्यलं नाय आपल्याकडे—आपण बरा, आपलं काम बरं! तरी ह्या मद्राशी साहेबाला मी आमच्या वाडीतून केळीची पानं नेऊन दिली होती हं! पण माणुसकीच नाही राहिली!

**एकताल ३** : पार्श्वभूमी : शाळामास्तरांची कॉमनरूम.

परमेश्वरा—मास्तर म्हणून जन्माला घातलंस त्याऐवजी भारतातल्या बालमृत्यूचं प्रमाणच कां नाही वाढवलंस एका आकड्यांनी? काय धंदा आहे! पवित्र व्यवसाय म्हणे! दहा ते पाच हमाली करा—आणि ह्यांचे ढीग उकरा वर आणि सांस्कृतिक कार्यक्रम, नाट्यस्पर्धा, चढाओढी—इतकं सगळं करून नाटकाची ढाल आपल्या शाळेला मिळाली नाही म्हणून हेडमास्तर टाफरलाच! मला नाटकं बसवता येती तर थोबाडाला रंग फासून नटच नसतो का झालो? तरी हेडमास्तरना सांगत होतो की बुवा स्पर्धेचे परीक्षक हे हे आहेत. काहीतरी कारण काढून त्यांचा विद्यार्थ्यांतर्फे सत्कारबित्कार करा! तीन हार, तीन कप चहा, चार ग्लॅक्सो बिस्किटं, एक बशी चिवडा, आणि अर्धा डझन हिरव्या सालीची कच्ची केळी—फार तर त्यांच्या घरावरून टॅक्सी! एवढा काय खर्च आला असता? तरी बरं, तीन हजार पोरं झाली शाळेत—पण नाही! सत्कार कशाबद्दल करायचा म्हणाला थेरडा! असले बॅकवर्ड लोक हेडमास्तर! शाळेचा प्रोग्रेस कसा होणार? सत्काराला काय कारण लागतं? म्हणायचं काही तरी साहित्यसेवा, समाजसेवा, कलासेवा आणि टाकायचे हार! तरी मी एक गोल्डफ्लेकचं पाकीट नेलं होतं—पण यंदा एकच पुरुष परीक्षक आणि तीन बाया! त्यांना वेण्या नेऊन द्यायचं त्या चंपादेवी गर्ल्स हायस्कूलच्या हेडमिस्ट्रेसला बरोबर सुचलं! पटकावलं बक्षीस! छ्या:, ही काय मास्तरकी आहे? शिवाय वर्षातून तीनशे पासष्ट दिन साजरे करा! मिरवणुकांसाठी पोरांना पहाटे चार चार वाजता रांगा करून न्या! कारटी तरी अशी—सगळी हजर राहतात. ह्यांच्या पालकांना फटके मारले पाहिजेत. मास्तरांच्या हालाची काही पर्वा?—वर पुन्हा शिकवण्या देताना कुरकुरतात—दिल्या तर पैसे देताना टंगळमंगळ करतात—छे छे छे छे! माणुसकीच नाही राहिली!



**एकताल : ३**

'तरी मी हेडमास्तरना सांगत होतो की बाबा स्पर्धेचे परीक्षक हे हे आहेत...'



**एकताल : ४**

'सर्लाबैंना मी नुस्तं एवढंच म्हटलं की, केक स्वत: केलात की बाजारचा...'

**एकताल ४** : पार्श्वभूमी : सौभाग्यवस्तुविक्रीकेंद्र

विच्चारू नका! आता एवढं काय त्याच्यात गुपित ठेवायचं सांगा बरं, मिसेस ताडफळे–सर्लाबैंना मी नुस्तं एवढंच म्हटलं की, केक स्वत: केलात की बाजारचा? तर त्यात एवढं हो काय फिस्कारायचं? म्हणाली, कळतात बरं का टोम्णे? आता ह्यात टोम्णा कसला? मी काय हिला लिपस्टिक लावते म्हणून हिणवलं का केसांच्या बटा कापून कुळ्र्या कुळ्र्या केल्या ह्या वयात म्हणून बोलले? तुम्हांला ठाऊक आहे ना? मी समाजात जातदिखील नाही ते शांताबैंचं प्रकर्ण झाल्यापासून. आपलं घर बरं, मी बरी. ह्याच लुब्रीनं, बरं का मिसेस ताडफळे, शांताबैंना सांगितलं की, मी त्यांच्या मुलीनं पंजाब्याशी लग्न केलं म्हणून नावं ठेवली म्हणून! माला हो काय करायचंय हिच्या मुलीनं पंजाबी शोधला तर? ज्याला जिथं शेण खायचंय तिथं खावं! एकीनं पंजाबी पाहिलाय. आता दुसरी म्हणे ड्रायव्हरबरोबर फिरते–मी बोल्लेय का कुठं चार्चौघात? थांबा हो–पळून नाही जात. बिल देऊनच जाते तुमचं. तुम्हांला हव्या त्या मिसेस भिसे! गोडगोड बोलून फुकटात पावडरीचे डबे लाटणाऱ्या! आम्ही दिडक्या वाजवून घेतो तर दहादा बिल् बिल् कराल!–हो, तर काय सांगत होते, मिसेस ताडफळे–अगबाई! गेल्या वाटतं! एखादं माणूस बोलताना असं न सांगता जायचं म्हणजे–तरी बरं, यंदा लोणचं घालून देता का, म्हणून विचारायला बरी आली होती! नवी मोटार घेतली म्हणून माणुसकी नको सोडायला अगदीच! हं सांगा तुमचे पैसे–एक गंगावन, दोन स्नोच्या बाटल्या, एक लिपस्टिक, रेमंड ऊलचा डबा...हं किती झाले? अगबाई, काय हो भाव लावता हे–माणुसकीच नाही उरली–

**एकताल ५** : स्थळ : चौपाटी

निमा लेले का रे ती? आं? आपल्या गणू गुप्त्याबरोबर? हरामखोर!...ऐकलं तर ऐकू दे! भितो की काय तिला? अरे, अशा पन्नास पोरी पाहिल्या आहेत. अन्ग्रेटफुल! त्या दगडी

कोळशात काय पाहिलं तिनं? अरे, क्रिकेट काय, आम्ही नाही खेळलो? वशिलेबाजी सगळी! सिलेक्सन करतात म्हणे! एका मॅचला सेंचरी लावली की फॉर्म काय? त्यांचे डॅडी खेळत होते क्रिकेट! तीन मॅचिसमध्ये आवळा काढला तो? वन स्पॅरो डझ नॉट काही तरी मेक म्हणतात ना? गुप्तेला घेऊन हिंडते काय? हिच्या व्होटसाठी कॅन्व्हास करायला आम्ही! बॅडमिंटन टूर्नामेंट्सची सगळी तिकिटं संपली होती तर माझं तिकीट मी हिला दिलं–एवढे मलायन प्लेअर आले होते–आय सेड ऑल राइट. एवढंसं तोंड करून तेव्हा मला म्हणाली, एक तरी तिकीट द्याल का हो? माझं स्वत:चं दिलं. पैसेसुद्धा नाही घेतले–आणि फिरायला तो गणू गुप्ते! कां, हळू कां म्हणून बोलीन–भीती आहे काय? इथे येताहेत दोघे? अरे येऊ दे...हलो–काय गुप्ते? थँक्यू–आम्ही आत्ताच शहाळं खाल्लं–चॉकलेट आपण नाही खात–पोरींनी खावी...तोंड गोड? कशाबद्दल?...मिस लेले? आणि तू?...हो का? वा वा वा...काँग्रेट्स्...अच्छा...बाय बाय! ह्या काळोबाशी लग्न? बरोबर आहे–बापाकडे गाडी आहे गुप्त्याच्या! सगळं वर्ल्ड सालं पैशाच्या मागं...माणुसकी नाही!!

## चौताल

हाही ताल बारा मात्रांचाच. पण मृदुंगाचा; तबल्याचा नव्हे. त्यामुळे ह्या तालावर फक्त जुनीच ध्रुपदे धरावी लागतात.

दृश्य : पेन्शनरांची टेकडी.

''चौचाल कारट्या! पाहिलीत ती–असं वाटतं, झिपऱ्या ओढाव्या आणि ढकलून द्यावी टेकडीवरून!''

''ह्या अष्टग्रहीत बघा–सगळ्यांच्या मिजाशी उतरतील?''

''अहो, आमच्या कारट्यानं तर ताल सोडलाय–आम्ही मरतोय केव्हा याची वाट पहाताहेत!''

''अडलंय खेटर मरायला! तो ओंकारेश्वराचा उखडलेला नंदी पुन्हा जागेवर बसवल्याशिवाय जात नाही म्हणावं आम्ही!''

''तुम्हांला सांगतो. महाभारताच्या अखेरच्या पर्वात आहे पहा सगळं–''

''हो, परवा डॉक्टर शेवाळकरांचा ग्रंथ वाचला...''

''शेवाळकर इज ए ह्यूज हंबग! सगळं मॅक्समुल्लरमधून चोरलंय! ओरिजिनल व्यासांचं वाचा! म्हणूनच गेले आहेत व्यासमुनी–वर्णसंकर माजेल, नीतीचा ऱ्हास होईल–व्यासवाणी ती! हल्लीच्या आकाशवाणीसारखी दळुदळु बाई दळु गाणारी नव्हे. व्यासांना कोणाच्या बापाची भीती? सर्वनाश होईल असं बजावून गेले आहेत–''

''आता आणखी काय व्हायचाय? परवा पेन्शन आणायला गेलो. ह्या हापिसात मुली शिरल्या आहेत–तिथली ती कारकून मुलगी मला 'आजोबा' म्हणाली. मी म्हटलं, तुझा

चौताल

'असं वाटतं झिपऱ्या ओढाव्या आणि ढकलून द्यावी टेकडीवरून...'




बाप आजोबा! भितो काय? मॅकमिलनसाहेबाला नाही भ्यालो तो त्या पोरीला भिऊ? चष्मेवाली कुठली–''

''तोंड आवरून बोला!''

''तुम्ही का भडकताय?''

''मुलगी आहे माझी ती–''

''कुठं?''

''पेन्शन-हापिसात!''

''म्हणता काय?''

''मग? दोनशे अकरा रुपये पेन्शनीत सगळ्यांना घरी बसून गिळायला घालू फुकटचं?''

''अशी शिस्त हवी! तशी मुलगी होती मर्यादशील–मला वाटलंच, चांगल्या घराण्यातली आहे–हयातीचा दाखला न वाचता पेन्शन दिली तेव्हाच ओळखलं. बाकीच्या पोरी मात्र उनाड होत्या–अहो, हापिस ही काय शेपटे घालून यायची जागा आहे?''

''आमच्या कार्टीला बजावून ठेवलंय–वर मान करून पाहशील एका पेन्शनराकडे तर थोबाड फोडीन!''

''प्रश्नच नाही!''

**चौताल** : ह्याच तालातले हे आणखी एक बेतालचित्र.
पार्श्वभूमी : देऊळ.

'पंत म्हणतात–तेव्हा गेला होता कोठे राधासुता तुझा धर्म–''
'गडबोल्यांच्या सुनेचं कळ्ळं का?''
'खराय का हो ते?''
'अहो, खरं म्हंजे–आमच्याच आळीत दोन घरं पुढं टाकून राहतात गडबोले–''
'चांगलं नाक ठेचलंन सासूचं!''
'गावाला नाव ठेवत होती मेली!''
'गेल्या रामनौमीच्या वेळचं आठौतंय ना? ह्या इथंच नव्हती का जुंपली आमची?''
'हो–काहीतरी ऐकलं होतं मी–काय झालं होतं हो?''
'अहो, मी सुंठवडा घेतला न् निघाले–
'सीताकान्तस्मरण...
'जयजयराम–तेव्हा–
'पार्वतीपदे हरहर–
'महादेव–तशी मला–''
'गोपालकृष्णमहाराज की–''
'जय–म्हणते कशी–''
'बोला श्रीपादवल्लभनरसिंहसरस्वती श्रीगुरुदेव–''
'दत्त–काही कारण नव्हतं बरं का–''
'श्रीयोगिराज बाळामहाराज कुर्डुवाडकरमहाराज की–''
'जय–ह्या पुराणिकबुवाचे मेल्याचे–''
'जयजय रघुवीर–''
'समर्थ! पूर्वीचे जोशीबुवा बरे होते–गुरुदेव दत्तावर आटपायचे.''
'म्हणा रघुपति राघव राजाराम पतीत पावन सीता–''



**चौताल**
(भक्तीसंगीतातला)

'गडबोल्यांच्या सुनेचं कळ्ळं का?'

"राम–ही गडबोलीण काही कारण नसताना आली बरं का तरातरा–मेघश्याम!...आणि मला...शीताराम सीताराम–म्हणते कशी...रघुपतिराघव–कां हो–मुलगा वेगळा जातोय म्हणे तुमचा...पतीत पावन...सूनबाईंनी वर्षभरातच गाजवला का...शीताराम...पराक्रम? आणि आता...अहो माझी...जानकीजीवन–सून निदान...करुणासिंधू...आपल्या नवऱ्याबरोबर तरी...सुंदर माधव मेघश्याम...गेली...हिची सून...कळलं ना...पतीतपावन शीताराम...एका नाटकात नाचणाऱ्याबरोबर...रघुपति राघव...पळाली...हा रि विठ्ठल!... जयजय राम...मी गेल्या रामनवमीला...विठेवरी ऊभा...बजावलं होतं हो गडबोलीण-बाईंना...पुंडलिकाचे भेटी...पुराणाला इथेच अशा बसल्या होत्या...आषाढी कार्तीकी भक्तजन येती...पेप्रांतून सुनेचा फोटो दाखवत होती. दिंड्या पताका वैष्णव नाचती... अहो, पायांत चाळ बांधलेला...पोट उघडं...तोंडाला रंग...अंगभर दागिने...खोटे हो... पंढरीचा महिमा वर्णावा किती...तेव्हाच म्हटलं मी...ही जाणार पळून...तश्शी गेली... रखुमाई वल्लभा राईच्या पर्वता–आता गडबोलीणबाईना म्हणावं, तूही नाच चाळ बांधून...

## धुमाळी

पार्श्वभूमी : धुमाळीला आयत्या वेळी कोणती पार्श्वभूमी लागेल ते सांगता येत नाही. ह्या तालाला आठ मात्रा लागतात. पण जेव्हा जो तो आपापल्या मात्रा सुचवायला लागतो त्या वेळी त्याला रणधुमाळी म्हणतात.

"सगळे पाजी आहेत. जो तो पावर लीक करतोय–"

"कम्युनिझम आल्याशिवाय गत्यंतर नाही."

"कोण गाढव म्हणाला ते–जिभा कापून टाकल्या पाहिजेत कम्युनिझमचं नाव घेणाऱ्याच्या! हिंसेचा प्रचार करतो हरामखोर–पोत्यात घालून विहिरीत बुडवले पाहिजेत!"

"ताकत असली तर हात लावा–ढोंगी पंचेवाले! सूत काढताहेत! तिथं रशियानं गागारिनला चंद्रावर धाडलं–"

"ती कुत्री आली का हो परत?"

"अहो, अखंड माणूस जाऊन आलाय! कुत्रीला काय चाटायचंय? आणि इथं हातसडीचा तांदूळ खाताहेत! रशियाचा पराक्रम–"

"आवरा! अमेरिकेनेदेखील पाठवला–पोचला चंद्रावर!"

"डोंबिवली आली का हो?"

"चूप बसा हो! डोंबिवली कुठं जाते?"

"डोंबिवली नाही जात, पण गाडी जाईल ना पुढं?"

"आपल्या देशात फर्म पॉलिसीच नाही!"

"पॉलिसी आहे फक्त पैसे खायची–"

"म्हणूनच कम्युनिझम पाहिजे!"

''कम्युनिस्ट म्हणजे स्वर्गातून पडले आहेत! जसे पैसे नाही खात?''

''दाखवून द्या!''

''दाखवून काय द्या? उगीच आचरटपणा नका करू–परवा आमच्या ऑफिसमधल्या एका फ्रेंडचा फ्रेंड आहे, त्याचा कझिन मॉस्कोला जाऊन आला. सारखे त्याच्या मागं सी०आय०डी०. तुम्ही अमेरिकेत जा–वाटेल तिथं हिंडा–कोणी विचारत नाही!''

''तुम्ही जसे काही जाऊन आलाय न्यूयॉर्कला!''

''मग तुम्ही तरी गेला होता का मॉस्कोला? डोंबिवलीच्या पुढं कल्याणला तरी गेलाय का?''

''जायला कशाला हवं–पेपरात नाही वाचता येत?''

''हो! येतं ना! भांडवलवाल्यांची पेप्रं! साम्राज्यशाहीचे भाट सगळे!''

''आणि तुम्ही स्टॅलिनचे भुत्ये!''

''अहो, हल्ली क्रुश्चेव आहे–स्टालिन मेला–''

''मेला काय? मारला असेल!''

''हो हो–मारला अशेल! वाटेवर पडला होता–आणि ख्रुश्चाव असा उच्चार आहे त्याच्या नावाचा–''

''कोणाला घ्यायचंय त्याचं नाव! केनेडी शिकवतोय धडा त्याला–तरणाबांड आहे.''

''ही मात्र अमेरिकेची थाप आहे हं–सत्तर वर्षांचा तरी असेल. त्याच्या नावाचा केनेडी ब्रिज मुंबईला केव्हापासून आहे. आम्ही नवलकर बिल्डिंगमध्ये राहत होतो त्या वेळी–चाळीस सालच्या पळापळीत आलो डोंबिवलीला.''

''ख्यँ ख्यँ ख्यँ–हो हो हो–ही ही: ही ही:!''

''हसायला काय झालं? केनेडी ब्रिज दाखवून देईन–''

''अहो, तो केनेडी निराळा!''

''अहो, रशिया न् अमेरिका जाऊं दे खड्ड्यात! भारताचं पहा! लिहून घ्या.''

''लिहून काय घ्या? इथं लोकलमध्ये श्वास घेयला जागा नाही.''

''आज लोकलगाडीत नाही, उद्या घरात राहणार नाही–''

''आजच नाही एका खोलीत आम्ही दोघं, आठ मुलं आणि हिच्या दोन बहिणी राहतोय! स्वातंत्र्य आलंय म्हणे! मंत्र्यांना मात्र बंगले!''

''रशियात असं नाही.''

''हो, अशं नाही. रशियात एका खोलीत चाळीस जणांना कोंबतात आणि बाहेर पुन्हा आत कोणी कुरकुरतंय का ते पाहायला कुर्शावचे पोलिस उभे!''

''शट अप!''

''पुन्हा रशिया! अहो, भारतावर परचक्र येणार पुढल्या फेब्रुवारीत. अष्टग्रही विसरू नका–''

''मग तुमचे जनसंघवाले काय पणत्या घेऊन आरत्या ओवाळणार आहेत की काय?''

''छे छे! काँग्रेसवाल्यांसारखे 'ईश्वर अल्ला! तेरे नाम' म्हणणार!''

''तिथं पाकिस्तान गुरकावतंय–चीन युद्धाला सज्ज–आणि आम्ही दारूबंदी सप्ताह करतोय!''

''न पिणाऱ्यांचा छळ! पिणारे पिताहेत–''

''आमच्या डोंबिवलीला या–''

''डोंबिबलीला कशाला या–कल्याणला काय कमी आहेत हातभट्ट्या?''

''पोलिसांची चंगळ आहे! चाळीस वर्षांनंतर पोलिसात घेतात का हो?''

''घेतात! चोर म्हणून!''

''चोरांचंच तर राज्य आहे!''

''जीवनातली शुचिता गेली–''

''काय गेली?''

''त्याचं काय ऐकता? प्रजासमाजवादी वाघुळपंथी! इथून काँग्रेसला मिठ्या, तिथून जनसंघाला आलिंगन–''

''पुढल्या निवडणुकीत धुव्वा!''

''धर्मयुद्ध करून पडणं बरं–पण पापमार्ग...''

''हे पहा–इकडे मार्क्सवादी समाजवाद, तोंडांत आचार्यांची भाषा–अहो, एकदा निश्चित ठरवा. डोक्यावरची लाल टोपी खरी की पंचा खरा ते!''

''त्यापेक्षा कम्युनिष्टांचं ढळढळीत वैधव्य बरं!''

''कम्युनिष्टांचं वैधव्य नव्हे! तुम्ही काँग्रेसवाले गांधींच्या विधवा!''

''हरकत नाही–आमच्या कुंकवाचा धनी भारतीय तरी होता–तुमचा घरोबा एकदा लेनिनशी, एकदा ष्टालिनशी नि आता खुर्शाविशी–लावा पाट!''

''संकुचित राष्ट्रवादाचे दिवस संपले आता!''

''अहो उतरा! सालं दिवसभर काम करून जीव जातो–वर तुमची रोज भांडणं–''

''शट अप!''

''चूप!''

''भांडवलवाल्यांचा हस्तक! हापिसात काम करतो हरामखोर!''

''उतरा–डोंबिवली आली.''

''हे डोंबिवलीवाले महा भांडखोर!''

''उद्यापासून आपण कल्याणवाल्यांनी ह्यांना डब्यातच येऊ देता कामा नये!''

## रूपक

'रूपक' हा एक सात मात्रांचा ताल आहे. हा सदैव दुडक्या गतीने चालतो. इतर तालांची 'धी' किंवा 'धा' वर सम तर याची 'ती' वर–धी ना धी ना ती ती ना!

पार्श्वभूमी : कॉलेजचा व्हरांडा.

“ती–ती कोण रे?”
“ती?”
“ती नव्हे ती? पोनी टेल–”
“शीला राणे...कॉलेज क्वीन–”
“ती कसली कॉलेज क्वीन–थांब जरा. फर्स्ट इअरचा संस्कृतचा पिरिअड सुटू दे–”
ठण् ठण् ठण्!
“ती बघ! ती–”
“ती शेपट्याला पिवळी रिबन बांधली आहे ती?”
“ती नव्हे–तिच्या मागून अंजिरी पातळातली–”
“अंजिरी म्हणजे कसला रंग?”
“साधारण कोका कोलासारखा.”
“हां हां. ती?”
“ती–तिलोत्तमा तेलंग!”
“ती कॉलेज क्वीन काय?”
“अहो मिस्टर–बोटं काय दाखवता?”
“आमची बोटं आम्ही दाखवू–तुम्ही तुमची दाखवा...”
“ती बहीण आहे माझी. चुलतचुलत.”
“कुठली? ती अंजिरी साडी नेसली आहे ती–”
“ती काकू नव्हे. ती फ्रॉक घातलाय ती–”
“ती होय? आणि कॉलेज क्वीनला काकू म्हणता?”
“ती कॉलेज क्वीन? तुम्हांला खरी कॉलेज क्वीन बघायची आहे का?”
“दाखवा की. थँक्यू हां–बहिणीचं एवढं मनाला लावून घेऊ नका–”
“आपण स्पोर्ट आहोत–चला–”
“कुठं?”
“कॉलेज क्वीन बघायची आहे ना? इंटरचा लॉजिकचा तास सुटला की बघा–”
“काय बघता हो?”
“कॉलेज क्वीन!–तुम्हांला बघायची आहे?”
“हॅट्! आत्ताच बघून आलो–”
“कुठून?”
“बायॉलॉजी लॅबमधे आहे बघा–राइट साइडचं तिसरं टेबल! यंदाची शुअर कॉलेज क्वीन्!”
“थँक्यू! चला–”
“आं? पुन्हा पाटी वाच–”
“अरे ही–हीच बायालॉजी लॅब–”

''उजव्या बाजूचं तिसरं टेबल—कोण? ती?''
''ती? जाड चष्मेवाली? लठ्ठी?''
''आणि...ती? कॉलेज क्वीन?''
''ती? ती? ना...ही...शक्य...ना...ही...''
''ती...तिला मिशासुद्धा आहेत...तिला कॉलेज किंग करा—''
''कॉलेज किंग नको...कॉलेज किंग काँग!''

आणि शेवटले बेतालचित्र

## आदिताल

प्रस्तुत बेतालचित्रांत आदिताल ठेका, पेशकार, कायदा, गततोडा; चक्रधारगत व शेवटी रेला ह्या पद्धतीने मांडण्यात आला आहे. शिवाय चालत्या लयीत आड-कुआड आहेतच. तबल्यात दिल्लीबाज, अजाडाबाज अशी निरनिराळी घराणी आहेत. प्रस्तुत बेतालचित्रांत कुठलीही दोन घराणी एकत्र आली तरी तोंडे वाजवायची पद्धत तीच! ह्यात ताल संभाळण्यापेक्षा तोल संभाळण्याकडे लक्ष अधिक द्यावे. ह्यातील बरेचसे बोल सरळ आघातापेक्षा तिरकस अनाघात पद्धतीने अधिक परिणामकारक ठरतात.



ठेका

### ठेका

ठेका : चंद्रीचं लग्न यंदा तरी जमलंच पाहिजे.
पेशकार : मुलगी घरकामाला चांगली आहे.
आड : म्हणजे दिसायला ज्यमत्यम्!
पेशकार : शरीरप्रकृतीनं सुदृढ—
कुआड : म्हणजे ढब्बी!
पेशकार : शिवाय विणकाम, भरतकाम उत्तम करते—
आड : म्हणजे शिक्षण व्ह० फा०पर्यंत ज्यमत्यम्!
पेशकार : स्वैपाक चांगला करते—
कुआड : म्हणजे काकूछाप!
पेशकार : आमच्या घरचं वळण साधं—
आड : म्हणजे कमी हुंड्याची प्रस्तावना!
पेशकार : हा फोटो बघा—
कुआड : फोटोत कुब्जेची मेनका होते.
पेशकार : एकदा प्रत्यक्ष पाहून मुलगी पसंत केलीत की मग इतर बोलणी करू.
ठेका : चंद्रीचं लग्न यंदा जमलंच पाहिजे.



आड



कुआड



कायदा

## पेशकार

कायदा : ''आमचा मुलगा बी० ए० आहे.''
''चांगल्या थोरामोठ्यांच्या मुली सांगून आल्या होत्या.''
''पुढल्या वर्षी पर्मनंट होईल मुन्सिपाल्टीत.''
''मुलीचा वर्ण मुळचाच असा ना?''
''कारण...परवा बर्व्यांच्या मुलाला मुलगी दाखवली ती नाटकातला रंग लावून–''
''बरं ते जाऊ दे! हुंड्याचं बोला.''
''आपण म्हणाल ते.''
''आमचा मुलगा म्हणतो, हुंडा घेणार नाही.''
''वा! वा! बहुत अच्छे! क्या बात है.''
''फक्त एक रेडियो–

## आड

एक स्कूटर–तरी आम्ही रेफ्रिजरेटर मागणार होतो–
पण नको नको–नको!
एक सोन्याचा पट्टा लावून
रिष्टवाच–दोन सूट वुलन
एक रेशमी–शिवाय दोन्हीकडचा
खर्च–आमंत्रणं तुम्ही छापायची–
मजकूर आम्ही देऊ–मराठी
हिंदी आणि इंग्रजी–

हिंदी मात्र हवीच–त्याशिवाय
दिल्लीच्या मंत्र्यांचे संदेश येत
नाहीत–शिवाय मग मानपान,
करणी–सहा लुगडी सासूला,
पाच नणदांना प्रत्येकी पाच पाच
तो कायदाच आहे आमच्या घराण्याचा–
ब्यांड, सनई, लाउडस्पीकर–
रात्री गाणं हवं (प्र)सिद्धिविनायकबुवांचं–
त्याखेरीज लग्न गाजणार नाही
आणि आळी जागणार नाही.
मांडवाचा खर्च तुमचा हं–
दिमतीला एक टॅक्सी.
बायकांच्या वेण्या,
पुरुषांचे गोटे
फुलांचे!–तुमचा खर्च.
आम्ही हुंडा घेणार नाही–
कदाचित काहीच घेतलेही नसतं–
पण कायदा आहे घराण्याचा
तो पाळला पाहिजे–कबूल?
एरवी तुम्ही देऊ नये
आणि आम्ही घेऊ नये
पण कुळाचार सोडू नये
जनरीती तोडू नये
म्हणून म्हणतो दे दे दे दे
आणि मुलाला सांगतो–
तुमची मुलगी आपल्या सदऱ्यात
घे घे घे घे! घे घे घे घे! घे घे घे घे!

**गततोडा** : मुलीकडच्यांना रीतच नाही.

"अहो, हा चहा आहे की सार्सापर्ला?"
"बँडवाले एवढेच? हे काय लग्न आहे की सिनेमाची जाहिरात?"
"असली सुताडी नेसायला अडलंय माझं खेटर!"
"काय म्हणून ही मुलगी पसंत केली देव जाणे!"
"ती नाकाचा शेंडा वर करून हिंडत्येत ती का हो मुलाची आई?"

"मुलाला टक्कल आहे वाटतं–टोपी दाबून दाबून बसवतोय!"
"शेवटी वनस्पती तूपच वापरलेलं दिसतंय लाडवांना!"
"मी मुलाचा काका आहे! सतरंजी उचलायला सांगता मला?"



"यादीत सोन्याच्या लवंगाचं कुठं ठरलंय? देणार नाही."

"तरी आम्ही बजावलं होतं–मुलीचा बाप वरून दिसतो तितका हा नाही."



**चक्रधारगत** : सकाळपासून मी एकटा मरतोय! हे आणा ते आणा–

ते आणा हे आणा–बाकीचे बाजीराव आम्ही हमाल
हे आणा ते आणा–सकाळपासून मी एकटा मरतोय
हे आणा ते आणा–बाकीचे बाजीराव आम्ही हमाल
हे आणा ते आणा–हे आणा ते आणा–
बाकीचे बाजीराव–सकाळपासून मी एकटा मरतोय!

**तिय्या** : शुभ मंगल सावधान

सावधान
सावधा न!



**रेला** : जिलब्या–जिलब्या जिलब्या घ्या–

भजी आणा–
मठ्ठा मठ्ठा मठ्ठा–
जिलबी जिलबी जिलबी–
घ्या घ्या घ्या–
वाढा–वाढा–वाढा–
भाजी आणा लौकर–
वा! वा! वा! असं कसं–वाढा!
हं–आग्रहाची फक्त एक...

एक काय, पाच वाढा–

हं–गरम गरम–
नाव घ्या–नाव घ्या–
जिलबी जिलबी–
छान छान छान
जोडा मोठा छान आहे.
अगदी जिलबी आणि मठ्ठा
हॅ हॅ हॅ–हॅ हॅ हॅ हॅ–हॅ हॅ हॅ हॅ!

# माझ्या भावी चरित्राची ऐतिहासिक साधने

शिवाजीमहाराजांचे चरित्र लिहिण्यातल्या अडचणींवर नुकतेच एका प्रसिद्ध इतिहाससंशोधकाचे भाषण झाले. इतिहाससंशोधक हे मुख्यत: प्रसिद्ध असण्याविषयीच प्रसिद्ध असतात हा भाग जरी वगळला, तरी त्यांनी मांडलेल्या अडचणी मला पटल्या. काही कुत्सित लोकांच्या मते ते महान चरित्र लिहिण्याआड येणारी मुख्य अडचण म्हणजे ते स्वत:च असे होते. ते मला पटले नाही. मुख्य अडचण म्हणजे हे चरित्रनायक स्वत:विषयीचा लेखी पुरावा फार कमी ठेवतात, त्यामुळे चरित्राची साधने मिळत नाहीत. वास्तविक जगात हल्ली साध्यापेक्षा साधनांची संख्या इतकी वाढली असताना इतिहासकारांनाच साधनांची इतकी अडचण कां भासावी हादेखील संशोधनाचा विषय व्हावा. ते प्रसिद्ध इतिहासकार सांगत होते की, मुख्य अडचण मोडीची आहे. ''परवा बाजारात भाजी आणताना मलाही मोडीची चणचण भासली'', असे मी हळूच माझ्या शेजारी बसलेल्या एका दुसऱ्या प्रसिद्ध इतिहासकाराच्या कानात कुजबुजलो. त्यांनी माझ्याकडे श्रावणीच्या रांगेत यवन येऊन बसल्यासारख्या नजरेने पाहिले. पुढे मोडीचा उलगडा मलाही झाला. डायऱ्या, पत्रे वगैरे इतिहासाची मुख्य साधने आहेत हे कळल्यावर पुढल्या शतकातल्या चरित्रकाराची गैरसोय होऊ नये म्हणून मी माझ्यापुरती साधनांची तयारी करायला सुरुवात केली आहे. आता माझे चरित्र लिहिले जावो अगर न जावो, साधनांवाचून ते अडले असे व्हायला नको. माझे चरित्र लिहिले जावे यापेक्षा भावी चरित्रकाराची सोय करणे एवढाच नम्र उद्देश आहे. आता ही साधने तयार करताना काही मेखा मारून ठेवायला हव्यातच.

चरित्रनायकाच्या जन्मतिथीविषयी वाद सुरू करण्यापासून चरित्रलेखनाला सुरुवात होते हे प्रसिद्धच आहे. असा वाद सुदैवाने त्याविषयी विशेष खटपट न करता माझ्या बाबतीत होणारच आहे. कारण सरकारी पाठ्यपुस्तकात मी लिहिलेल्या धड्यांवर माझ्याविषयीची त्रोटक माहिती लिहिताना माझ्या जन्मतारखेविषयी एव्हापासूनच मतभेद व्हावा अशी सोय केली आहे. हे मलाही अचानक कळले. एके दिवशी माझी पंचाहत्तरी साजरी करण्याची योजना घेऊन एक गृहस्थ आले. त्यांनी आपल्या मुलाच्या पुस्तकात माझी जन्मतिथी पाहून

गणित मांडले होते. ''त्यानुसार'' (हा त्यांचा शब्द) येत्या वैशाखात माझे चौऱ्याहत्तरावे सरून वैशाख पुनवेला मी पंचाहत्तराव्यात (लटपटत?) पदार्पण करत असल्याचे त्यांच्या ''निदर्शनास'' (त्यांचाच शब्द) आले होते. माझी आणि गौतम बुद्धाची ''जयंती आणि पुण्यतिथी'' एकाच दिवशी येते हा योग त्यांना मजेदार वगैरे वाटला होता. आता माझ्या ''सरणं'' गच्छामीचा योगही त्याच तिथीला येऊन मजेदारपणात भर पडणार आहे हे भविष्य त्यांना आधीच कसे कळले देव जाणे! पण माझ्या जन्मतिथीविषयीचा घोळ निर्माण होऊन माझ्या चरित्राला पोषक असे वातावरण निर्माण झाल्याचा आनंद मी त्यांच्यापासूनही लपवून ठेवू शकलो नाही. पंचाहत्तरावीचा सोहळा डावलूनही मी माझे वय चोरतो आहे अशी शंकाही त्यांना आली होती. आता माझे खरे वय सांगणारी साधनेही दुर्दैवाने माझ्या हाताशी नव्हती म्हणून मी आणखी एक पाठ्यपुस्तक उघडून दाखवले. त्यात मला साठीपुढे ढकलण्यात आले होते. शेवटी तिथीचा वाढदिवस आणि तारखेचा वाढदिवस यामुळे कसे घोटाळे झाले आहेत आणि सध्या चालू असलेले छत्रपती शिवाजी महाराज, लो० टिळक, थोरले, मधले इत्यादी बाजीराव, त्रिंबकजी डेंगळे, मानाजीराव फाकडे, फार कशाला प्रभू रामचंद्र, श्रीकृष्ण इत्यादी सगळ्याच थोर पुरुषांचे वाढदिवस चुकीच्या दिवशी कसे साजरे करतात याविषयी त्यांनी मला एक तासभर व्याख्यान दिले. चरित्रनायक होण्याचा असा हा जन्मसिद्ध हक्क मिळाल्याच्या आनंदात मी ते ऐकलेही!

तेव्हा आता इतर साधने उपलब्ध करून देण्याच्या तयारीला मी लागलो आहे. मुख्य म्हणजे डायऱ्या. डायरी लिहिण्याचा निश्चय मी अनेक वेळा केला आहे. अगदी शाळेत असल्यापासून. ''आज सकाळी उठलो. आलजिब्र्यातील गणिते सोडवायचे ठरवले. सूर्यनमस्कार घातले...(आकडा गुलदस्तात ठेवून) असल्या तपशिलाने जानेवारीच्या सहासात तारखेपर्यंतची पाने भरलेल्या माझ्या शालेय जीवनातल्या डायऱ्या कुठे नाहीशा झाल्या, कोण जाणे! जुन्या डायऱ्या आणि पेन्सिली यांचा शेवट कसा होतो हे एक मला गूढ आहे. दोरी बांधून भिंतीला लटकावलेली वाण्याच्या दुकानातली पेन्सिल वगळली तर पेन्सिलीचे शेवटले थोटूक हातात धरून, आता शेवटले शिसे झिजले म्हणून फेकून दिल्याचा अनुभव असलेल्या माणसाला जाहीर दंडवत घालायची माझी तयारी आहे. असो!

अर्थात ही डायरी लिहिताना पुढल्या शतकात आपले चित्र कसे रंगवले जावे याची खबरदारी घेणे अतिशय आवश्यक आहे. संशोधकाच्या नजरेतून कुठल्या गोष्टीवर नवा प्रकाश टाकण्याजोगा मजकूर आढळेल हे सांगणे कठीण आहे. त्यातून एखादे प्रकरण तयार व्हायला हवे. तेव्हा तीही सोय करणे प्राप्त आहे. शिवाय दिवस हे इनसाइड, अनटोल्ड, बिटवीन द लाईन्स—म्हणजे अंतस्थ, अकथित, सूचक अशा कथांचे! माणूस वाटला होता तसा नव्हता, हे दाखवण्याचे! शिवाजीमहाराज कशासाठी जगले यापेक्षा कसल्या रोगाने वारले हे सांगण्याचे! लोकमान्यांना सुपारीचेच व्यसन नव्हते—त्यांच्या आणखीही काही अंतस्थ गोष्टी होत्या, अशा स्वरूपाचे संशोधन करून त्यावरची पाचदहा

प्रकरणे आटपली की, मग ते मंडालेच्या तुरुंगातही सातआठ वर्षे *गीतारहस्य* लिहिण्यासाठी जाऊन राहिले होते हे सांगण्याचे! तेव्हा भावी चरित्रकाराची तीही सोय करायला हवी. ह्या दृष्टीने मी जी काही पूर्वतयारी चालवली आहे त्याचे नमुने द्यावेत असा विचार आहे. उदाहरणार्थ, डायऱ्या. तेवढ्यासाठी छापील डायऱ्या विकत न घेता खिसा आकाराच्या वह्या घेऊनच वर्षांची नोंद केली आहे. जुन्या कोऱ्या डायऱ्या बाजारात मिळणे अवघड असते हे होतकरू चरित्रलेखकांना या ठिकाणी सांगून ठेवावेसे वाटते.

राजकारणाशी माझा संबंध नाही. हा एक मला माझे चरित्र लिहिण्यापासून भावी चरित्रकाराला परावृत्त करणारा फार मोठा धोका वाटतो. सरकारी पातळीवर जन्मशताब्दी साजरी होण्यात अडचणी निर्माण होण्याचीही शक्यता आहे. शक्य तर जन्मशताब्दी माझ्या ह्यातीतच साजरी व्हावी अशी माझी इच्छा आहे. अनायासे कुठल्याशा पाठ्यपुस्तकात काटा पंचाहत्तर वर्षांवर नेला आहेच; तो आणखी मागे ढकलावा म्हणतो. म्हणून एका डायरीत मी चक्क लोकमान्यांच्या आणि माझ्या भेटीचाच वृत्तान्त लिहून ठेवला आहे.

''मी गायकवाडवाड्यात शिरलो आणि समोरूनच लोकमान्य येताना दिसले. गावरान शेंगांची टरफले सोलून शेंगदाणे तोंडात टाकत ते येत होते. लहानपणी वर्गात शेंगांची टरफले आपण टाकली नाहीत हे त्यांनी सांगितल्याचे मी ऐकले होते. परंतु मी प्रत्यक्ष त्यांना टरफले टाकताना पाहिले. 'आज सकाळीच इथे कुठे?' असा त्यांनी मला प्रश्न केला. मग मी त्यांना त्यांच्या 'सरकारचे डोके ताळ्यावर आहे काय?' ह्या अग्रलेखासंबंधी चर्चा करायची आहे असे सांगितले. ते मला 'उद्या या' म्हणाले. तेवढ्यात सत्यभामाबाईंनी 'मंडईत व्याख्यानाला जाणार असाल तर चबुतऱ्यावरून मटार आलाय का पाहून घ्या.' असेही बजावलेले मी ऐकले.

संध्याकाळी गोपाळराव आगरकरांना भेटून आलो. 'बळवंतराव माझ्यावर फार खार खातो आताशा,' असे म्हणत होते.

दि०........१९१४.

बंडगार्डनवर गोपाळ कृष्ण गोखले बग्गीतून फिरायला जाताना पाहिले. कोचवानावर डाफरले होते. ही मवाळ मंडळी स्वत:च्या नोकराचाकरांबाबत इतकी जहाल कशी हे एक कोडेच आहे.

दि०........१९१९.

मोहनदास करमचंद गांधी नावाच्या गुजराती माणसाने आफ्रिकेत आपण मजुरांची चळवळ कशी लढवली याविषयी आत्मप्रौढीने भरलेले भाषण केले. वक्ता पुण्याच्या श्रोत्यांपुढे बोलताना लटपटत होता. इंग्रजीतून बोलला. इंग्रजी बरे होते, पण इडियॉमेटिक नव्हते. हा गृहस्थ बॅरिस्टर आहे असे म्हणतात. त्याच्या काठेवाडी पगडीमुळे तो प्रथम मला कापूस पिंजणारा वाटला. पण पुढे सूत काढण्याविषयी वगैरे काहीतरी बोलला. जानवीजोड विकण्याचा धंदा काढण्याचा विचार असावा.

दि०.......तारीख अस्पष्ट ठेवली आहे.

भगतसिंगाचे पत्र नेऊन राजगुरूला दिले. राजगुरूची पिस्तुले घेऊन पंजाबात जायची इच्छा दिसली नाही. शेवटी त्याला गीतेतील 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्' हा श्लोक समजावून दिला. राजगुरूचे संस्कृत बरेच कच्चे वाटले.

दि० २१ जानेवारी (सन लिहायचे ठेवून दिले आहे)

आज नारायण पेठेतून येताना गायकवाडवाड्यातून एक तरुण संन्यासी बाहेर पडताना दिसला. मी लगेच ओळखून त्याला म्हटले, ''आर यू मिस्टर विवेकानंद?'' त्याने हसून होकार दिला. गीतेच्या इंटरप्रिटेशनबद्दल आपले आणि मिस्टर टिळक यांचे मूलभूत मतभेद आहेत असे ते सांगत होते. हिंदुस्तानभर आपण पायी फिरत आहोत असे मला म्हणाले. दुपारी त्यांना टांग्यातून जाताना पाहिले. मला पाहून त्यांनी मान फिरवली. रामकृष्ण परमहंसांचे आणि त्यांचे सध्या फाटलेले दिसले. कारण आपली फॉरेनला जायची कल्पना त्यांना आवडली नाही असे म्हणाले. ''ह्या म्हाताऱ्या माणसांना तरुणांच्या अँबिशन्स कळत नाहीत.'' हे त्यांचे उद्‌गार मला चिन्त्य वाटले.

दि० १७ ऑगस्ट १९१२.

मंडईत नरसोपंत केळकर भेटले. अंजीर विकत घेत होते. मी विचारले ''काय तात्यासाहेब, बरे आहेत का अंजीर?'' तशी म्हणाले ''म्हटलं तर बरे आहेत, म्हटलं तर वाईट आहेत''. हल्ली काकासाहेब खाडिलकर नाटक कंपनीतल्या लोकांच्या फारच नादी लागले आहेत अशी तक्रार करत होते. त्यामुळे 'केसरी'च्या घड्या घालण्यापासून सगळ्या कामावर त्यांनाच देखरेख ठेवावी लागते असे म्हणाले. ''नाहीतरी हल्ली केसरीची घडी विस्कटलीच आहे'', असा मी विनोद केल्यावर ते भरपूर हसले आणि म्हणाले ''तुमच्यासारख्यांनी विनोदी लिहायला हवे.''

'हास्यविनोद-मीमांसा' ग्रंथ लिहिण्याची कल्पना मी त्यांना सुचवली.

दिनांक........१९२१.

लोकमान्यांचे निधन झाले. मि० गांधींना पत्र पाठवून तुम्हांला 'महात्मा' होण्याची संधी आली आहे, दवडू नका, असे कळवले.

दि०........१९२१.

गांधींचे तातडीचे उत्तर आले. त्यांना सत्याग्रहाची कल्पना सुचवली.

दि०........१९२१ जिनांची हायकोर्टात गाठ पडली. गांधींविषयी फारच वाईट बोलत होते. मी मोतीलाल नेहरूंचे चिरंजीव जवाहिरलाल यांना ही हकिगत सांगितली. परंतु हल्ली ह्या गृहस्थांचे प्रस्थ वाढत चालले आहे. देखणेपणा आणि श्रीमंती हे मुख्य भांडवल असावेसे वाटले. मात्र मोतीलालजींचा डौल नाही. सरोजिनीदेवीच्या कवितासंग्रहाला प्रकाशक मिळत नसल्याचे कुणालासे सांगत होता. मी त्यांना टागोरांच्या कवितांचा अभ्यास करायला सांगितले.

दि०........१९२६. भास्करबुवा बखल्यांची बैठक शास्त्री हॉलमध्ये बरी झाली. थोडा वेळ त्यांनी मला पेटीची साथ करायला सांगितले. शेवटी बऱ्याच जागांना मलाच दाद

मिळते आहे असे पाहून पूर्वीच्या पेटीवाल्याला बसवले. त्यामुळे पुढे बैठकीत विस्कळितपणा आला. 'उगिच कां कान्ता' बरे म्हटले. तंबोऱ्यावर मा० कृष्णा नावाचा त्यांचा शिष्य दाद घेऊन गेला. अल्लादियाखाँसाहेब भेटले. त्यांच्याशी 'शुद्धनाट' आणि भूपटनाट वर चर्चा केली. उद्या ज्योतिर्विद्यामंडळात 'ग्रहणे आणि फलज्योतिष' ह्या विषयावर भाषण असल्यामुळे बैठकीला शेवटपर्यंत थांबलो नाही (कुणाचे भाषण आहे ह्याचा उल्लेख न केल्यामुळे ज्योतिषशास्त्रावरचा माझा अभ्यास हा एक वादाचा विषय करण्याची संधी ठेवून दिली आहे.)

राजकीय पुढाऱ्यांशी अशी घसट एकदा सिद्ध केल्यावर त्यांची पत्रे माझ्या संग्रही असायला हवीत, ही एक अडचण आली. म्हणून एका डायरीत नोंद केली :

'...आज जुनी पत्रे तारीखवार लावावी म्हणून ट्रंक उघडली. आतली सर्व पत्रे वाळवी लागून भुसा झाली होती. माझ्या डोळ्यांत अश्रू दाटले. वास्तविक लोकमान्य टिळक, गांधी, टागोर, सावरकर, भगतसिंग, सुभाषबाबू, जतीन्द्रनाथ दास, मौलाना आझाद, सरोजिनी नायडू यांच्याशी झालेला पत्रव्यवहार हा माझा अमोल ठेवा होता. बेचाळीस साली खोलीवर पोलिसांची धाड आली असताना वाचवलेली पत्रे वाळवीच्या भक्ष्यस्थानी पडली. त्यात 'क्विट इंडिया'च्या ठरावाचा मी केलेला कच्चा खर्डा, *गीतांजलीत*ल्या इंग्रजीच्या चुका दाखवल्यानंतर पुढील आवृत्तीत ह्या चुका सुधारून घेऊ असे सांगणारे टागोरांचे पत्र, नेताजींना गांधींशी तुमचे कितीही मतभेद झाले तरी मी तुमच्या पाठीशी आहे हे कळवल्यानंतर त्यांचे कृतज्ञतेने भरलेले पत्र, रुझवेल्टला दुसऱ्या युद्धात बघ्याची भूमिका न घेता रिंगणात उतरा अशी खडसावून तार पाठवल्यावर आलेले उत्तर–असे महत्त्वाचे कागद नष्ट झाले. त्याखेरीज गडकऱ्यांनी *एकच प्याला* नाटक लिहून संपवल्यावर 'एकदा ऐकून जाच' एवढा मजकूर लिहून खाली तुमचा 'लालजी' अशी आपुलकीने सही केलेले कार्ड, हरिभाऊ आपट्यांचे *पण लक्षात कोण घेतो*च्या हस्तलिखितातले छापील पुस्तकात न आलेले यमूच्या पुनर्विवाहाविषयीचे प्रकरण आणि शेवटी ती कादंबरी दुःखान्त करून यमूला वैधव्यातच मरायला लावून तिचा पुनर्विवाह घडवून आणण्याची ताकद नसल्याचा पुरावा, हे सारे सारे नष्ट झाले याचा अतोनात खेद झाला.'

वास्तविक ह्यात खरा पुरावा नष्ट केला तो पुढल्या शतकात कुणीतरी माझ्या डायरीविषयी शंका घेईल हा! हे धूर्त वाचकांच्या लक्षात आले तरी संशोधकांच्या लक्षात येणार नाही याची खात्री आहे. कारण संशोधकांचे थोडेसे ऑडिटर लोकांसारखे असते. पावतीचा कागद असण्याशी कारण! त्याप्रमाणे देवाणघेवाण झाली की नाही हे पाहण्याची जबाबदारी ऑडिटर मंडळीवर नसते. तीच गत संशोधकांची! शिवाय अचूकपणाविषयी माझा किती कटाक्ष असे हे दाखवण्यासाठी काही डायऱ्यात तशाही नोंदी आहेत.

'आज बालगंधर्वांचे नाटक चार वाजून बेचाळीस मिनिटांनी सुरू झाले.' 'लोकमान्यांचे शांतारामाच्या चाळीतले भाषण आज दहा मिनिटे उशिरा सुरू झाले. दादासाहेब खापर्ड्यांनी आज हिरव्या रंगाचा चौकड्यांचा फेटा बांधला होता.' 'संयुक्त मानापमानाचा

प्रयोग पाहिला.' [हा महाराष्ट्रात आज ऐंशीच्या घरात असलेल्या प्रत्येकाने पाहिला आहे. आणखी पन्नास वर्षांनी डबल धैर्यधर, डबल भामिन्या (संख्येने आकाराने नव्हे) यांचे प्रयोग पाहिल्याचे सांगणारे किमान पन्नास हजार रसिक प्रेक्षक भेटणारच!] 'केशवराव भोसल्यांनी 'माता दिसली' पांढरी एकमध्ये म्हटले. काही लोकांना काळी एक असावी असे वाटले. परंतु मी दोन्ही आर्गनवाल्यांच्या मधे बसलो होतो. त्यामुळे बापू पेंढारकरांनी पांढरी एक धरलेली मी पाहिली आहे.'

असले सूक्ष्म तपशील तर शेकडो आहेत.

जन्मतारखेचा भोज्या अनिश्चित ठेवल्यामुळे माझ्या डायरीत माधवराव रानड्यांपासून यशवंतराव चव्हाणांपर्यंत सगळी राजकीय मंडळी, भास्करबुवा बखल्यांपासून लता मंगेशकरपर्यंत गायक-गायिका, हरिभाऊ आपट्यांपासून ते रणजित देसाईपर्यंतचे लेखक मोठ्या मजेत नांदताहेत. म्हणजे एका डायरीत काकासाहेब खाडिलकरांना 'मानापमानाचा तिसरा अंक बदला' असे सांगितले हा उल्लेख. एके ठिकाणी गोविंदराव देवलांना शारदेतल्या पदातल्या यतिभंगाच्या चुका दाखवून दिल्या हा मजकूर. तर दुसरीकडे 'मंगेश पाडगांवकर-करंदीकर-बापटांबरोबर कोंबडी खाल्ली!' हेही लिहून ठेवले आहे. ह्यातून मी 'एक की पाच' असाही वाद निर्माण होईल. कशानेही का होईना, पुढल्या शतकात आपले नाव गाजत राहिले पाहिजे याची व्यवस्था चालू आहे. तसा मी लेखनशैलीतही आवश्यक फेरफार करीत गेलो आहे. उदाहरणार्थ, 'हरहर!-एकसमयावच्छेदेकरून–' छाप मराठीपासून ते 'च्यायची भंकस'पर्यंत मराठीच्या दुर्दैवाचे दशावतार माझ्या डायऱ्यांतून खेळ करत आहेत. माझ्या डायऱ्यांतून माझी राजकीय, धार्मिक, सामाजिक, साहित्यिक वगैरे मते शोधून काढणे मी इतके अशक्य करून ठेवले आहे की, त्याच्यावरून मी मवाळ होतो की जहाल होतो येथपासून ते मी परंपरावादी होतो की संतप्त तरुण होतो याचे संशोधन करणाऱ्या तीन डझन पीएच० डीं०ची सोय होईल आणि तितक्याच प्राध्यापकांची गुजराणही होईल.

उदाहरणार्थ : (१) आज रविकिरण मंडळात गेलो. केशवसुतांच्या नीरस कवितेला ह्या कवींची सुनीते गाडून टाकतील.

(२) मर्ढेकरांना मी महाकवी मानतो. त्यांच्या सौंदर्यशास्त्राच्या सिद्धान्ताशी मी सहमत आहे. रविकिरण मंडळाच्या कवितेतल्या सूक्ष्म पलायनवादाला मर्ढेकरांची कविता हेच उत्तर आहे.

(३) लोकमान्यांना सुधारणा संमत नव्हती, कारण त्यांचा पिंडच सनातनी होता.

(४) आगरकरांची बुद्धिनिष्ठा मान्य करूनही असे म्हणावेसे वाटते की, टिळकांची समाजसुधारणाविषयक भूमिका ही अधिक तर्कशुद्ध होती.

(५) चिपळूणकरांनी मराठी भाषा बिघडवली.

(६) विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी मराठी भाषेला जी भरजरी वस्त्रे चढवली ते ऋण विसरून चालणार नाही.

(७) ज्योतिबा फुल्यांनी टिळकांना समजून घेण्याचा प्रयत्न केला नाही. अर्थात तो दोष टिळकांचाच आहे...इ० इ०.

आता वरपांगी ही वाक्ये परस्परविरोधी वाटतील. परंतु ह्या सर्व महाभागांच्या पुण्यतिथ्यांना होणारी विद्वानांची वक्तव्ये ऐकल्यानंतर एकतर 'पुण्यतिथी-योग्य तमाम पुढारी' चौकांत जाहीर भांडणे करून खाजगीत मात्र कशी आपण जनतेची मजा केली अशा चेहऱ्याने एकत्र जमून पुण्यात असले तर बालम खिरे किंवा गावरान शेंगा आणि मुंबईत असले तर भेळ खात असतील अशीच कल्पना होते. एकच मंत्री सकाळी आंबेडकर-जयंतीचे भाषण ठोकून संध्याकाळी जगद्गुरू शंकराचार्यांच्या सत्काराचे वक्तव्य करण्याचा चमत्कार घडत असतोच. एकाच ब्यांडवाल्यांच्या ताफ्याने सकाळी लग्नात ब्यांड वाजवून संध्याकाळी मर्तिकापुढे 'रघुपति राघव राजाराम' वाजवायची सुपारी घेण्यापैकीच हा प्रकार आहे! माझा उद्देश माझ्या भावी चरित्रात फक्त आतल्या गोष्टी पुरवणे हा आहे. शिवाय, हे कार्य पुढल्या शतकात व्हायचे असल्यामुळे त्याच्या परिणामाची आज धास्ती बाळगायचे मला कारण नाही.

एक जमाना 'नायक' बनवणाऱ्या चरित्रकाराचा होता. आता दिवस प्रति-नायक किंवा ॲण्टी हीरोचे आहेत. पुतळा संगमरवरी वाटला तरी पाय मातीचे होते हे सिद्ध करण्याचे आहेत. अशा ह्या काळात आपणच आपले पाय मातीचे होते हे सिद्ध करणारे पुरावे पेरून ठेवले तर पुढल्या शतकात ते सुरुंग उडतीलही. चांगले म्हणून माझ्या डायरीत एखादे 'तसले' प्रकरणही गोवायला सुरुवात केली आहे. त्याबाबत खोट्या गुप्ततेचाही आव आणला आहे. म्हणजे पुढल्या जन्मशताब्दीला आमच्या वाङ्मयीन कर्तबगारीबरोबर ह्या अंगाविषयीही (किंवा अंगवस्त्राविषयीही) चवदारपणाने चर्चा होईल. त्या दिशेने काही पाने भरली आहेत :

दिनांक........कोजागिरी पौर्णिमा.

चौपाटीवर आज क ची भेट. टिपूर चांदणे पडले होते. नवीन कविता वाचून दाखवली. शुद्धलेखनातल्या चुका दुरुस्त करून दिल्या. आणि कादंबरीलेखनच क ला अधिक चांगले जमेल असे सांगितले.

दिनांक........क चा आज वाढदिवस, प्राध्यापक स शी क ने चहापाण्याच्या वेळी इतक्या सलगीने वागणे मला आवडले नाही. स चा लघळपणाही तिरस्करणीय होता. क ला वाढदिवसानिमित्त नऊ वारांचे वस्त्र दिले. आज मुक्कामाला कच्या घरीच होतो. कुटुंब बाळंतपणासाठी माहेरी गेले आहे.

दिनांक........आज कला 'कुंकू' हा चित्रपट पाहायला घेऊन गेलो. कला आधी आत पाठवले व काळोख झाल्यावर शेजारच्या खुर्चीवर जाऊन बसलो. मध्यंतरात मागल्या रांगेत प्रा० स दिसला. मी न् पाहिल्यासारखे केले.

दि०........प्रा० स ने टोपणनावाने माझ्या कादंबरीवर समीक्षण लिहून माझ्यावर कडाडून हल्ला केला आहे. त्याच्या नाटकावर आता मलाही कडक समीक्षण लिहिले पाहिजे.

चिंध्या करतो.

दि०........क ने आज मला आवडणारी गव्हल्याची खीर केली होती. 'क'विषयीचे हे गूढ अधूनमधून एखादे बारीक किल्लीच्या छिद्रासारखे छिद्र ठेवून उघड करण्याचे व्यवधान मी ठेवले नाही असे नाही. कारण संशोधकाला अगदीच हताश करण्यात अर्थ नसतो. हे म्हणजे तानाजीला घोरपड देऊन कड्याची वाट बंद करून ठेवल्यासारखे होईल. म्हणून मग कचा उल्लेख मधूनच 'कमलाकान्त' असा पुरुषी नावाने करणे, क्वचित 'कला अबोलीच्या वेण्यांची ओढ तिच्या बाळपणातल्या नारळीपोफळीच्या देशात घालवलेल्या बालपणामुळे असावी.' असा एखादा शेरा. 'कमले कमलोत्पत्ति जायते—नच श्रूयते' अशी एखादी पंक्ती अशा रीतीने आपण जनरीतीला बुजत होतो असेही दाखवले आहे. पुढे पुढे साहित्यिक मराठीची शैली बदललेल्या काळात 'समाज गेला खड्ड्यात' अशा बेफिकिरीने वागणारा मी एकंदर कलंदर कादंबरीकार वगैरे होतो अशीही भुलभुलावण केली आहे. स्वातंत्र्योत्तर काळातल्या डायऱ्यांत ज्याप्रमाणे 'नेहरूंबरोबर चहा घेता घेता मी त्यांना सांगितले.' किंवा 'पाकिस्तानची निर्मिती करू नये असे वल्लभभाईंनी आपले ठाम मत मला अमदाबादेला गोकुळदास मथुरादास शेठजीच्या हवेलीत बोलून दाखवले होते—' वगैरे मजकूर लिहून मी चालू राजकारणी मंडळींच्या किती आतल्या गोटातला होतो हे दाखवून ठेवले आहे, त्याबरोबरच माझ्या डायरीतले साहित्यिक उल्लेखदेखील संतप्त तरुणांना फेफरे आणतील असेच उतरून काढले आहेत. त्यांपैकी बहुतेकांचे लिखाण हे एक साहित्यिक फेफरेच असते अशी माझी नम्र धारणा आहे. नायिकांची वक्ष:स्थळे आणि नितंब यांची क्षेत्रफळे मोजण्यात हयात घालवणाऱ्या साहित्यिकांना आपल्या आत्मचरित्रातून एकाएकी सोज्वळतेचा पक्षघात होतो आणि हल्लीचे वाङ्मय एकदम अश्लील वाटायला लागते. मी तसला प्रकार होऊ देणार नाही. त्यामुळे पुढल्या डायऱ्यांतून एकदम झणझणीत मसाला ठासून भरला आहे. अगदी काय ठासून भरला आहे याची शंका यावी अशा शब्दांत भरला आहे. वानगीदाखल एकच उदाहरण पुरावे.

दि०........१९७१. रोशन आज साली फारच आढीबाजी करीत होती. मी त्या पणतीची भर फुटपाथवर फिरकी घेतली. दुनिया गेली मलबार हिलच्या बंगल्यात. (संतप्त पिढीचा गटार हा स्वर्ग असल्यामुळे मलबार हिलवरचा बंगला नरक मानणे क्रमप्राप्तच आहे.) साली चवन्नीवाली बत्ती माझा मांजा काटायला लागली. तिला म्हटले, "क्यूं बी? (बे चे उर्दूतील स्त्रीलिंग बी असावे असा माझा अंदाज आहे.) आज तेरी ट्यूब जलती क्यू नही?" इ० इ० इ०.

डायऱ्यांप्रमाणे पत्रांनाही संशोधनात भलता भाव. वास्तविक 'सौ० सुखरूपपणे प्रसूत होऊन मुलगी झाली. ईश्वरेच्छा बलीयसी. ती० दामूकाकांना नमस्कार. हरीभाऊबरोबर मेणकापड पाठवून देत आहे—कळावे हे विज्ञापना' ह्या पत्राला काही ऐतिहासिक अर्थ लाभेल असे ते लिहिणाराच्या स्वप्नातही नसेल. परंतु शंभराव्या पुण्यतिथीला असले पत्र 'संपूर्ण व्यक्तिदर्शन' नामक प्रदर्शनात ठेवले जाते. त्याला हस्ताक्षराचा अस्सल पुरावा

म्हणण्यात येते. हे पाहिल्यापासून मी पत्रे लिहिण्याचा सपाटा लावला आहे. किंबहुना, जुन्या बाजारातून पिवळे पडलेले कोरे कागद आणवून जुन्या तारखा घालून ती पत्रे संशोधकांच्या बिऱ्हाडी हळूच एखाद्या लठ्ठ ग्रंथात सरकावूनही दिली आहेत. हे असले ग्रंथ दहापंधरा वर्षांतून एकदाच उघडले जातात. अशा वेळी ७ जाने० १९०१ अशी वर तारीख असलेले आणि 'इतिहासाचार्य विसूभाऊ राजवाडे यांस' अशा मायन्याचे पत्र एखाद्या पुस्तकातून पडले तर ते निश्चितच वाचले जाणार. शिवाय त्यातला मजकूरही जोरदार. थेट विसूभाऊंच्या तापटपणाला सवाई तापट होऊन लिहिलेला.

'...तुमचे परवाचे दुसऱ्या बाजीरावासंबंधीचे विधान हे केवळ तर्कट ह्या सदरात घालण्यासारखे आहे. दुसरा बाजीराव स्त्रीलंपट होता हा आपला शोध अजबच म्हणायला हवा. आम्ही त्याला राजयोगी म्हणू...'

एवढे एक पत्र डझनभर इतिहासकार आणि पेशवाईतून नायक शोधून काढण्याच्या कामात गढलेले दोनतीन कादंबरीकार ह्यांना पेटवायला पुरेसे आहे. आणि जाता जाता माझ्या भावी चरित्रकाराला 'चरित्रनायक आणि इतिहासाचार्य यांचे अन्योन्य संबंध' यावर एक प्रकरण उठवता येईल. तेवढ्यासाठी मी मुंबईच्या एशियाटिक सोसायटीचा मेंबर झालो आहे. जुन्या ग्रंथांत पत्रे कोंबण्याचा कार्यक्रम जोरात चालू आहे. याखेरीज निरनिराळ्या संग्राहकांच्या नावांनी माझ्या आठवणी प्रसिद्ध करण्याचेही कार्य चालू आहे. त्यामुळे 'एका सोळा वर्षाच्या वराऐवजी आठ आठ वर्षाचे दोन कसे चालतील'' हा विनोद लोकमान्यांचा, माझा की नेपोलियनचा, असाही वाद पुढल्या शतकात सुरू होईल. चरित्रनायक हजरजबाबी असावाच लागतो. त्यामुळे चार लोकांचे हजरजबाब त्यांच्या गैरहजेरीत माझ्या नावावर पाठवून दिले आहेत.

तात्पर्य–पुढील जन्मशताब्दीनिमित्त होणाऱ्या चरित्राची साधने ठिकठिकाणी पेरून ठेवली आहेत. आता याउपर जर कोणी भावी चरित्रकार भरपूर साधने न सापडल्याची सबब सांगून माझे किमान पाच खंडी चरित्र लिहिण्याची टाळाटाळ करू लागला तर महाराष्ट्र एका असामान्य चरित्राला मुकला असेच म्हणावे लागेल. पण तसे होणार नाही. कारण थोरामोठ्यांच्या आतल्या गोष्टी खाजगी गप्पांतून आत्ताच पसरवायला सुरवात केली आहे. असे केल्याशिवाय पुढल्या पिढ्यांना आपले स्मरण होणार नाही असे खुद्द न्यायमूर्ती महादेव गोविंद रानड्यांनीच मला एका पत्रात लिहिले होते. दुर्दैवाने ते पत्र वाळवीच्या भक्ष्यस्थानी पडले. मी ही गोष्ट नेहरूंना नगरच्या किल्ल्यात 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' लिहिण्यासाठी संदर्भग्रंथ पुरवताना सांगितली होती. त्या वेळी मौलाना आझाद ''चहाची पावडर संपली, आता कसे व्हायचे आपले? लाहौल बिलाकुवत'' म्हणत तिथे आले होते आणि पलिकडल्या पटांगणात वल्लभभाई आणि शंकरराव देव बॅडमिंटन खेळत होते.

आता फक्त मी माझ्या जन्मशताब्दीकडे डोळे लावून बसलो आहे. येत्या तीनचार वर्षांत एखाद्या पाठ्यपुस्तकात माझी जन्मतिथी अठराशेत्र्याहत्तर-चौऱ्याहत्तरच्या दरम्यान टाकायच्या खटपटीला लागायला हवे. त्यासाठी आधी भारतातल्या थोर पुरुषांच्या जयंती-

मयंतीच्या कचाट्यातून सुटलेला तीनशेपासष्ट दिवसांतला एखादा दिवस शोधून काढायला हवा. नाहीतर बुद्धजयंतीच्या दिवशी आमची जन्मतिथी दाखवली तर त्या दिवशी मयंती साजरी करण्याची सोय करावी लागायची. हे म्हणजे फारच झाले!

# विनोदी लेखन हे साहित्य?

## हॅट्, हडत् किंवा हुड्त!

'विनोदी लिखाण हे साहित्यच नव्हे' असा मुंबईला नुकताच एक परिसंवाद झाला. (मुंबईला काय वाटेल ते होते! आमच्या नाक्यावरचा पानवाला जे०पी०सुद्धा झाला. घाबरला होता बिचारा. पण मग मी त्याला त्यात भिण्यासारखे काही नाही हे समजावून दिले. मला बनारसी सादा फुकट दिले त्याने. किमाम 'छोडू' न. तसा माणूस भला आहे.) असो. तर मी त्या परिसंवादाला जाणार होतो, पण मला त्या दिवशी खोकला झाला. (साहित्यिकांना फक्त पोटशूळच होतो ही समजूत चुकीची आहे. एकाला मेनिनजायटिससुद्धा झाला होता. पण बरा झाला.) त्यामुळे मी त्या परिसंवादाला जाऊ शकलो नाही. पण आपली 'लाइन' चुकली ह्याचे मला अतिशय दु:ख झाले. आयुष्याची इतकी वर्षे लिही लिही लिहिले आणि ते 'साहित्य'सुद्धा ठरू नये ह्या गोष्टीमुळे मी उदास झालो. थॉमस वूल्झे म्हणाला होता–थॉमस वूल्झेच ना तो? की थॉमस आल्वा एडिसन? की थॉमस कुक?–कोणीतरी एक थॉमस म्हणाला होता, ''देवा, ह्या राजाची मी सेवा केली त्याऐवजी तुझी केली असती तर अंतकाळी तू मला अंतर दिलं नसतंस.'' तसेच मीही माझी पुस्तके पाहून म्हणालो, 'हे' लिहिण्यापेक्षा 'ते' लिहिलं असतंस तर आज साहित्यिक झाला नसतास? थू: तुझ्या जिनगानीवर!'' आज अनेक वर्षं ही जिनगानी नक्की कुठेशी असते हे मला ठाऊक नसल्यामुळे कुठे बघून थू: करावे ही ॲक्शन मला जमत नाही. आपण साहित्यिक नाही ह्या विचाराने मी व्याकूळ झालो. आजवर पोरासोरांनी मला साहित्यिक समजून स्वाक्षऱ्या गोळा केल्या होत्या त्या परत मागून घ्याव्या असे वाटायला लागले. एकदोन ठिकाणी साहित्यिक म्हणून गफलतीने माझे सत्कार झाले होते. त्यांना हाराचे, एक कप कॉफीचे आणि मी मोडलेल्या एका ग्लॅक्सो बिस्किटाचे बिल (काय दीड–पावणेदोन रुपये असतील ते) परत करून, ''मित्रहो, तो मी नव्हेच! मज पामराला चुकून आपण साहित्यिक समजलात. मी विनोदी वाक्यं ओळीनं लिहिणारा–शाई आणि कागदाची नासाडी करणारा इसम आहे. असल्या इसमाला साहित्यिक म्हणणं म्हणजे कशाला तरी काही तरी म्हण-ण्यासारखं आहे. 'झालं गेलं विसरून जा,' असला मजकूरदेखील मनात योजला. इतके दिवस मी स्वत:ला साहित्यिक समजत होतो. आणि बिचारे लोकही कुठेही गेलो तरी

'साहित्यिक साहित्यिक' म्हणून बाजूला होत. सर्वत्र सन्मान. घरवाल्याने कधी भाड्याचा तगादा केला नाही. डॉक्टर म्हणायचे, ''बिल सावकाश द्या. व्याख्यानाला या. परिसंवादाला या.'' ''तुम्ही काय बाई साहित्यिक! आम्ही काय बोलणार तुमच्या पुढे...आपला एक फोटो पाठवाल का?'' ही सारी सुखे संपली. पोस्टाच्या पाकिटातून जाईच्या कळ्या पाठवणे आपल्याला आज ना उद्या जमेल ही उमेद खचली. मी आणि माझ्यासारखे सगळे विनोदी लेखक कसे हवा गेलेल्या फुग्यासारखे निपचीत पडले असतील ह्या विचाराने माझ्या चष्म्यावर एक पातळ धुके जमले. चला संपला संसार. आपण काही साहित्यिक नाही. आपण लिहिलेल्या वाक्यांनी माणसे फारतर हसली असतील. पण म्हणजे काही खरे साहित्यिक नाही आपण. पोस्टात पत्रे आणि मनिऑर्डरीचे फॉर्म लिहून देणारे जसे साहित्यिक नाहीत, तसे आपणही नाही. हमाल जसे वेटलिफ्टिंगच्या स्पर्धेतले च्यांपियन नाहीत तसेच आपण साहित्यिक नाही. दहा वर्षे वकिली केलेल्या माणसाला एखाददिवशी युनिव्हर्सिटीकडून पत्र यावे की, 'एलेल्बीच्या परीक्षेत खरं तर तुम्ही सर्व विषयात नापास झाला होता. चुकून पांडुरंग दामोदर मोरे याऐवजी तुमचं पांडुरंग दामोदर गोरे हे नाव पडलं. सबब तुमची डिग्री परत करावी.' अशा वेळी त्या वकिलाला जे काही वाटेल, नेमके तेच मला वाटले. बाकीच्या विनोदी लेखकांना काय वाटले, देव जाणे. एकजण आत्महत्या करायला निघाला होता म्हणतात. ही बातमी वाचून लोक मनमुराद हसले हेही मी ऐकलं आणि माझा विचार त्या दिशेने धावत होता तो आवरला.

तात्पर्य काय, मी साहित्यिक नाही. मी लिहिले ते साहित्य नव्हे. कोट्या काय, कुणालाही करता येतात. विनोदी काय, कुणालाही लिहिता येते. त्यात साहित्य कुठे आहे?

''तुम्हां विनोदवाल्यांना जीवनाची सखोल अनुभूती कुठे आहे?'' असा प्रश्न त्या परिसंवादात एका वक्त्याने ''तुमच्या घरी रेडियो कुठ्ठाय?'' असे आमच्या चाळीतली पोरे विचारतात तस्सा विचारला म्हणे! एका अर्थी मला खोकला झाला हे बरे झाले. नाहीतर त्या जीवघेण्या प्रश्नानंतर मला जगात तोंड काढायला जागा उरली नसती. शेक्सपियरच्या हॅम्लेटसारखे मी माझ्याशीच बडबडायला लागलो. (ही विनोदी लेखकाची खोड. ते बडबडणे नसते बाबा, त्याला 'स्वगत' म्हणतात. आता तरी शहाणे व्हा. इतकी शाई न् इतका कागद नासलास–एखादी व्यथावाली कथा किंवा नाकी नव आणणारी नवकविता लिहितास तर काय झाले असते. भोग आपल्या कर्माची फळे!) तर मी माझ्याशीच बडबडायला लागलो. तर आपल्याला सीरियसनेसपणा ठेवून लिहिता येत नाही. आणि लिहिण्याची तर खोड आहे. तर आपण त्याला साहित्य उगाच समजत होतो. तर भलीभली विद्वान साहित्यिक मंडळी परिसंवादात सांगून गेली की, विनोदी लिखाण साहित्यच नव्हे. तर आपण काय करावे? असले अनेक 'तर' मला दिसायला लागले. डोक्यात काहूर उठले–

एकच प्रश्न. लिहावं की न लिहावं?
आणि लिहिता लिहिता
चटकन सुचली कोटी
तर?
तिथंच तर गोम आहे.
लेका विनोदी लिहितोस काय?
लिही. साहित्यिकांनी वाळीत टाकलंय तुला–
अरे, त्यांचं कूळ केवढं थोर!
तू? तू कोण?
ते बघ केवढी जीवनाची अनुभूती घेतात
टेलिफोनमधून बेडूक काढतात
उंटातून लंबक काढतात
कशातूनही काहीही काढतात–
सभेला न जाता भत्ता काढल्यासारखा.
तू कसला साहित्यिक?
आहेस का तू कलंदर?
अंदरकी बात एकंदर जाणे आणि म्हणे–
उगवती फुगवतीला म्हणाली
की मावळती आवळती झाली
वडाच्या सालीला पिंपळाची मेहुणी
पाहुणी आली आहे
असं समजून!
असं साहित्यिक येतं तुला लिहायला?
रहायला सर्कारी दिडकी सारून
उभारलेल्या मीनारातून
सोनाराची मनी, उन्मनी होऊन
पहात शोधून सोयिस्कर खिडकी?
लिही लेका विनोदी
हशा–टाळ्यांच्या वेटाळ्यात सापडून
वाचकांचा याचक होऊन
प्रेक्षकांचा रक्षक होऊन
समोर घेऊन श्रोता
तू त्यांचा तोता–
तू काय साहित्यिक?

ते ते जे काही खरडतोस
ते काय साहित्य?
ते कडूही नाही, गोडही नाही
नुसतेच आपले टेसदार!
ते काय, कुणीही लिहील.
साहित्याला टेस नको
फेस आला पाहिजे वाचणाऱ्याच्या तोंडाला–
बाबा रे ह्या रेसमधे धावायला
तू धड ना घोडा
धड ना गधडा
तुझी धाव ठाण्यापासून पुण्यापर्यंत–
ते पहा निघाले
ताराबाग एस्टेट्समधून
युनायटेड स्टेट्सपर्यंत
इस्कू बोलता है साहित्य, बाबा.
तुम तर लेका विदूषक
(इसमे क्या शक?)
बस...पुन्हा तोच प्रश्न
लिहावं की न लिहावं!
आणि सुचलं तर?
आवरावं?

दिवसभर असली स्वगतं म्हणत मी हिंडायला लागलो. असेच काही दिवस खुदाई खिन्नतेत गेले. बस स्टॉपवर उभा होतो. कुणीतरी पाठीत थाप मारली. एवढी जोराची थाप म्हणजे सोन्या बागलाणकर.

''काय साहित्यिक?'' सोन्याने चारचौघांत खपली काढली.

''सोन्या, मेलेल्याला मारू नकोस.''

माझ्या ह्या भावनाविव्हळ उद्‌गारांनी सोन्या वारला. (ही जित्याची खोड. सोन्या अबोधगूढ किंवा असेच काहीतरी टिंब टिंब टिंब टिंब झाला म्हणतो तर साहित्यिक वास नसता आला ह्या वाक्याला?)

''काय झालं रे?''

''लेका, व्हायचं काय? आयुष्य फुकट गेलं!''

मला अजूनही माझ्या आयुष्याला 'जीवन' म्हणवत नाही. मी तरी काय करू?

''म्हणजे? घरची सगळी माणसं ठीक ना?''

सोन्या तसा प्रेमळ आहे. पण साहित्यिक आणि बिगरसाहित्यिक व्यथा ह्यातला सूक्ष्म फरक त्याला कळत नाही.

''घरची बरी आहेत रे सगळी...पण–''

''चल चहा घेऊ–'' सोन्या फ्रेंडिनीडसुद्धा आहे.

मग आम्ही चहा घ्यायला मामा सान्याच्या हॉटेलात गेलो. मामा सान्याची मिसळ हा एक अद्‌भुत चमत्कार आहे. विचार आला, की ह्या मामाला कुणी ''तुझी मिसळ हे खाद्य नव्हे'' म्हटलं तर मामा काय करील? ''गेटाउट्'' म्हणेल. मी विनोदी लेखक, वर नाटककार. 'गेटाउट्' काय म्हणतो? टाप नाही.

''दोन चहा, दोन मिसळ. कांद्यात चिकूपणा करू नका.'' सोन्या.

''मला फक्त चहा पुरे.''

''तुझी तब्येत खरंच बरी नाही दिसत. सोळा वर्षांची दोस्ती लेका आपली–आठवतं? कुंदा केळशीकर सोळा वर्षांची होती. टुडे शी इज् थर्टीटू–एवढ्या वर्षांत मिसळीला नाही म्हणालास का कधी? आजच काय झालंय तुला?''

''सोन्या, आजवर इतकी पुस्तकं लिहिली–''

''किती पैसा मिळवाल लेको प्रकाशकाकडून?''

''मिळवला. नाही कां म्हणू? प्रत्येक पुस्तक आमच्या प्रकाशकाच्या भाषेत सांगायचं तर सहा सहा महिन्यांनी आवृत्तीला येतं. खरं आहे. पण सोन्या, एवढं लिहून काय उपयोग?''

''कां?''

''अरे, ते साहित्य नाही.''

''मग काय आहे?''

खरंच! 'मग काय आहे?' सोन्याने अभावितपणे प्रश्न विचारला आणि मी 'आउट्' झालो.

''खरंच सोन्या, मग ते काय आहे?''

''मला काय विचारतोस? पण कुठला XXX (हा शब्द मी लिहू शकत नाही? साहित्यिक नसलो तरी बेहत्तर. आपण साले सभ्य आहोत.) कोण XXXचा म्हणाला हे?''

''अरे, मुंबईत परिसंवाद झाला.''

''कोणाला?'' सोन्या म्हणाला. 'परिसंवाद' म्हणजे धनुर्वातासारखे काही प्रकरण असावे अशी त्याची समजूत आहे.

''जाऊ दे, मराठीतल्या ख्यातनाम अशा दोन विद्वानांनी जॉइंट बेंचचा निकाल दिला आहे की, विनोदी लेखक साहित्यिक नाहीत.''

''कां?''

''कारण आम्हांला जीवनाचा सखोल अनुभव–ज्याला त्यांच्या जातीत 'अनुभूती' म्हणतात–ते नाही. मानवतेची मूल्यं असतात ना, तिचा आम्हांला सम्यक् प्रत्यय नाही.''

''काय नाही?''

''जाऊ दे सोन्या. तुझं बरं आहे. तू जमाखर्चाशिवाय काही लिहिलं नाहीस. आम्ही इतकं लिहून फुकट!''

''मग साहित्यिक कोण?''

''जे विनोदी लिहीत नाहीत ते!''

तेवढ्यात मिसळ आली. आणि एकदा पुढ्यात मिसळ आली की, सोन्या कुणाचे काहीही ऐकण्याच्या मन:स्थितीत नसतो.

मी घरी आलो. माझी विनोदी पुस्तकं, नाटकं–सगळं नेऊन जाळून टाकावेसे वाटायला लागले. पंचवीस वर्षे लिहिले त्यातली एक ओळ साहित्य असू नये? शिवाजीमहाराजांना जर कोणी ''महाराज, मारलात तो सय्यद बंडा, अफझुलखान नव्हे!'' असे जर राज्याभिषेकाच्या वेळी कानात कुजबुजून सांगता तर महाराजांचे काय झाले असते? पुढल्या वर्षी 'माझी साहित्यसेवेची पंचवीस वर्षे' हा लेख लिहिणार होतो मी. पण झाली ती साहित्यसेवाच नव्हे हे कळल्यावर कुठला उत्साह?

मी हिंमत हारणाऱ्यातला नव्हे. कंडक्टरने 'जगा नही, खाली करो' म्हटल्यावरसुद्धा दांड्याला धरून टिकून राहणारे असतात, त्यांपैकी. त्यामुळे यापुढे साहित्य लिहायचे ठरवून मी तयारी सुरू केली. जुने पेन मोडले. शाईची बाटली फोडली. तात्पर्य, 'मोडुनि दंडा फेकुन देइन भिकार भगवी वस्त्रे' (इथे तान आहे ती शिंची लिहिता येत नाही.) अशा थाटात मी प्रकर्ण धसाला लावायचे ठरवले. आजवर, बिले देताना हात धुवायला जातात हे पाहून टाळलेल्या साहित्यिकांशी सलगी सुरू केली. खिशात तीन तीन सिगारेटची पाकिटे बाळगायला लागलो. काही साहित्यिकांनी विनोदी लिहूनसुद्धा ते साहित्यिक कसे ते मला कळेना. शेवटी प्राध्यापक लिखित्यांना भेटलो. प्रा० लिखिते सखोल आहेत, असे ऐकले होते, आणि एकदा ''तुमचा विनोदी लेख 'बरा' आहे,'' असं म्हटलं होतं. त्यांनी मला त्यांच्या–म्हणजे त्या साहित्यिकांच्या–लेखनात किती कोंड्या फोडल्या आहेत हे समजावून द्यायला सुरुवात केली. ''हे पाहिलंत का?'' माझ्या डोळ्यांपुढे त्या लेखकाचं एक पुस्तक धरून ते सखोल टीकाकार म्हणाले, ''आता हेच नाटक घ्या.''

''कशाला घ्या? मी वाचलंय ते.'' खरोखरच मी ते वाचलं होतं. आणि डेटॉल घातलेल्या पाण्याने हात धुतले होते.

''असं काहीतरी लिहा!'' लिखिते म्हणाले.

''कुणासाठी?'' मी विचारले.

''कुणासाठी?'' लिखिते गरजले.

''हो! कुणासाठी? म्हणजे हे जे काही आहे–म्हणजे ज्याला तुम्ही नाटक म्हणता–ते भिकार आहे हो.''

''भिकार?''

''टाकाऊ म्हणा–'' मी प्रतिशब्द सुचवला.

''कां?'' लिखिते.

''कां म्हणजे? करण्याच्या लायकीचं नाही म्हणून!''

''खर्रर्र छ्‌ ज्युफ्यां'' अशासारखा काहीतरी लिखित्यांनी दुर्बोध आवाज काढला. त्याचा अर्थ मला साहित्य म्हणजे काय ते कळलेच नाही, असा मी धरला. तो आवाज काढून झाल्यावर लिखिते म्हणाले,

''तुम्हांला हे नाटक कळलं नाही.''

''हे पहा लिखितेसाहेब, कळलं नसतं तर मी भिकार म्हटलं असतं का? मी आयन्स्टीनच्या सिद्धान्ताला कधी भिकार म्हटलंय का? मला तो कळला नाही तरी? हे जे 'किडा आणि मुंगी' नावाचं नाटक आहे ते मला कळलं आहे म्हणून तर भिकार म्हणतोय? तुम्हांला काय वाटलं, मी ते तुमच्याकडून समजावून घ्यायला आलोय? ह्या इसमाला नाटक लिहिता येत नाही.''

''त्या नाटकाने मराठी नाट्यसृष्टीतली कोंडी फोडलीय ते ठाऊक आहे का तुम्हांला?''

''मराठी नाट्यसृष्टी म्हणजे काय आट्यापाट्याचा खेळ आहे की काय कोंडी फोडायला? इथे कोण लेकाचा कोंडी धरून बसलाय?''

''अस्सं!'' लिखिते एकदम गंभीर झाले. म्हणजे खरोखर गंभीर झाले की काय देव जाणे, पण त्यांनी आपल्या नाकाची बोंडी बेंबीच्या दिशेला वळवली. ''म्हणजे बहुधा तुम्ही राम गणेश गडकऱ्यांना नाटककार म्हणत असाल!''

''मग काय त्यांना वॉचमेकर म्हणायचं? गडकरी नाटककार नव्हते तर कोण होते?''

''खर्रर्रज्युफ्यां!'' पुन्हा तो तसला अक्षरांनी न उमटवता येणारा आवाज काढून प्रा० लिखित्यांनी सुरुवात केली. ''आज मराठी साहित्यात सर्वत्र एक प्रकारची कोंडी झाली आहे.''

''पण काय हो, ह्या 'किडा आणि मुंगी'वाल्याने विनोदीसुद्धा लिहिलं आहे!''

''पण त्यात त्याने विनोदाची कोंडी फोडली आहे.''

''अस्सं! विनोदाचीसुद्धा कोंडी आहे का?''

''अर्थात!'' लिखिते सुभेदार-मेजर लोकांचे आवाज असतात तसे गुरकावून म्हणाले.

''बरं–सांगा बघू विनोदाची काय कोंडी होती?''

''सांगतो. मराठी विनोदाची सुरुवात तुम्ही कुठून धरता?''

''तुम्ही कुठूनही धरा, आमची ना नाही.''

''पण एका विशिष्ट कालखंडापासून आपण सुरुवात केली पाहिजे. अव्वल इंग्रजीत विनोद होता का?''

''मला काय ठाऊक?'' मी.

''नव्हता.''

''म्हणजे सगळी मंडळी काय पेशवाई बुडाल्याच्या सुतकात होती?''

''तुम्ही विनोद करणार असाल तर आपण बोलणं थांबवू या.''

''पण आपण विनोदाबद्दल बोलतोय ना–''

''म्हणून आचरट कोट्या करण्याची आवश्यकता नाही.'' लिखिते.

''आचरट कथा, कविता, आणि सखोल टीका ह्या नावाखाली जर आचरट लिखाण चालतं तर आचरट कोट्यांनीच काय घोडं मारलंय? फार तर आचरटपणाची एक निराळी कोंडी फोडलीय असं समजा.''

''मग तुमचं म्हणणं काय?''

''विनोदी लिखाण हे साहित्य नव्हे असं हे तुमचे कोंडीफोडू गृहस्थ म्हणतात, तर मग ते काय आहे याचं मला उत्तर हवं आहे.''

''तुमची साहित्याची व्याख्या काय?''

''जे कुणीतरी वाचावं अशी आशा मनात बाळगून लिहिलं जातं ते.''

''पण त्यातून एक सौंदर्यात्मक आनंदानुभूती नको?''

''मिळाली तर हवी आहे. मग त्याला सौंदर्यात्मक आनंदानु काय म्हणालात ते देणारं साहित्य असं म्हणू–''

''पण अशी अनुभूती विनोदातून मिळत नाही–''

''कुणाला?'' मी.

''कुणाला म्हणजे? वाचकाला.''

''कुठला वाचक?''

''कुठला वाचक म्हणजे?''

''म्हणजे कु–ठ–ला–वा–च–क?''

''तुम्ही सौंदर्यशास्त्रावर काय वाचलंय?''

''प्रोफेसर हॅरिसन, डॉ० टेलर, व्हाइस रिअर ॲडमिरल बर्गंडी–तुम्ही काय वाचलंय?''

''तुम्ही मर्ढेकर वाचलाय?'' लिखिते ईषद् दबकून म्हणाले.

''कोण मर्ढेकर?'' माझ्यातल्या उंदराने आज गर्जायचेच ठरवले होते. ''मी मर्ढेकरफिर्डेकर वाचत नाही. तुम्ही गॅलिलियो वाचलाय? तुम्ही टॉप्सीड टिप्सी वाचलाय? तुम्ही पॅनीदत्तो टोचे वाचलाय? तुम्ही आल्बेर दामू वाचलाय?'' मी नुसत्या डरकाळ्या फोडत होतो.

''तुम्ही सीरियस वाङ्मय वाचत असाल अशी कल्पना नव्हती मला–''

''मी काय काय करतो हे सांगण्याची ड्यूटी तुमच्या घरी येऊन बजावण्याचं काम मी घेतलं नाही.''

''मग तुम्ही इथे कशाला आलांत?'' आता लिखिते खरोखरीच भडकला होता.

''विनोदी लिखाण साहित्य कां नाही हा प्रश्न विचारायला!''

''कारण त्यात सौंदर्यात्मक अनुभूती आणि विशिष्ट प्रकारच्या प्रतिक्रिया ह्यांच्यात समतानता आढळत नाही.''

लिखित्यांनी मला शब्दांच्या जंगलात न्यायचे ठरवलेले माझ्या लक्षात आले. पण

मीदेखील त्याच्या घरात सगळ्या विनोदवाल्यांचं स्मरण करून शिरलो होतो. मी खुषीने त्या जंगलात शिरून त्याला धापा लागेपर्यंत घुमवायचे ठरवले होते.

''पण लिखिते, सौंदर्यात्मक अनुभूतीच्या विशिष्ट आणि एक प्रकारच्या कक्षा तरी आपण मानता ना? ॲरिस्टॉटलने ज्याला आकृतिबंधात्मक आशयानुसंचारित्व म्हटलंय ते तरी आपल्याला मान्य आहे ना?''

''ते मान्य आहे.''

लिखिते पहिल्याच बॉलला खुशीने दांडी देईल अशी मला स्वप्नात कल्पना नव्हती.

''तर मग आकृतिबंधात्मक आशयानुसंचारित्वाचा विनोदी वाङ्मयात आपल्याला प्रकर्षाने अभाव आढळला तर प्रकृतिविशिष्ट सर्जनाच्या मर्यादेतून ती घटना एक प्रकारे घडली आहे असं आपण कां मानीत नाही?'' मलाही ब्लफ् कॉल्स कसे देता येतात हे ठाऊक आहे.

''अर्थात ते मानणे अपरिहार्य आहे.'' लिखिते आता 'रघुविर तुमको मेरी लाज'च्या सुरात बोलत होते.

''मग अशा स्थितीत विनोदी साहित्य हेच साहित्य आहे आणि इतर साहित्य ही शुद्ध आणि एक प्रकारची पोकळी आहे आणि तिच्यातली सर्जनशील क्षीणता हीच एक प्रकारची सशक्तता किंवा निर्मितिक्षमता मानली जाते हे समीकरण आपल्याला कां पटू नये?''

''तुम्ही म्हणता त्याच्यात पॉइंट आहे.'' लिखिते.

''अरे चोरा!''–मी हे मनात म्हटले. माझ्या बुडबुड्यात ह्याला 'पॉइंट' सापडला. त्या 'किडा आणि मुंगी'त नाटकही असेच सापडले हे मी तात्काळ ओळखले. पण एवढ्यावर ह्या लिखित्याला सैल सोडण्यात अर्थ नव्हता. हे म्हणजे चिमटीत सापडलेल्या ढेकणाला पुन्हा एकदा उशीखाली ठेवण्यापैकी होते.

''मग लिखिते, आता सांगा, असं असून तुम्ही ह्या इसमाच्या लिखाणाला साहित्य म्हणता? आणि हे–हे–हे नाटक नाटक म्हणता? उद्या गोधडीला पीतांबर म्हणाल. परवा टमरेलाला कमंडलू म्हणाल. तेरवा केरसुणीला गदा म्हणाल. येरवा कचऱ्याच्या पेटीला तिजोरी म्हणाल–'' येरवानंतर मराठीत शब्द नाहीत म्हणून मी आणि लिखिते दोघेही सुटलो. त्याच्या उघड्या शेल्फवरून मी त्या कोंडीफोडू इसमाची पुस्तके खसाखस ओढून काढली. ''हे–हे नाटक विनोदी म्हणून छापलंय. विनोदाचा एक अतिसामान्य उद्देश काय? वाचणाऱ्याने किंवा ऐकणाऱ्याने जरासं हसावं. हे वाचताना आलं होतं हसू?''

''छे हो–'' लिखित्याने आता पॅड्ससुद्धा सोडल्या होत्या.

''ह्या नव–कथा! ह्यात काय नवं आहे?''

''त्याबद्दल मी लिहिणार आहे!''

''ते लिहा. ही कथा–कुठल्यातरी बाईच्या नवऱ्याच्या गैरहजेरीत कोणीतरी तिच्याशी लाडात आला! नवीन आहे ही कथा? अहिल्येच्या घरी त्या ह्याने काय केलं?''

''इंद्राने–'' लिखिते मदतीला येऊ लागला.

''राइट्! हे टीकालेख? आहे याच्यात तुमच्यासारखी सखोलता?''
''हे मी काय सांगू–'' लिखिते खूष!
''तरीही या इसमाच्या बडबडण्यात तुम्हांला पॉइंट दिसतो. कोंड्या फुटलेल्या दिसतात. ही कादंबरी–एका पोरीला गाठून चौघांनी बलात्कार केला. तरी तुम्हांला ह्यात सौंदर्यात्मक अनुभूती आली. तुमच्यात तरी असली आसुरी भूक असेल अशी मला कल्पना नव्हती.''
''पण ती कादंबरी मला आवडली नाही.''
''लिहिलंय तुम्ही असं?''
''लिहिणार आहे.''
''केव्हा? त्याच्या सगळ्या हंड्या फोडून झाल्यावर?''
''कोंड्या! पण खरं सांगू का? ह्या लेखकाने–''
''इसमाने म्हणा–''
''हॅ हॅ हॅ–''
''लिखिते, तुमच्याबद्दल आदर वाढला–''
''कां?''
''दुसऱ्याच्या विनोदाला हसू शकता तुम्ही–बोला पुढे!''
''अहो, ह्यांनी स्वतःच स्वतःला साहित्यातल्या अनेक कोंड्या आपण फोडल्या आहेत असं म्हटलंय.''
''तो स्वतःला शिवाजीमहाराज म्हणवील–म्हणून तुम्ही काय लगेच 'की जय' म्हणून ओरडायला हवं?''
''मी तसा त्याला चांगला लेखक कधीच मानला नाही.''
''मी मानतो. दोनतीन गोष्टी बऱ्या लिहिल्या आहेत त्याने. मग आता सांगा, विनोदी साहित्य साहित्यच कां नाही?''
''मी कुठे असं म्हणतोय?''
''पण हा तुमचा कोंडीफोडू म्हणतोय ना–''
''त्याला खरं सांगू का–''
''नको. मी सांगतो–त्याला विनोदी लिहिता आलं नाही. त्याच्या जोडीला 'जी जी रं जी जी' करणाऱ्या इसमाला तर काहीच लिहिता आलं नाही म्हणून तर हा दाह आहे.''
''तुमचा मुद्दा विचार करण्यासारखा आहे.''
मी लिखित्याला विचार करण्यासाठी एकटा सोडला. पण अजूनही आपण विनोदी लिहितो म्हणजे काय लिहितो हे मला कळेना. लिखित्याची शिफारस काय कामाची? हे म्हणजे हेडमास्तरचे सर्टिफिकिट जोडून प्रेमपत्र पाठवण्यापैकी होते. त्या निर्दयेला त्याचे काय! जो तो गड ज्याने त्यानेच जिंकला पाहिजे. मी पुन्हा विचार करायला लागलो.
समजा, आपण साहित्यिक नाही असे ठरले तर काय काय होईल? प्रकाशक पुस्तके

छापणार नाही. ते होणे नाही. कारण सर्व विनोदी लेखकांनी, आपापला प्रकाशक पुढले पुस्तक केव्हा देता हे विचारून गेल्याचे सांगितले. गणेशोत्सव, वसंत–हेमंत इत्यादी व्याख्यानमालांची आमंत्रणे येणार नाहीत. चिंता मिटली. सरकारी बक्षिस मिळणार नाही? न मिळो. कारण मिळाल्यावर केवळ वशिल्यानेच मिळाले हेच ऐकायला आणि न मिळालेल्यांच्या लिखाणातून वाचायला मिळते. एकदा अमेरिकेचे–त्यानंतरही अमेरिकेचेच–आमंत्रण मिळणार नाही. अमेरिका मला बोलवत नाही म्हणून रशियाला कळवले तर रशियाचे आमंत्रण मिळेल. त्यात काय? खंड्याला कादंबरीचं तंत्र जमत नाही म्हटले तेव्हा बंड्याने चहा दिला होता आणि बंड्याची कविता फडतूस आहे म्हटल्यावर खंड्याने कॉफी दिली होती, हा दाखला आठवला. साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद मिळणार नाही. मिळून तरी काय उपयोग? गेल्या वर्षी कोण अध्यक्ष होता ते या वर्षी आठवत नाही. परीक्षेला पुस्तक लागणार नाही. न लागो. ज्यांची पुस्तके आम्हांला होती त्यांच्याबद्दल आम्ही विद्यार्थिदशेत काय काय म्हणून बोलत होतो ते आठवले. त्यानंतर विद्यार्थ्यांच्या 'तसल्या' शब्दसंग्रहात भयंकर भर पडली आहे म्हणतात. त्यांना पाच किंवा दहा मार्कांचे आम्ही नसलो तर तरुण पिढी खूष! लावलेले पुस्तक वाचण्यापेक्षा न लावलेले वाचणे ही तारुण्यसुलभ आवड आहे. शेक्सपियर आणि कालिदास हे विद्यार्थिविश्वाचे भयंकर शत्रू आहेत असे माझे जुने मत आहे. आपले हसण्यासाठी म्हणून लिहिलेले वाक्य 'संदर्भासह स्पष्टीकरण करा'मधे पडलेले पाहणं आणि 'सौंदर्यशास्त्रातले मूलभूत सिद्धान्त' ह्या ग्रंथातल्या पानातून लसणीचे दोनतीन गड्डे बांधल्याची अनुभूती त्या सखोलांना मिळणे ह्यात तादृश फरक काही नाही. फार तर स्वाक्षरी घेणार नाहीत. नाही तरी एका कार्ट्याने माझ्या स्वाक्षरीच्या पाठीच एका म्युन्सिपालटीच्या नगरपित्याची सही घेतली होती. ('जिवणाचा आनंद घेणे हे आपले कर्तव्यच आहे' असा वर संदेश होता.) म्हणजे नव्या शुद्धलेखनाला जपत जपत हजारो ओळी लिहिणारे आम्ही आणि 'नगरपिता' हा शब्दसुद्धा 'नगरपीता' असा लिहिणारा बुरुडआळीतला गुंडाप्पा दोड्डबेट्टी सारखाच! मग आपण लिहितो ते साहित्य नसले आणि परिणामी आपण साहित्यिक नसलो तर बिघडले कुठे? मी घरात एकदम 'युरेका' म्हणून ओरडलो–आणि तशीच (म्हणजे कपडे वगैरे होतेच!) मी पहिली बस मिळाली ती धरली आणि लिखित्यांचे घर गाठले. गुंडाने पोटात चाकू मारावा आणि जखम बरी झाल्यावर त्या मारामारीत (म्हणजे आमच्या बाबतीत मार खाण्यात) आपल्या पोटातले 'ॲपेंडिक्स' कापले जावे आणि फुकटात ऑपरेशन पदरात पडावे तसे हे झाले. मी लिखित्यांची बेल वाजवली. लिखित्यांनीच दार उघडले.

''लिखिते, माझं चुकलं!''

''काय?''

''मी साहित्यिक नाही. तो कोंडीफोडूच साहित्यिक आहे. त्याला तीच शिक्षा बरी–''

''वा! असं कसं? हे पहा, परवा परिसंवाद ठरलाय!''

''कुठला?''

''विनोदी लिखाण हे जिवंत साहित्य आहे.''

''जिवंत साहित्य?–मी मेलो. लिखिते मला वाचवा–मला साहित्यिक म्हणू नका!''

''अहो, पण आता तुम्ही मला इतकं सर्वांगीण विचार करून ते पटवून दिलंय–सौंदर्यात्मक अनुभूतीच्या कक्षा–''

''लिखिते, ते मी साहित्यिक बोलत होतो, खरं बोलत नव्हतो–''

''अहो, चहा तरी घ्या–''

''नको. मीच तुम्हांला कोंबडी देतो. नवसाहित्यिकांची खाद्यविषयक परखर्चानुभूती घ्या, मी देतो. हे पहा लिखिते, तुम्ही साहित्याचा गड तुमच्यासाठी ठेवा. सगळे साहित्यिक सिंह ठेवा तुमच्याजवळ. परिसंवाद घ्या, टीपाटिप्पणी घ्या, सौंदर्यानुभूती घ्या, ज्ञानेश्वरीतल्या 'मर्कट' शब्दाचा अर्थ माकड की विद्वान हा घ्या, कोंड्या फोडा, साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष व्हा, बक्षिसं मिळाल्यानंतरची कुचकूच घ्या, स्वत: मागल्या दारानं जाऊन बक्षिसंही घ्या, बोर्ड ऑफ स्टडीज घ्या, काय वाटेल ते घ्या, पण विनोदी लिखाणाला कृपा करून साहित्य म्हणू नका. जनतेत घबराट पसरेल. आमची इमानी गिन्हाइकी निसटेल. हे कार्ड घ्या आणि लिहा की 'विनोदी लिखाण हे जिवंत साहित्य आहे' ह्या परिसंवादापुढला 'का?' हा शब्द चुकून लिहायचा राहिला, असं कळवा. आणि 'विनोदी लिखाण हे साहित्य नव्हे' असं जर लोक जमलेच तुमच्या परिसंवादाला तर जुन्या नाटकात सांगायचे ना, तसं त्रिवार त्रिवार त्रिवार सांगा.''

''अहो, पण हे आम्ही सगळं घेतल्यावर तुमच्यापाशी काय राहणार?''

''मोकळ्या मनाने हसू शकणारी शेकडो शेकडो माणसं! बस्स! एवढे यश मला रगड. माझ्या मना बन दगड–पण साहित्यिक बनू नकोस!''



''युरेका! युरेका!! युरेका!!!''

# मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास : खंड दुसरा

(अव्वल इंग्रजी ते {(महा+राष्ट्र) देश}x हा)

## प्रिय (अमुचा) एक {[महा](राष्ट्र) देश} हा

(खालील उदाहरणातील कंस सोडवा असे आम्हांला गणित असे. खालील लेख कंस सोडवीत वाचावा.)

चर्चगेटला जाण्याची महत्त्वाकांक्षा उरात बाळगून मी वरळीच्या बसस्टॉपवर उभा होतो. (मराठी माणूस खिशात काही का बाळगेना, उरात महत्त्वाकांक्षा बाळगूनच असतो.) पहिल्या चार बसेसपैकी एकदोन फुल् आणि उरलेल्यांमध्ये 'जगा नही' निघाल्यामुळे संतापाने मुठी आवळल्या होत्या. (मुठीत आवळण्यासाठी संतापाखेरीज आणि तिकिटाचे पस्तीस पैसे यांखेरीज काहीच नव्हते.) तेवढ्यात एका गृहस्थाने आपली मोटार बसस्टॉपवर थांबवली. क्यूमधल्या मराठी सोडून इतर सर्व लोकांना मोटारवाला आपल्या ओळखीचा असावा असे वाटले. पण ती मोटार चक्क एका मराठी माणसाची निघाली. त्याने चक्क मला हाक मारली आणि मोटारीत घेतले. हा गृहस्थ कोण ते मला कळेना. ''अहो, यू विल नॉट रेकग्नाइझ मी. बट आय रेकग्नाइझ यू–व्हॉट?'' मराठी गद्याचा हा इंग्रजी अवतार ऐकल्यावर आश्चर्याचे एकामागून एक असे लहानसहान धक्के बसले. (कोयनेच्या परिसरात बसतात तसे.) पहिला धक्का : मराठी माणूस आणि एवढी लांबलचक गाडी? (पहिला विचार : ड्रायव्हर असेल.) दुसरा धक्का : इतक्या प्रेमाने गाडी थांबवून लिफ्ट देतो? (दुसरा विचार : चुकून मला कोणीतरी समजलेला दिसतोय. तरी ही मला सांगत होती की पांढऱ्या पँटवर खाकी शर्ट घालू नका. पोलिसात असल्यासारखे दिसता.) तिसरा धक्का : ''कुठे सोडायचंय? अहो, आपल्यासारख्यांचे पाय आमच्या गरिबाच्या गाडीला लागले...भाग्य आमचं!'' (तिसरा विचार : गरिबाच्या लांबलचक गाडीला बसच्या रांगेत ताटकळणाऱ्याचे पाय लागले हे भाग्य असते ही वाक्ये मराठीसारखी वाटली तरी भाषा मराठी वाटत नव्हती.) असो.

हळूहळू हे धक्के ओसरले. त्या एवढ्या मोठ्या गाडीत चोरलेले अंग 'लोटस' सिनेमा येईपर्यंत सैल केले. ''बरं का साहेब–'' स्वत:ची एवढी लांब मोटार असणारे, हातात

खऱ्या सोन्याचा पट्टा असणारे, बोटात हिऱ्याची आंगठी असणारे आणि ज्यांच्या पारदर्शक बुशकोटाच्या खिशांतून स्टेट एक्स्प्रेसचे पाकीट दिसते–असले लोक जेव्हा पांढरी पँट, चप्पल-खाकी शर्टांकित माणसाला 'साहेब' वगैरे म्हणतात त्या वेळी जे काही वाटते ते व्यक्त करायला मराठी भाषेत तरी समर्पक शब्द नाही. अशा वेळी 'साहेब' हा शब्द आपण ऐकलाच नाही असे दाखवण्यापलीकडे आपण काही करू शकत नाही. ''बरं का साहेब–'' अशी प्रस्तावना करून स्वत:च्या त्या लांबलचक मोटारीत मला अत्यादराने वाटेतून उचलणाऱ्या मराठी पण मधुर माणसाने मराठी लोकांनी व्यापारात कसे पडले पाहिजे हे ऐकवायला सुरवात केली.

''...साला जाम पैसा कमवावा आणि चैन करावी. हें तुमचं साहित्य वगैरे ठीक आहे. तसं थोडंसं कल्चर वगैरे पाहिजे. मलाही साहित्याची फार आवड होती. आमच्या मुलांनाही आवड आहे. आमच्या घरी दर आठवड्याला एक माणूस आणून टाकतो मासिकं वगैरे. पण मुख्य म्हणजे पैसा कमवा. अरे तुमच्यासारख्यांनी तर चारचार गाड्यां ठेवल्या पाहिजेत.''

''तुमच्या तोंडात साखर पडो'' हे वाक्य केवळ त्या गृहस्थांना मधुमेह असला तर उगीच पंचाईत नको म्हणून मी म्हटले नाही. त्याऐवजी ''छे हो...आम्ही कसले चारचार गाड्या ठेवतोय!'' असे काहीतरी माझ्या तोंडून घरंगळले.

''खूप पैसे मिळवा आणि चैन करा! मी पहा, दादरला मस्त घर बांधलंय–एक ब्लॉक चांगला चार रूम्सचा स्वत:कडे आहे. बाकी मस्तपैकी रेंट येतं. खाण्यापिण्याची चंगळ करतो. तिथे पुढे-मागे पाहत नाही–रोज शिक्रण खातो! निदान मुरंबा तरी हवाच!!''

''जरा गाडी थांबवता का?''

''कां?''

''उतरायचंय मला–'' चर्चगेटऐवजी मी त्याच्या गाडीतून हाजीअलीला उतरलो, खाण्यापिण्याच्या चंगळीत 'रोज शिक्रण'!!! 'आकांक्षांपुढतिं जिथें गगन ठेंगणें' ते हेच का?

त्या दिवशी ठरवले की आपल्या महाराष्ट्राचा साहित्यिक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक–थोडक्यात म्हणजे सर्वांगीण इतिहास लिहायचाच!! म्हणून 'प्रिय अमुचा एक म...अहाहा राहाष्ट्र देऽएश हाऽऽ'

**—पु० ल० देशपांडे**



तेच ते आम्ही–'गाळीव इतिहास'कार (खंड दुसरा) आलोडन करताना (पृष्ठ १७० पहा)

गतवर्षी दीपावलीलाच 'मराठी साहित्याचा गाळीव इतिहास' आम्ही मराठी वाचकांच्या चरणी अर्पण केला. अर्पण करण्यासाठी काही चरणांच्या अधिक जवळ गेलो असता महत्त्व त्या चरणांना नसून खुर्च्यांच्या खुरांनाच अधिक आहे असेही भासमान झाले तेव्हा तिथे अधिकच नतमस्तक झालो. कवितेला श्लोकत्व चार चरणांमुळे लाभते तद्वत् व्यक्तित्वाला पुण्यश्लोकत्वही खुर्च्यांच्या चार चरणांमुळे लागते हे पाहून सद्‌गदित झालो. काही ठिकाणी आमचा प्रथम खंड त्या खुर्च्यांपुढेच ठेवून आलो. आमचे श्रद्धावन्त अंत:करण हे कुठल्याही आसनापुढे नमते. त्या आसनाला शासनाचा आधार असल्यास दुग्धशर्करायोगच.

तसे पाहिले तर महाराष्ट्र हा देशही आहे, राष्ट्रही आहे आणि काही संकुचित मनोवृत्तीचे लोक त्याला प्रांतही म्हणतात. मराठी भाषेत वास्तविक प्रांत म्हणजे डेप्युटी कलेक्टर. (उदाहरणार्थ, ''आमची जेव्हा नाशकातून मालेगावला 'प्रांत' म्हणून बदली झाली...इ० इ०'') प्रांत ह्याचा खरा अर्थ ज्या विषयात एखाद्याला गती नसून बोलेले जाते तो विषय. (उदा०, ''वास्तविक साहित्य हा माझा प्रांत नव्हे. परंतु आजकाल मराठी साहित्यात जे काही चालले आहे त्याविषयी ह्या प्रसंगी दोन शब्द मी बोलणार आहे.'' नियोजित अध्यक्ष आयत्या वेळी न आल्यामुळे उभ्या केलेल्या कुठल्याही स्थानिक पुढाऱ्याच्या भाषणातले पहिले वाक्य.) त्यामुळे महाराष्ट्राला 'प्रांत' म्हणणाऱ्या लोकांच्या अज्ञानाची आम्हांला सदैव कीव करावीशी वाटते. आमच्या भाषेत प्रांत हा शब्ददेखील कोणीतरी उपऱ्याने मागाहून घुसडला आहे. तसे नसते तर देशपांडे, देशमुख, देशस्थ ब्राह्मण याऐवजी प्रांतपांडे, प्रांतमुख, प्रांतस्थ ब्राह्मण असे शब्द आले असते. श्रीपाद कृष्णांनीही ''प्रिय अमुचा एक महाराष्ट्र 'देश' हा'' म्हणूनच ठेवले आहे. त्यांचे पट्टशिष्य गोविंदाग्रज यांनी ''मंगल देशा, पवित्र देशा, महाराष्ट्र देशा'' म्हटले आहे. ''मंगल प्रांता, पवित्र प्रांता'' असे त्यांना गणमात्रांची चूक केल्याशिवाय म्हणता आले असते. इंग्रजांचे राज्य आणि त्यानंतर काँग्रेसचे राज्य येण्यापूर्वी महाराष्ट्र देशच होता. सीमा उत्तरेस अटक (इथे मराठी घोड्यांची पाणी पिण्याची उत्तम सोय होती), दक्षिणेस कन्याकुमारी, पश्चिमेस अरबस्तान आणि पूर्वेस सूर्य अशा आमच्या चतु:सीमा होत्या. इंग्रजानेदेखील आपले हिंदुस्थानात राज्य सुरू झाल्याचा डंका महाराष्ट्राची राजधानी पुणे इथे पिटून, तिथल्या शनवारवाड्यावर आपले युनियन जॅक चढवले. महाराष्ट्र हा देश नसता तर ते निशाण त्याला इतर कुठल्याही गावात चढवता आले असते. दिल्लीला-देखील इतक्या समारंभपूर्वक युनियन ज्याकचे पहिले झेंडावंदन झाले नाही. पुणे जिंकले म्हणजे सारा देश जिंकला ही भावना खुद्द इंग्रजाची असूनही महाराष्ट्राला नुसता प्रांत म्हणणे हे केवळ दुसऱ्याचे बरे बघवत नसल्याचे लक्षण आहे. तात्पर्य, आज आपण ज्याला भारत देश म्हणतो तो महाराष्ट्राचाच एक भाग होता. पानपतात मराठ्यांचा पराभव झाला म्हणून महाराष्ट्र देश नाहीसा झाला म्हणणे म्हणजे वाटर्लूत नेपोलियन हरला म्हणून फ्रान्स नावाचा देशच नाही असे म्हणण्यासारखे आहे. (अरे जो लढेल तो हरेल!!)

तर अशा ह्या महाराष्ट्र देशाला मुख्य म्हणजे इतिहास आहे. राम आणि कृष्ण हे वास्तविक महाराष्ट्रातलेच. कारण संयुक्त-प्रांत हे प्रांत आहेत, देश नव्हेत. महाराष्ट्र देशातलेच हे दोन प्रांत. एक तर खुद्द वाल्मीकी हे सासवडजवळच्या वाल्ह्याचे. वारुळात जाऊन राहण्याची खोड जडण्यापूर्वी 'वाल्ह्या' ह्या नावानेच ते कुप्रसिद्ध होते. त्यामुळे त्यांच्या रामायणातल्या पात्रांची नावे अस्सल मराठी आहेत. 'दशरथ' हे नाव तर त्यांनी मराठी प्रायमरमधून उचलले आहे. (पहा : ''दशरथ सरण रच.'') राम, लक्ष्मण, सीता, कौसल्या (पहा : कौसल्याबाई कोपरकर यांची संगीत बारी) ही नावे अस्सल मराठी आहेत. उत्तर हिंदुस्थानात ह्या नावाचे मग रामसरण, सीतापर्शाद, लछमनसिंग वगैरे



आम्हाला नुकतेच उपलब्ध झालेले वाल्ह्याचे रेखाचित्र. बहुधा एखाद्या जंगलवासीयाने रेखाटलेले असावे. पायांतील स्पष्ट दिसणाऱ्या कोल्हापुरी चप्पलांवरून वाल्ह्याचे महाराष्ट्रीयत्व सिद्ध होते.

झाले. पण मूळ रामायणात राम, लक्ष्मण अशी स्वच्छ मराठी नावे आहेत. गंगायमुनांचा उगम तर अस्सल मराठी आहे. (पहा : 'गंगायमुना डोळ्यांत उभ्या कां?') कैकयी हादेखील 'कैकाडी'चा अपभ्रंश आहे. काही लोकांच्या मते कैकेयी ही काबुल-कंदाहारची तिकडली कुठली तरी होती असे आहे : म्हणजे पठाण. पठाणांत बायका असतात हे ऐकून आम्ही थक्कच झालो. आजवर आम्ही शेकडो पठाण पाहिले आहेत. पण पठाणीण बाई पाहिली नाही अगर पठाणीण बाई पाहिलेला माणूसही पाहिला नाही. असो.



आणखी एक रामायणकालीन उपलब्ध झालेले रेखाचित्र. कैकयीचे कैकाडीपण स्पष्ट करणारे.

ज्याप्रमाणे कोकणात कोंबडीचे 'कोंबई'हून 'कोंबी' होते (कोंबडी>कोंबई>कोंबी) तसेच कैकाडी>कैकाई>कैकयी असे झाले आहे. भटक्या जमातीतली बाई असल्यामुळे कौसल्या आणि सुमित्रा ह्यांच्यासारखी मूग गिळून बसणारी नव्हती. म्हणून ठणकावून "माझ्या पोराला द्या राज्ये—आन् सवतीच्या पोराला धाडा रानात शेनी गोळा करायला!" म्हणाली.

तात्पर्य, प्रभुरामचंद्रापासून जो देश त्रिखंडात गाजतो आहे त्याला प्रांत म्हणून हिणवणे म्हणजे पुरणपोळीला फुलका म्हणण्यासारखे आहे.

प्रस्तुत ग्रंथांत मात्र आम्ही आधुनिक महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक, आर्थिक, इतिहासाचे, वर्तमानाचे आणि भविष्याचे आलोडन करणार आहोत. ('आलोडन' ह्या शब्दाचा नक्की अर्थ आम्हांसही ठाऊक नाही. परंतु शब्दाच्या मध्यभागी 'लोड' असल्यामुळे कशाचा तरी टेकू घेत विचार करण्याला आलोडन म्हणत असावेत असे वाटते.)

इसवी १८१७मध्ये पेशवाईची समाप्ती झाली. ("...समाप्ती प्रीत्यर्थ पर्वतीचे पायथ्याशी प्रचंड ब्राह्मणभोजन जाहले. अलुपिष्टन साहेबाचे हातावर रावसाहेबांनी स्वराज्याचे उदक सोडोत संकल्प सोडिला. यावच्चंद्रदिवाकरौ टोपीकरांचे राज्य चालो अशी एकच गर्जना जाहली व ब्रह्मवृंद पुढ्यातील मोतीचुरावर तुटोन पडला. भोजनोत्तर वामकुक्षी आटपोन संध्यासमयी नदीकाठी जाताना शनवारवाड्यावर 'देखत देखत' फिरंगी बाहुटा लागलेला पाहिला आणि अल्पिष्टन साहेबाकडे कुलमुखत्यारी आल्याचे वृत्त समजोन पेशव्यांची आणि मरगठ्यांची खाशी जिरली. 'नाहीतरी फारच..द..चं (काही अक्षरे लागत नाहीत.) माजले होते,' असे धन्योद्गार शास्त्रीमंडळात निघाले. रात्रीच्या तमाशाच्या फडात कोंडूधोंडू शाहिराने

प्राणसख्या जिवलगा हो आता तुमी
वास्कुट घालून मिरवा
आन् राया मला पाव भिस्कूट भरवा–

ही नवी लावणी रचली व बकुळा कसबिणीने खुद्द अलुपिष्टन साहेबापुढे गाऊन बिदागी मिळवली. साहेबमजकुरांनी शाहीर कोंडू धोंडूस स्वतःचा जुना साहेबी जोडा बहाल केला."–अण्णासाहेबांची बखर.

महाराष्ट्र देश पांडुरंगाच्या कृपेने आणि मायभवानीच्या आशीर्वादाने बुद्धिवादी असल्यामुळे इंग्रजी अमदानीतल्या परिवर्तनाची त्याला झटकन कल्पना आली. वसंताची चाहूल कोकिळेला आधी लागते असे म्हटले आहे. ह्याविषयी महाराष्ट्रात मतभेद आहे. पुण्यात कोकिळेची चाहूल लागल्यामुळे वसंत येतो असे एक मत आहे. आणि व्याख्यात्यांची चाहूल लागल्यामुळे वसंत येतो आणि मुख्यतः व्याख्यांनाची पुष्पे गुंफली जातात असे अर्थातच दुसरे मत आहे. तशी कोकिळा आणि वसंत ह्या संबंधात सामाजिक, राजकीय, नैतिक आणि धार्मिक पातळीवरून असंख्य मते आहेत. वऱ्हाडातली कोकिळा पुणेरी कोकिळेप्रमाणे 'कुहू कुहू' न करता 'काहून काहून' करते असे सुमारे सोळाएक देशपांडे नावाच्या आणि एका वऱ्हाडपांडे नावाच्या संशोधकाचे मत आहे. शिवाय कोकिळा ही संपूर्ण कृष्णपक्षीय असल्यामुळे ती महानुभाव संप्रदायाची आहे व ती 'कुहू कुहू' न करता 'हुकूहूकू' म्हणते असेही एक मत आहे. ते काहीही असले तरी वसंताची चाहूल कोकिळेला लागते किंवा काही लोकांना मंडईत मटारीचे भाव उतरल्याचा घरबसल्या दृष्टान्त होतो त्याप्रमाणे मराठेशाही बुडणार आणि आपल्याला तारण्यासाठी सातासमुद्रापलीकडून मारुतिरायाचे वंशज येणार हा साक्षात्कार बुद्धिवादी महाराष्ट्राला झाला होता. आणि तेवढ्यात जार्ज जार्विस साहेबाने फतवा काढला की : "बालबोध ग्रंथ अथवा प्रौढ ग्रंथ–चांगली भाषान्तरे किंवा नवीन बालबोधास बक्षीस १०० ते ४०० रुपये, प्रौढ ग्रंथ...२ ते ५ हजार रुपये. याहून विशेष केल्यास विशेष शिफारस गौरनर यास होईल." ह्या प्रसिद्धिपत्रकाने मुंबई, ठाणे, पेण,

"...उगीच नाही म्हणालो–
अहों देवांचें राज्य सुरू झालें!"



पनवेल, गुहागर, चिपळूण, पुणे ह्या गावांत हलकल्लोळ उडाला. जिकडे तिकडे हेच ऐकू येऊ लागले. "ऐकलेंत काय धोंडभट? बाळबोध ग्रंथ-लेखनास सहस्रावधी सुरती शिक्क्यांची दक्षणा द्यावयास निघालाय टोपीकर!!–उगीच नाहीं म्हणालों, अहों देवांचें राज्य सुरू झालें!" (हे सर्व अनस्वार निष्कारणी नव्या शुद्धलेखनाच्या नादाने उडवू नयेत. इथल्या अनुस्वारा-अनुस्वारागणिक अत्यानंदाने शेंडी उडाली आहे नि जिभेचे पाणीही.)

१८१० साली रुपयास खंडीभर भात मिळत असे नि ताकदूध विकत नसत. त्या काळी ग्रंथलेखनास हे एवढे पैसे म्हणताक्षणी असंख्य खुंट्यांवरच्या पडशा खांद्यावर आल्या आणि जोडे मुंबईच्या रस्त्यांच्या दिशेने झिजू लागले. घाटाघाटावर हेच संवाद ऐकू येऊ लागले. "पांडभट, सांगा होती काय विद्वत्तेस किंमत तुमच्या पेशव्यांच्या काळी? नाहीतर कुंपणीसरकार पहा–द्या पांडवप्रतापाचा एखादा अध्याय उतरून नि लावा कडोसरीस शंभर रुपये!"

"अहो, गुणी गुणं वेत्ती–काय समजलेत हणमंतशास्त्री–"

"कसले शिंचे गुणी? कसले काय? टोपीकर शहाणा असेल असे वाटले होते हो–पण ग्रंथास पाच नि सहा सहस्र? वर्सभरांत दिवाळे वाजवून जाईल हो परत इंग्लंद देशास! मी त्यास कळवले आहे–"

"काय कळवलेत हणमंतशास्त्री?"

"इतर कुणासही हे ग्रंथाचे काम देऊ नकोस. मी तुमचे सगळे ग्रंथ दहादहा रुपयांत लिहून द्यावयास तयार आहे! सोबत टोपीकर-प्रशंसेचे पंचवीस श्लोकही पाठवून दिले अलुपिष्टन साहेबास–"

"अहो–पण रावबाजींच्या बैठकीतले ना तुम्ही हणमंतशास्त्री–अहो, त्यांच्या पंक्तीतला केशरमिश्रित तुपाचा वास अजून येत असेल तुमच्या हातास–"

"अजाण आहांत! तुम्ही ह्या इथल्या घाटावर असेच एकादस्ण्या करीत नि वटसावित्रीची पोथी सांगत मरायचेत! आम्ही थेट अलुपिष्टनाच्या बुटलेराकडून संधान



"द्या पांडवप्रतापाचा एखादा अध्याय उतरून नि लावा कडोसरीस शंभर रुपये!"

बांधले आहे त्याच्याशी–साहेबास कळतेय काय आपल्या देशी भाषेतले–जेहेत्ते काळाचे ठायी येईल तें उतरून काढावे, कनवटीस तीसचाळीस सहस्र लावावेत आणि वृद्धापकाळी पुन्हा श्रीक्षेत्री येवोन हरि हरि करीत बसावे–"

पण साहेब जरा धूर्तच निघाला. त्याने भलतेच कुठले तरी पदार्थविज्ञानशास्त्र, भूगोल वगैरे विषय देशी भाषेत लिहा म्हणून हेका धरला आणि शास्त्री मंडळीची पंचाईत केली. "पृथ्वी ही शेषाच्या टाळूवर उभी आहे" एवढ्यात एतद्देशीय भूगोलाचे ज्ञान संपत होते. त्याहून वास्तविक अधिक ज्ञान असूच शकत नाही. पण टोपीकर भलत्याच वाटेने शिरू लागला. भूगोलाचे जाऊ द्या. 'गुजराथचा इतिहास' वगैरे ग्रंथ प्रसिद्ध करू लागला. इतिहास हा फक्त महाराष्ट्रालाच असू शकतो ह्याबद्दल तत्कालीन (आणि काही अर्वाचीनही) पंडितांना मुळी संदेहच नव्हता. 'गुजराथचा इतिहास' हा ग्रंथ म्हणजे 'निव्वळ कपोलकाल्पित' आहे असे अनेक विद्वान शास्त्री मंडळींचे मत पडले. टोपीकराने हळूहळू नाही नाही त्या ग्रंथांनी मराठी भाषा बाटवण्यास सुरवात केली आणि सुदैवाने बाटगी मराठी रूढ झाली. त्यामुळे इकडे कितीही नवी शास्त्रे आली तरी संतांची, कहाण्यांतली, बखरींतली मराठी शाबूत राहून एक नवी अँग्लो-व्हर्नाक्युलर जातीची नेटिव्हांची मराठी आली आणि तिचा अंमल आजतागायत चालू आहे. हे नवे मराठी शिकण्यापेक्षा टोपीकराचे इंग्रजी शिकल्यास दोन्ही वेळचे हात ओले तरी राहतील असा धूर्त विचार करून बुद्धिवादी महाराष्ट्र इंग्रजी शिकण्यासाठी सरसावला. खेड्यांतल्या असंस्कृत लोकांवर आजवर संस्कृत फेकून त्यांना तो गप्प करीत असे.

''...वर्षभरात दिवाळे वाजवून जाईल हो परत इंग्लड देशात!''



आता संस्कृत आणि त्यावर इंग्रजीचे चिलखत चढवून मेहेरबान इंग्रेज बहादुराच्या सेवेला तो सज्ज झाला. त्या आनंदात परशुराम तात्या उत्साहाने उद्गारले :

क्षमातळीं इंग्लिशासारखा प्रभु नाही दूसरा
घ्या सुख आतां दु:खें पहिलीं सर्व तुम्ही विसरा।।

आणि अशा रीतीने नव्या मराठी साहित्याचा सूर्य पश्चिमेकडून उगवायला सुरवात झाली आणि म्हणूनच आम्ही प्रथम खंडाच्या उपसंहारात विनायक कोंडदेव ओक ह्यांच्यासारख्या नामवंत लेखकाचे 'ग्रंथकर्तृत्व' ह्या पुस्तकातील वाक्य उद्धृत केले होते. त्यांनी स्पष्ट म्हटले आहे की ''मला मराठी लिहिण्यास मेजर कँडीसाहेबाने शिकवले.'' ''क्यांडी, मोल्सवर्थ आणि 'इतर मिशनेरी व क्यापटन्' यांच्यापुढे आमच्या शास्त्रीपंडितांनी संथा घेण्यास प्रारंभ केला,'' असे म०म० दत्तो वामन पतिदारांनी 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' ह्या ग्रंथात म्हटले आहे. नव्या मराठीच्या ह्या अवताराची जन्मभूमी मुंबई असेही त्यांनी म्हटले आहे. मुंबई पश्चिमसमुद्रकाठी असल्यामुळे पश्चिमेला उगवणाऱ्या सूर्याची किरणे प्रथम तिथे पडणे अपरिहार्य होते.

मराठी भाषेने आजवर आपला साहित्यिक साजशिणगार पद्याचा ठेवला होता. इंग्रजाने पहिल्या कालखंडात कवींचे हाल केले. अखेरपेशवाईत लावणीला भलता भाव आला होता. ब्राह्मण, शिंपी, गवळी, शिकलगार अशा निरनिराळ्या बलुत्यांतल्या लोकांनी आपले पिढीजाद धंदे सोडून लावण्या लिहायला सुरवात केली होती. पुण्यातल्या

वेदशाळेत देखील रात्री नव्या वगाच्या तालमी चालायच्या. होनाजी बाळांनी भागीत फड उभारला होता. रात्री जागवल्यामुळे होनाजीला सकाळी दूध घालायला जायला उशीर होऊ लागला. त्यामुळे त्याची गिऱ्हाइकी आटली. शेवटी त्याने आपण व्यावसायिक तमासगीर झाल्याचे जाहीर केले. बाळाने आपले शिंप्याचे दुकान केवळ रात्री तालमीला जागा पाहिजे म्हणून चालू ठेवले होते. बावनखणीत तर खणागणिक एकएक कवी उभा होता. इकडे अभंग, श्लोक वगैरेचे उत्पादन मात्र भलते घटत चालल्यामुळे कीर्तनकार वामनपंडित, मोरोपंत ह्यांच्याच भांडवलावर गुजराण करीत होते. साहेबाने मराठी भाषेत सुधारणा करायचा चंग बांधल्यावर पहिला आघात झाला तो कवी लोकांवर! मराठी गद्याला एकदम बरे दिवस आले आणि पद्याचा बाजारभाव भलताच खाली आला.

कुंपिणी सरकारचे राज्य स्थापन झाल्याबरोबर राजकार्यधुरंधर प्रजापालनैकरत हानरबल मौंट स्त्युवर्त एल्फिस्तनसाहेब आणि प्रतापसिंह परमकारुणिक हानरबल जनराल सिर जान मालकमसाहेबबहादुर पात्रण ह्यांच्या लक्षात आले, की महाराष्ट्र देशातील लोकांस महाराष्ट्रभाषा शिकवली पाहिजे. म्हणून त्यांनी मोल्सवर्थ आणि क्यांडी ह्या साहेबांना मराठीचा कोश करावयास हुकूम केला. ही बातमी व्हान्स केनेडी साहेबाला लागली. केनेडी साहेबाने आधीच एक मराठी इण्टु इंग्रजी आणि इंग्रजी इण्टु मराठी कोश छापून प्रसिद्ध केला होता. आता नवा सरकारी कोश आला की तो स्वस्त दरात येणार, म्हणजे आपले कोशाचे गठ्ठे पडून राहणार म्हणून त्याने ''मराठी ही मुळी भाषाच नसून नुसती बोली भाषा आहे आणि तिच्यात गद्य-पद्यात्मक वाङ्मयदेखील झालेले नाही,'' असा शेरा मारला. निदान मराठी ही बोली की भाषा ह्या वादात काही वर्षे जातील आणि तेवढ्यात आपला कोश खपेल असा त्याचा हेतू होता. परंतु त्या काळी साहित्य परिषद, मुं० म० सा० संघ किंवा विदर्भ साहित्य संघ स्थापन झाले नसल्यामुळे आणि कसल्याही बाण्याचे कसलेच दैनिक किंवा साप्ताहिक नसल्यामुळे केनेडीसाहेबाने टाकलेली वादाची ठिणगी जिथल्या तिथे विझून गेली. परंतु "Marathi is merely a spoken language and it has never been cultivated or refined by authors either in prose or verse" हे त्याचे मत कोकणीवाद्यांनी ध्यानात घेण्यासारखे आहे. क्यांडीसाहेब मात्र भलताच धूर्त होता. त्याने पुण्याच्या शुद्ध संस्कृत पाठशाळेला इंग्रजी वर्ग जोडून टाकले. त्यामुळे मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराने ओव्या, बखर वगैरे लिहिणारांशी संबंध तोडून टाकले आणि इंग्रजी शास्त्री नामक मराठी लेखकांची जात जन्माला आली. ती सुदैवाने आजतागायत टिकून आहे. क्यांडीसाहेबाने जरी ही मराठी रूढ करण्यासाठी खूप धडपड केली तरी पुण्याच्या संस्कृत पाठशाळेचा तो प्रमुख असूनही त्या वेळच्या सोवळ्या पाठशाळेत बूट घालून जाण्यास त्यालाही बंदी होती. पारतंत्र्यात देखील जोडे कुठे ठेवावेत हा अधिकार व्युत्पन्न ब्राह्मणवर्गाने आपल्या हाती राखून ठेवला होता हे कौतुकास्पद आहे. बाकी काही असले तरी पुणेरी चर्मी जोडा ही अगदीच पायाखाली तुडवण्यासारखी गोष्ट नव्हती. 'स्त्रीविद्याभ्यास' ह्या निबंधावर खूष

होऊन पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश'कर्त्यांनी बाबा पदमनजी ह्या लेखकास ''एक चर्मी जोडा व पितळी वाटी बक्षीस पाठवली'' असे वृत्त 'अरुणोदयां'त १८५१ ते १८५४च्या दरम्यान केव्हातरी छापून आले आहे. ज्या ग्रंथांना अजिबात मार्केट नाही असले निबंध वगैरे लिहिणाऱ्या लेखकाची म्हातारपणची सोय म्हणून पायपिटीसाठी जोडा आणि हातात वाटी देण्याचे दूरदर्शित्व वाखाणण्यासारखे आहे.

ते काही असले तरी गद्य तर गद्य, आपण आपले ग्रंथरचनेस लागू या, अशा निर्धाराने इंग्रजी शास्त्रीमंडळींनी कमरा कसल्या. पेशवाईचा अस्त झाल्यापासून पानास चवली देणाराही यजमान दृश्यमाण होत नव्हता. त्यामुळे पानास चांगला सुरती रुपया किंवा किमान पक्षी आर्धा रुपाया देणारे रेवरेंड फाररसाहेब, गेस्फोर्डसाहेब, फॅरिशसाहेब वगैरे नवे यजमान आले आणि त्यांनी पंडितांस कामास जुंपले. ''पूर्वी पेशवे लाखो रुपयांचा देकार प्रतिवर्षी श्रावणात ब्राह्मणांस करीत. पुढे इंग्रज सरकारने केवळ विद्वान ब्राह्मणांस मात्र द्रव्य देण्याचा शिरस्ता ठेवला.''

आता ब्राह्मणांत नुस्ता ब्राह्मण आणि विद्वान ब्राह्मण असा फरक करणे हे फारच



कुंपणीसरकारने विद्वत्तेचे नस्ते लष्टक मागे लावले. आणि केवळ विद्वान ब्राह्मणांस द्रव्य देण्याचा शिरस्ता चालू केल्यामुळे अनेक ब्राह्मणांना ''गेले ते पेशवाईचे दिवस!'' असे वाटू लागले.

अन्यायाचे होते. पण साहेब मुळातच लुच्चा. त्याने हे वर्गीकरणच असे केले, की निषेधाच्या सभा, मोर्चे वगैरे काही काढताच येऊ नये. कारण मोर्चे काढणारे ब्राह्मण आपोआपच विद्वान नसलेले ब्राह्मण ठरणार. पण खाजगीत सभा झाल्या म्हणतात. त्यासंबंधीचे एक पत्र उपलब्ध आहे. पुण्याचे कोणी मोरशास्त्री बाहुलीहौदकर पेणेस बहिरवभट पेणकर यांसी लिहितात :

''सांप्रत कुंपणी सरकारानें हे विद्वत्तेचे नस्तें लष्टक मागें लावलें आहे. ब्राह्मण जन्मजात विद्वान असतो हें ह्या टोपीकरास उमगत नाहीं. धर्म तर बुडतच चालला आहे. समाराधना, प्रयोजने वगैरे सांप्रत बंदच आहेत. हल्ली बऱ्याच वेळां स्वगृहींसुद्धां जेवावें लागतें. जो तो साहेबापुढें आपलें घोडें दामटतो. ब्रह्मवृंदांत ऐक्य नाहीं. काल विपरीत. पेणेस परिस्थिती याहून बरी असल्यास कळविणें. आमचा द्वितीय पुत्र चिरंजीव बभ्रुवाहन उर्फ बभ्या बाप्तिस्मा घेण्याच्या विचारांत आहे. टोपीकरांच्या धर्मांत भिक्षुकांस प्राप्ती बरी असते असें ऐकिवात आहे. बभ्याच्या प्रारब्धांत जें असेल तसें होईल. मात्र त्यानें आपल्या जन्मदात्यास विसरूं नये. पेणेहून ह्या दिशेस कोणी येत असल्यास पोहे पाठवावे...'' (पुढील मजकूर लागत नाही.)

टोपीकराचा अमल सुरू होताच रमणे, सहस्रभोजने वगैरे हळूहळू बंद पडू लागल्यामुळे ब्रह्मविद्येचा लोप होऊ लागल्याची जाणीव महाराष्ट्रांतील ब्रह्मवृंदास होऊ लागली.

[अपूर्ण]